# SCRIPTURE MANUAL.

# पवित्र शास्त्रांतील मुख्य विषय.

By Charles Simmons

Tr. by G.R. Wilder

BOMBAY TRACT AND BOOK SOCIETY.
No. 25. Maráthí 12mo Series. 1st Edition.
500 Copies.

मुंबईमध्यें अमेरिकन मिशन छापखान्यांत छापिलें.
सन १८५७.

# अनुक्रमणिका.

# प्रस्तावना.

पवित्र शास्त्रांत नीतिसंबंधी मतें व आचरण यांविषयीं उपयोगी व खरा उपदेश आणि सुबोध लिहून ठेविला आहे. ख्रिस्ती राष्ट्रें यांची आबादी व श्रेष्ठपण कोठून विचारिलें तर हीं पवित्र शास्त्रावरून झालीं आहेत असें समजलें पाहिजे. यास्तव हें शास्त्र बरोबर समजून घ्यावें, याचा अभ्यास व मनन करून याचा अभिप्राय ध्यानांत आणून त्याप्रमाणें चालावें असा सर्वांचा धर्म होय. या लहान ग्रंथांत पवित्र शास्त्रांतले ७५० मुख्य विषय मांडून ठेविले आहेत, आणि त्याविषयीं शास्त्रप्रमाणें व आधार अंकांनी दर्शविलीं आहेत. शास्त्रांतील वेगवेगळीं पुस्तकें यांचे संक्षेप लिहिले आहेत, आणि जवळच्या अंकांनी अध्याय व ओव्या दाखविल्या आहेत. उ. निर्ग. ८:१५. यावरून निर्गमाचा ८ वा अध्याय व १५ वी ओवी, असें समजावें. कधीं कधीं हे अंक (   ) अस्या खुणांमध्यें मांडले आहेत तेव्हां त्या वाक्यांचीं प्रमाणें याच विषयाला लागतात, परंतु दुसऱ्या मांडलेल्या वाक्यांसारिखीं जवळ व उघड नाहींत. प्रत्येक विषयाला अंक अनुक्रमाने दिल्हे आहेत आणि हे अंक शास्त्रांतील वाक्यांच्या अंकांच्या शेवटीं (   ) या खुणांमध्यें कधीं कधीं मांडले आहेत. उ. पहिल्या विषयाखालीं (१३७, १४४,४४३,४४१.) असें आहे, यावरून असें समजावें कीं या पहिल्या विषयाला जीं शास्त्रप्रमाणें दर्शविलीं त्यांपेक्षीं अणखी पाहिजेत तर ज्यांचे हे अंक आहेत त्या विषयांखालतीं शास्त्रवाक्यें सुचविलीं आहेत तींहि पाहा. याप्रमाणें अभ्यास करून सदहु ७५० विषयांस पवित्र शास्त्रांतील मुख्य प्रमाणें समजण्यांत येतील.

# पवित्र शास्त्रांतील मुख्य विषय.

## अंतःकरण.

### १ अंतःकरण स्वतंत्र आहे, ह्मणजे मनोवृत्ति, भावना, वासना, इत्यादि ज्याच्या त्याच्या स्वाधीन आहेत.

नीति ४:२३. प्रत्येक रक्षणार्थापेक्षां तूं फार चौकशीने आपलें हृदय राख, का कीं त्यांतून वर्त्तणुकीचे झरे निघतात. २३:२६. माझ्या लेंकरा, तूं आपलें हृदय मला दे, आणि तुझे डोळे माझ्या मार्गाला जपोत. निर्ग. ८:१५. २ शम. १५:६. २ काल. ३०:१८. इज्रा. ७:१०, एस्त. ७:५. गीत ७३:१३. ११९:११२. मात्थी ५:२८. (१३७. १४४, ४४३, ४५१.)

### २ विभागलेलें अंतःकरण.

गीत १२:२, फुसलावणाऱ्या ओंठानी मन राखून मनाने बोलतात. ८६:११. होशे. १०:२.

### ३ बरें, वाईट, हीं अंतःकरणामध्यें असतात कीं काय?

मात्थी १५:१८,१९. परंतु जें तोंडातून निघतें तें अंतःकरणांतून निघतें, आणि तेंच माणसाला विटाळवितें. का कीं अंतःकरणांतून वाईट विचार, हत्या, व्यभिचार, शिंदळक्या, चोऱ्या, खोट्या साक्षी, दुर्भाषणें, हीं निघतात. ५:८. १ राजे. ८:१८. २ काल. ३२:२६. गीत ५५:२१. ७८:७२. ९५:१०. नीति ६:१४. २३:७. उपदे. ९:३. यशा. १०:७. इर्म. ४८:२९. रोम. १०:१०. इब्री. ३:१२.

### ४ अंतःकरणाचा कल प्रबळ आहे.

नीति ४:२३. प्रत्येक रक्षणार्थापेक्षां तूं फार चौकशीने आपलें

हृदय राख, का कीं त्यांतून वर्त्तणुकीचे झरे निघतात. १६:९. मात्थी १२:३४,३५. अहो सापांच्या पिल्लानो, तुह्मी वाईट असतां तुह्माला चांगल्या गोष्टी कशा बोलतां येतील? का कीं अंतःकरणांत जें भरलें आहे त्याप्रमाणें तोंड बोलतें. चांगला माणूस अंतःकरणाच्या चांगल्या भांडारांतून चांगल्या गोष्टी काढितो, आणि वाईट माणूस वाईट भांडारांतून वाईट गोष्टी काढितो. इंयो. १५:१२. (लूक. ६:४५.)

### ५ धर्मसंबंधी कृत्यें अंतःकरणानें केलीं पाहिजेत.

अनुवाद २६:१६. आजच्या दिवसीं तुझा देव परमेश्वर तुला हे नेम व ह्या नीति पाळायास आज्ञा देत आहे; तर तूं आपल्या सर्व अंतःकरणानें व आपल्या सर्व जिवानें ह्या संभाळून पाळ. १ शमु. १६:७. परंतु परमेश्वरानें शमुवेलाला ह्मटलें कीं, "त्याच्या स्वरूपाकडे व त्याच्या देहाच्या उंचीकडे पाहूं नको, कारण कीं म्या त्याला नाकारिलें आहे; जसें मनुष्य पाहतो तसें देव पाहत नाहीं, का कीं मनुष्य रूपाकडे पाहतो परंतु परमेश्वर हृदयाकडे पाहतो." इर्म. २९:१३. मात्थी २२:३७. २३:३६. योहा. ४:२४. प्रेषि. ८:२१,३७. रोम. २:२८,२९. १०:१०. १ तीम. १:५. (१०५,४७९.)

## अन्न.

### ६ अन्नाविषयीं बोध— खादाडपणाचा निषेध.

उत्पत्ति १:२९. आणि देव बोलला, पाहा संपूर्ण पृथ्वीच्या पाठीवर जी बीज देणारी अवघी हिरवळ, आणि बीज देणाऱ्या ज्या सर्व झाडांवर झाडांचें फळ आहे तें म्या तुह्मास दिलें आहे, खाण्यासाठीं तुमचें होईल. ९:३,४. नीति २३:२१. का कीं मद्यपी आणि खादाड दरिद्री होतील, व डुकल्यानी मनुष्याचें पांघरूण चिंध्या असें होईल. १,२,३,२०. अनुवाद. २१:२०,२१. दानी. १:१२,१५. मात्थी ६:३१–३३. लूक १६:१९,२५. २१:३४. रोम. १४:२१. १ करिं. ८:१३. १ तीम. ४:३. (५२३,४८.)

## अन्याय.

### ७ अन्याय व अप्रमाणीकपण मना केलें आहे.

लेवी १९:३५. तुह्मी न्यायांत, परिणामांत, जोखण्यांत, व मापांत

अन्याय करूं नका. ११,१३. २५:१४. थेस्स. ४:६. कोणी उल्लंघून व्यवहारांत आपल्या भावाचें हरण करूं नये, कारण कीं प्रभु अशा सर्वांचा सूड घेणारा आहे, जसें आह्मी पूर्वींहि तुह्मास सांगितलें व प्रमाण पटविलें, तसें. अनु. १९:१४. २५:१३,१४,१५. २७:१७. गीत ८२: २. नीति ११:१. (३८०,५८६.)

## ८ अन्याय, जुलूम इत्यादि अनुचित आहेत, ह्मणजे पाप हें मूर्खपण आहे– दंडसुचना.

करिंथ. ६:९,१०. अन्यायी यांस देवाच्या राज्यांत वतन मिळणार नाहीं, हें तुह्मास ठाऊक नाहीं काय ? फसूं नका: शिंदळ व मूर्त्तिपूजक व व्यभिचारी व स्त्रीसारिखा संभोग देणारे व पुरूषसंभोग घेणारे, व चोर व लोभी व मद्यपी व निंदक व हरण करणारे, यांस देवाच्या राज्यांत वतन मिळणार नाहीं. गण. ३२:२३. २ काल. २८:१९. इयो. २१: १७,२०. २७:१३–१७. गीत ९:४६. ९:१५,१६. ३४:१६,२१. ५५:२३. ५८:११. ७३:१२,१८,१९. नीति ३:३३. ११:३१. १३:५, १५. २८:८.१८. इस. १७:११. २२:१७,१८,१९. यहेज्के. २२:१२, १४. २८:१५,१६. याको. ५:३,४. २ पेत्रस. २:५,६. (२६९,५९२, ५६,५५७,५६६,७०६,५७०,३०६,१८,४३७,२७७,४०७-- ८,३८१,५७७.)

# अस्वार्थीक प्रीति.

## ९ अस्वार्थीक प्रीति करणें अवश्य आहे.

मात्थी ५:४३,४४. "आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर, आणि आपल्या वैऱ्याचा द्वेष कर," असें सांगितलें होतें, हें तुह्मी ऐकिलें आहे. परंतु मी तुह्मास सांगतों तुह्मी आपल्या वैऱ्यांवर प्रीति करा, जे तुह्मास शाप देतात त्यांस तुह्मी आशीर्वाद द्या, जे तुमचा द्वेष करितात त्यांचें तुह्मी बरें करा, आणि जे तुह्मास गांजितात आणि तुमच्या पाठीस लागतात त्यांच्या साठीं प्रार्थना करा; ७:१२. याकरितां माणसांनीं ज्या ज्या रीतीनें तुह्मासीं वर्त्तावें ह्मणून तुमची इच्छा आहे त्याच रीतीनें तुह्मीहि त्यांसीं वर्त्ता; का कीं नेमशास्त्र आणि भविष्यशास्त्र हेंच आहे. ४५,६,३३. २२:३९. लूक ६:३५. रोम. ८:९. १५:१,३. १ करिंथ. १०:२४ ३३. १३:४,७. २ करिंथ. ५:१५. गल. ५:१४. फिलि. २:३,४

याको. २:८,९. १ योहान्न ३:१६. (२३२,५९१–२, १२७, १२१, ३६८,७१४,७९६.)

## १० अस्वार्थीक प्रीतीचीं उदाहरणें.

लूक १०:३३. परंतु कोणी शोमरोनी वाटेने चालत असता त्याज-कडे आला, आणि त्याला पाहून कळवळला; ३४. २ करिंथ. ८:९ का तर आमच्या प्रभु येशू ख्रीस्ताची कृपा तुम्ही जाणतां कीं, तो धनवान असतां तुम्हाकरितां दरिद्री झाला, यासाठीं कीं तुम्ही त्याच्या दरिद्राने धनवान व्हावें. १२:१४. निर्ग. ३२:३१, ३३. १ शम. २४:१६, १८. इयो. १:९, २१. १:१५. २९:१२, १३. दानी. ३:१६, १८. ६:१० प्रेषि. २:४४,४५. ४:३२,३४,३५. रोम. ९:१,२,३. इब्री. ११:२४,२५, २६. (२३८, १२१, ३६८, २०३, ७१४.)

## ११ अस्वार्थीक प्रीतीचें फळ.

मार्क. १०:२९,३०. मग येशूने उत्तर दिल्हें कीं, मी तुम्हास खचीत सांगतों, ज्याने घर किंवा भाऊ किंवा बहिणी किंवा बाप किंवा आई किंवा लेंकरें किंवा शेतें मजकरितां व शुभवर्त्तमानाकरितां सोडिलीं, तो या सांप्रतकाळीं शंभरपट घरें व भाऊ व बहिणी व आया व लेंकरें व शेतें हीं पाठलागांसुद्धां आणि पुढल्या काळीं सर्वकाळचें जीवनहि पावल्यावांचून राहील असा कोणी नाहीं. २८. (२०४, ३२१, ३८१)

# अज्ञान.

## १२ अज्ञानाचें पाप व भय— ज्ञान पाहिजे.

नीति १५:३२. जो संबोधाचा तिरस्कार करितो तो आपल्या जीवाला तुच्छ मानितो, परंतु जो निषेध ऐकतो तो बुद्धि पावतो. १९:२. जीवात्मा ज्ञानाविना असला तर बरें नाहीं, आणि जो आपल्या पायानी त्वरा करितो तो पापांत पडतो. १३:१८. गीत ३२:९. यशा. ५: १३. होशे. ४:१,६. योहान्न १६:२,३. १ करिंथ. २:७,८. १४: २०. २ थेस्स. ९:७,८. (६५४, ५५३, (१०) ७४३.)

# आईबापें.

## १३ आईबापानी चांगला कित्ता दाखवावा.

यहोशा. २४:१५. किंवा परमेश्वराची सेवा करणें हें जर तुह्मास वाईट वाटतें, तर तुह्मी ज्याची सेवा कराल, त्याला आज आपल्यासाठीं निवडून घ्या; नदीच्या पलिकडे तुमच्या पूर्वजानी ज्या देवांची सेवा केली, त्यांची सेवा करा, किंवा ज्या अमोऱ्यांच्या देशात तुह्मी राहतां त्यांच्या देवांची सेवा करा, परंतु मी व माझ्या घरचीं माणसें आह्मी परमेश्वराची सेवा करूं." तितस. २:७. सर्व गोष्टींविषयीं चांगल्या कामाचा कित्ता असें आपणाला दाखीव; उपदेशांत शुद्धपण, गंभिरता, गीत १०१:२. (२०९.)

## १४ आईबापानी आपल्या लेंकरांस शिकवावें व आवरावें.

नीति २२:६. ज्या मार्गांत चालावें त्यांत मूल लाव ह्मणजे तो प्रौढ झाल्यावर त्यांतून वळणार नाहीं. एफस. ६:४. आणि बापानो, तुह्मी आपल्या लेंकरांस चिडवूं नका, तर प्रभूसंबंधी शिक्षा व बोध यांकडून त्यांचा प्रतिपाळ करा. निर्ग. १०:२. अनु. ६:६,९. (अनु. ११:१८-२१.) ३२:४६. यशा. २८:९. (४२४.)

## १५ आईबापानी लेंकरांस आज्ञा मोडल्यामुळें शिक्षा द्यावी.

नीति १३:२४. जो आपली काठी आकळितो तो आपल्या लेंकराला द्वेषितो, परंतु जो त्याला प्रिय मानितो तो त्याच्या शासनाला जपतो. २९:१७. तूं आपल्या पुत्राला शिक्षा कर, ह्मणजे तो तुला चैन पडूं देईल, होय तो तुझ्या जिवाला आनंद वाटूं देईल. १०:१३. १९:१८. २२:१५. २३:१३,१४. २६:३. २९:१५. इब्री १२:९. (५८८.)

## १६ आईबापानी लेंकरांचें पालन पोषण करावें.

२करिंथ. १२:१४. पाहा, तिसरेदां मी तुह्माजवळ येण्यास तयार आहें, आणि मी तुह्मावर भार घालणार नाहीं, का कीं मी तुमच्या मालमत्तेस नव्हे, तर तुह्मास शोधितों; कारण कीं लेंकरांस आईबापांसाठीं नव्हे, तर आईबापांस लेंकरांसाठीं सांठविलें पाहिजे. तीम.

५:८. परंतु जर कोणी आपल्याकडच्यास व विशेषेंकरून आपल्या घ-रच्यास पुरवीत नाहीं, तर त्यानें विश्वास नाकारिला आहे, व तो अ-विश्वास्यापेक्षां वाईट आहे.

## १७ आईबापांच्या विश्वासुपणाचे चांगले परिणाम.

गीत १०२:२८. तुझ्या सेवकाचें संतान राहील; आणि त्यांचें बीज तुझ्यासमोर स्थापलें जाईल. ३७:२६. नीति २०:७. न्यायी आपल्या यथार्थतेनें वर्त्ततो, त्याच्या मागें त्याचीं लेंकरें सुखी असतात. २२:६. उत्प. १८:१९. २तीम. १:५ (३५.)

## १८ आईबापांच्या अविश्वासुपणाचे वाईट परिणाम-ईश्वरी गजब.

निर्ग. २०:५. त्याच्या पायां पडूं नको, आणि त्याची सेवा करूं नको, कां कीं मी परमेश्वर तुझा देव आवेशी देव आहें, जे माझा द्वेष करितात त्यांच्या तिसऱ्या व चवथ्या पिढीपर्यंत बापांच्या अन्यायामुळें लेंकरांचें शासन करितों. होशे. ४:६. माझे लोक ज्ञान नसल्यामुळें नाहींसे होतात; त्वां ज्ञान नाकारिलें, ह्मणून मजसाठीं याजकपण करण्यापासून नाकारीन; तूं आपल्या देवाचें नेमशास्त्र विसरला आहेस, ह्मणून मीहि तुझीं लेंकरें विसरेन. इर्म. ३२:१८. गण. १४:३३. १शम. ३:१३. १राजा. १६:३. २१:२१. ईयो. १७:५. २१:१७,१८, १९. यशा. १४:२१. (८)

# आकाशलोक.

## १९ आकाशलोक हें एक स्थान आहे.

योहा. १४:२,३. माझ्या बापाच्या घरांत बहुत वस्त्या आहेत; नसत्या तर म्यां तुझांस सांगितलें असतें; मी तुह्मासाठीं जागा तयार करायास जातों. आणि मी जाऊन तुह्मासाठीं जागा तयार केली तर फिरून येईन, आणि आपल्या जवळ तुह्मास घेईन, यासाठीं कीं जेथें मी आहें तेथें तुह्मीहि असावें. एफस. ३:१०.

## २० आकाशलोकांतला प्रकाश पूर्ण आहे.

गीत ३६:९. कां तर तुझ्याजवळ जीवनाचा उगम आहे; तुझ्या प्र-

काशानें आमच्या दृष्टीस प्रकाश असतो. प्रगट. २१:२३. आणि नगरांत सूर्याचा किंवा चंद्राचा प्रकाश पडण्याची गरज नव्हती, कां कीं देवाच्या गौरवानें तें प्रकाशित केलें, आणि कोंकरा त्याचा प्रकाश होता. २२:५. यशा. २:५. (७५०.)

## २१ आकाशलोकामध्यें पूर्ण पवित्रता आहे.

एफस. ५:२७. यासाठीं कीं त्यानें तिला गौरवी मंडळी आपल्याजवळ ठेवावी, तिला डाग किंवा सुरकुती किंवा अशांतील कांहीं नसावें तर ती पवित्र व ठपक्याविरहित व्हावी ह्मणून. २५,२६. प्रगट. २१:२७. आणि कांहीं विटाळविणारें आणि अमंगळ व लबाडी करणारें त्यांत जाणार नाहीं. केवळ ज्यांचीं नांवें कोंकऱ्याच्या जीवनाच्या पुस्तकांत लिहिलेलीं ते. गीत १७:१५. योहान्न ३:२.

## २२ आकाशलोक ही विसाव्याची जागा.

इब्री ४:३. विश्वासणारे आह्मी तर विसाव्यांत जातों; जसें त्यानें ह्मटलें तसें कीं, यास्तव म्या आपल्या रागानें शपथ वाहिली कीं, ते माझ्या विसाव्यांत जाणारच नाहींत; जरी जगाच्या मांडण्यापासून कामें झालीं होतीं तरी. ९. तर देवाच्या लोकांसाठीं विसावा राहिला आहे. २ थेस्स. १:६,७. प्रगट. १४:१३. (४३६.)

## २३ आकाशलोकांत ख्रीस्त व ईश्वर यांची समीपता होईल.

योहान्न १७:२४. हे बापा, मी असें इच्छितों कीं, जेथें मी आहें तेथें त्वां जे मला दिल्हे त्यांनींहि मजपाशीं असावें, यासाठीं कीं जें माझें गौरव त्वां मला दिल्हें तें त्यांनी पाहावें; कां कीं जगाचा पाया घातल्यापूर्वीं त्वां मजवर प्रीति केली. २२,२३. प्रगट. २२:४. आणि ते त्याचें तोंड पाहतील, आणि त्याचें नांव त्यांच्या कपाळांवर होईल. (३४२.)

## २४ आकाशलोकांत पूर्ण व निरंतर सुख आहे.

गीत १६:११. तूं मला जीवनाची वाट कळविसील; तुझ्या समोर संतोषाचें पुरेपण; तुझ्या उजव्या हातीं सुखें सर्वकाळ आहेत. ३६:८. ८४:११. ९७:११. प्रगट. २१:४. आणि देव त्यांच्या डोळ्यांपासून प्रत्येक अश्रु पुसून टाकील, आणि मरण अणखी होणार नाहीं, शोकहि

नाहीं व रडणें नाहीं, कष्ट अणखी होणारच नाहीं, कां तर पहिल्या गोष्टी होऊन गेल्या. ३. ७:१५,१६,१७. यशा. ५१:११. १पेत्रस. १४:१३. यहू. २४.

## २५ आकाशलोकांतील संपत्ति मान गौरव आणि प्रतिफळ.

मात्थी १३:४३. तेव्हां न्यायी आपल्या बापाच्या राज्यांत सूर्यासारिखे प्रकाशतील. ज्याला ऐकायास कान आहेत तो ऐको." १९:२८. १करिंथ. २:९. परंतु लिहिलें त्याप्रमाणें, देवानें आपल्या प्रीति करणाऱ्यांसाठीं ज्या गोष्टी तयार केल्या, त्या डोळ्यांनें पाहिल्या नाहींत, व कानानें ऐकिल्या नाहींत व माणसाच्या अंतःकरणांत आल्या नाहींत. ३:२१ २२,२३. लूक. २२:२८,३०. रोम. ८:१७,१८,३२. यशा. ६४:४. २करिंथ ४:१७. इब्री. ११:१६. प्रगट. १:५,६. २१:२,७. २२:५ (३५७.)

## २६ आकाशलोक हा आत्मिक न कोमणारा आणि अविनाशी आहे.

१पेत्रस. १:४,५. अविनाशी व निर्मळ व न कोमणारें वतन, तुह्मासाठीं आकाशामध्यें राखलेलें, तें प्राप्त व्हावें ह्मणून. ते तुह्मी, जें तारण शेवटल्या वेळेस प्रगट होण्यास तयार आहे, तें पावण्यासाठीं देवाच्या शक्तीनें विश्वासाकडून राखलेले आहां. यशा. ६०:२०. मात्थी ६:२०. २२:३०. २५:४६. १करिंथ. १५:५०.

## २७ आकाशलोकांतलें वतन हें देवभक्तांस त्यांच्या पुण्यावरून मिळतें कीं काय ?

यहेज्के. ३६:३२. प्रभु परमेश्वर ह्मणतो कीं, मी तुह्माकरितां हें करितों, असें नव्हे, ह्मणून तुह्माला कळो, इस्राएलाच्या वंशानो, तुह्मी आपल्या आचारामुळें लज्जित व शरमलेले व्हा. (१७०, ३४८, ३५३.)

# आर्जव.

## २८ आर्जव हें साधारण व नाशकारक पाप आहे.

ईयो. १७:५. जर कोणी आपले मित्र शत्रूच्या हातीं लुटायाला दि-

ल्हे तर त्याच्या लेंकराचे डोळे खुंटतील. ३२:२१,२२. गीत १२:३. सर्व फुसलावणाऱ्या ओंठांस व कपटी मनानें बोलणाऱ्या जिभेला परमेश्वर कापून टाकील. नीति २०:१९. २४:२४. २६:२८. २८:२३. २९:५. (७०२–३, ७२९, ३०१.)

# आतिथ्य.

## २९ आतिथ्य करणें–यास आश्वासन.

१ पेत्रस. ४:९. कुरकूर न करितां एकमेकांचा पाहुणचार करा. रोम. १२:१०, १३. १ तीम. ३:२. ( तित. १:८. ) इब्री. १३:२ मात्थी १०:४०–४२. (६०२.)

## ३० आतिथ्य करण्याचीं उदाहरणें.

उत्प. १८:२. आणि त्यानें आपले डोळे वर करून पाहिलें; तेव्हां पाहा, तीन पुरूष त्याजवळ उभे राहिले, मग तो पाहून त्यांस भेटायास राहोटीच्या दारापासून धांवला आणि भूमीकडे लवला. ३–७. १९: १–३. ईयो. ३१:३२. प्रेषि. २८:७. ३ योहान्न ५,६. (७००,२०३.)

# आनंदवृत्ति.

## ३१ आनंदवृत्ति बाळगण्याचा धर्म व लाभ.

नीति १५:१३. हृदयांतील संतोषानें तोंडाला तेज येतें, परंतु हृदयाच्या क्लेशानें आत्मा मोडतो. १४:३०. १५:१५. १७:२२. योहा. १६: ३३. मजकडून तुह्मी शांति पावावी ह्मणून म्यां तुह्मास या गोष्टी सांगितल्या आहेत; जगामध्यें तुह्मास संकट होईल, परंतु धीर धरा, म्यां जगाला जिंकिलें आहे. नहे. ८:१०. (गीत ११९:८०.) १ थेस्स. ५: १६. (११८,५४४.)

# आब्राहामीक मंडळी.

## ३२ आब्राहामीक मंडळीशीं ईश्वराचा करार.

गल. ३:९. यास्तव जे विश्वासाचे ते विश्वासी आब्राहामासहित आशीर्वाद पावतात. १४,१८,२९. मीखा ७:२०.

## ३३ आब्राहामीक मंडळीसीं ईश्वराचा जो करार त्याचा पाया खरा धर्म आहे.

रोम. २:२८,२९. का कीं बाहेरून यहूदी तो यहूदी नव्हे, आणि जी सुंता बाहेरून शरिरांत आहे ती सुंता नव्हे; तर आंतून यहूदी तो यहूदी होय; आणि जी विधिसंबंधी तो नव्हे, पण जी आत्म्यासंबंधी ह्मणजे अंतःकरणाची, ती सुंता होय; तिची तर प्रशंसा मनुष्यांकडून नव्हे, तर देवाकडुन आहे. निर्ग. १९:५. लेवी. २६:४१,४२. १राजा. ८:२३. गीत ७८:१०. गल. ३:९,२९. (४५५.)

## ३४ आब्राहामासीं जो करार त्याचा शिक्का सुंता असा होता.

उत्प. १७:१०. मजमध्यें व तुझ्यामध्यें व तुझ्यानंतर तुझ्या संतानामध्यें जो माझा करार तुह्मी पाळाल, तो हाच कीं तुह्मामधील प्रत्येक पुरुषाची सुंता करावी. १३. रोम. ४:११. आणि असुंती असतांना त्याचा विश्वास, याच्या न्यायीपणाचा शिक्का होण्याकरितां सुंता ही खुण त्याला मिळाली; यासाठीं कीं जे असुंती असतांना विश्वास ठेवितात त्या सर्वांचा तो बाप व्हावा, जसें कीं त्यांसहि न्यायीपण मोजावें.

## ३५ आब्राहामासीं जो करार तो विश्वासणाऱ्यांच्या संततीलाहि आशीर्वाद मिळाला असा होता कीं काय?

उत्प. १७:७, आणि तुझा व तुझ्या मरणानंतर तुझ्या संतानांचा देव असा होण्यास मी आपला करार मजमध्यें व तुजमध्यें, आणि तुझ्यानंतर तुझ्या संतानामध्यें त्यांच्या पिढ्यांत सर्वकाळ करार असा स्थापीन. १९. २६:२४. प्रेषि. २:३९. का तर तें वचन तुह्मास व तुमच्या लेंकरांस, आणि सर्व जे दूर, जितक्यांस आमचा देव प्रभु बोलावील त्यांस आहे. अनु. ३०:१९. २राजे. १३:२३. गीत १०३:१७,१८. यशा. ५९:२१. उत्प. २६:२४. (१७.)

## ३६ आब्राहामीक मंडळीसीं देवाचा जो करार तो जाथूचा आहे.

गल. ३:१७,२९. तर मी असें ह्मणतों कीं, ख्रीस्ताविषयीं देवानें पूर्वी केलेला करार, तो चारशें तीस वर्षांनंतर झालेलें नेमशास्त्र याच्यानें

रद्द करवत नाहीं, असें कीं वचनाला व्यर्थ करावें. आणि तुह्मी जर ख्रीस्ताचे तर आब्राहामाचें संतान आणि वचनाप्रमाणें वतनदार आहां. रोम. १५:८.

# आब्रु.

## ३७ आब्रूचें मोल– बेआब्रु करण्याचें पाप.

नीति २२:१. पुष्कळ धनापेक्षां प्रतिष्ठा, आणि रूपें व सोनें यांपेक्षां सत्प्रसाद उत्तम आहे. २५:१८. उपदे. ७:१. (३०२,३०३.)

# आमंत्रणें.

## ३८ आमंत्रणें शुभवर्त्तमानांतल्या उपायांच्या आधारावरून केलीं आहेत.

यशा. ४५:२२. अहो पृथ्वीच्या सर्व सीमांनो, मजकडे मन लावून तरा, का कीं मीच देव आहें, आणि दुसरा कोणी नाहीं. ५५:१–३. प्रगट. २२:१७. आणि आत्मा व नवरी हीं ह्मणतात कीं, ये आणि जो ऐकतो तो ह्मणो, ये, आणि तान्हेला येवो, आणि जो इच्छितो तो जीवनाचें पाणी फुकट घेवो. ३:२०. माथी ११:२८–३०. २२:२–४ लूक १४:१७. योहा. ७:३७. (७८,१६४.)

## ३९ मित्र कलहांचीं आमंत्रणें.

यशा. १:१८. परमेश्वर ह्मणतो, याहो, आपण विवाद करूं; तुमचीं पापें जरी लाक्षेसारिखीं असलीं तरी तीं बर्फासारिखीं पांढरीं होतील; किर्मिजाप्रमाणें जरी तांबडीं असलीं तरी स्वच्छ लोंकरीसारिखीं होतील. यहेज्के. ३३:११. त्यांस सांग, प्रभु परमेश्वर ह्मणतो कीं, मी आपल्या जिवाची शपथ वाहतों कीं, निश्चयें मी दुष्टाच्या मरणाविषयीं संतोषत नाहीं; परंतु जर दुष्ट आपल्या मार्गापासून फिरला, आणि वांचला, तर संतोषतो; अहो इस्राएलाच्या वंशानो, तुह्मी फिरा, आपल्या कुमार्गांपासून फिरा, तुह्मी का मराल. नीति १:२०–२३. इर्म. २२:२९. मीखा. ६:१–३. (२४२,६९–७०.)

## ४० ईश्वरी आमंत्रणाचा भावार्थ उघड आहे.

यशा. ४८:१८. जर त्वां माझ्या आज्ञांकडे कान दिल्हा असता, तर

तुझें कुशल नदीसारिखें, व तुझा न्याय समुद्राच्या लाटांप्रमाणें झालें असतें. लूक. १९:४१,४२. मग तो जवळ आल्यावर नगर पाहून त्याविषयीं रडून बोलला कीं, त्वां या आपल्या दिवसांत देखील आपल्या शांतीच्या गोष्टी जाणल्या असत्या, तर किती बरें होतें! परंतु आतां त्या तुझ्या दृष्टीपासून लपविल्या आहेत. गीत ८१:१३–१५. (६९,७३,७८.)

## ४१ आमंत्रणें नाकारतात– निमित्तें.

नीति १:२४, म्या बोलाविलें, आणि तुह्मी उपेक्षा केली; म्या आपला हात पुढें केला, आणि कोणी मानिलें नाहीं. २५. गीत ५८:४,५. जखा. ७:११–१३. मात्थी २२:२–६. लूक. १४:१७,१८. (१४५,७२-३–४,७३३.)

# आवेश.

## ४२ खोटा आवेश– उदाहरणें.

१ राजे. १८:२८. तेव्हां त्यांनीं मोठ्या शब्दानें हाक मारिली, आणि आपल्या रीतीप्रमाणें सुऱ्यानीं व भाल्यांनीं आपणास घाव मारून घेतले, एवढे कीं त्यांवर रक्त वाहिलें. मात्थी २३:१५. अहो शास्त्री व परोशी, तुह्मा ढोंग्यांस हाय हाय; कारण कीं तुह्मी एक शिष्य मिळवायासाठीं समुद्र व भूमी फिरतां, आणि मिळाला ह्मणजे तुह्मी त्याला नरकास योग्य आपल्याहून दुप्पट करितां. प्रेषि. २२:३. रोम. १०:२. गल. १:१३,१४.४:१७.

## ४३ खरा आवेश धरावा– उदाहरणें.

गल. ४:१८. तर चांगल्याचा सर्वदा आवेश धरणें हें चांगलें, आणि मी तुह्माजवळ प्रत्यक्ष आहें तेव्हांच केवळ नव्हे. तित. २:१४. आणि आदाम भुलला नाहीं, परंतु स्त्री भुलून उल्लंघनांत पडली. गण. २५:११–१३. गीत ११९:१३९. २ करिंथ. ७:११. कलस. ४:१२, १३. (१५७.)

## ४४ जग, देहाच्या हावा व सैतान हीं जिंकून आकाशलोकांतलें वतन मिळविण्यास आवेशाचें अगत्य आहे.

लूक. १३:२४. तेव्हां तो त्यांस ह्मणाला, अरुंद दरवाज्यानें आंत जायाला मोठा लगट करा, कारण कीं मी तुह्मास सांगतों, बहुत आंत जायास झटतील परंतु त्यांच्यानें जावणार नाहीं. एफस. ६:१२. का-

रण कीं आमची झोंबी रक्त व मांस यांसीं नव्हें, तर सत्तांसीं, अधिकारांसीं, या जगांतील अंधाराच्या सत्ताधाऱ्यांसीं आकाशांतील दुष्ट आत्म्यांसीं आहे. करिंथ. ९:२६,२७. १पेत्रस. ४:७

## आशा.

### ४५ आशेपात्र योग्य व मुख्य असा कोण आहे ?

गीत ४२:५. हे माझ्या जिवा, तूं कां खिन्न झाला आहेस? आणि मजमध्यें कां तळमळतोस? देवाची वाट पाहा, कां तर त्याच्या दर्शनानें जें तारण, त्यामुळें त्याची स्तुति मी पुढें करीन. रोम. ५:२. ज्या कृपेंत आह्मी आहों तींत त्याकडूनच आमचा प्रवेशहि विश्वासानें झाला, आणि आह्मी देवाच्या गौरवाच्या आशेमुळें आनंद करितों. १पेत्रस. १:२१. ते तुह्मी त्याच्या योगानें देवावर विश्वासलां, त्यानें त्याला मेलेल्यांमधून उठविलें व त्याला गौरव दिल्हें, यासाठीं कीं तुमचा विश्वास व आशा देवावर व्हावी.

### ४६ आशेचा निर्धार धरावा.

इब्री ६:११,१२. आणि आमची इच्छा आहे कीं, तुमच्यांतल्या प्रत्येकानें आशेचा निर्धार होण्यासाठीं, तसाच प्रयत्न शेवटापावेतों करून दाखवावा. ह्मणजे तुह्मी आळसी न होतांना, जे विश्वासानें व धैर्यानें वचनाचें फळ पावले आहेत, त्यांस अनुसरणारे व्हावें. १७–२०. ईयो. १९:२५. रोम. ८:३५,३७. २तीम. ४:६–८. १योहान्न ३:१८,१९.

## आळस.

### ४७ आळसाचें वर्णन, निषेध व शासन.

नीति ६:६. आळशारे, मुंगीकडेस जा, तिचे मार्ग पाहून तूं विद्वान हो. ५. १५: १९. १८:९. १९:१५. २०:४,१३. २१:२५,२६. २३:२१. २४:३०–३४. उपदे. १०:१८. २थेस्स. ३:१०–१२. १तीम. ५:१३. (१५७, ७३६.)

---

## इंद्रियदमन.

### ४८ इंद्रियदमनाचें अगत्य.

२पेत्रस. १:५,६. तर याच हेतूनें आह्मी सर्व नेट लावून आपल्या वि-

श्वासासीं सात्विकपण व सात्विकपणासीं जाणणें, व जाणण्यासीं इंद्रियदमन व इंद्रियदमनासीं सहनता व सहनतेसीं सुभक्ति जोडा. १ करिंथ. ९:२५. गल. ५:२२–२४. तित. १:८. (६, ५२३)

# ईश्वर.

## ४९ ईश्वराविषयीं मनुष्यांस कांहीं अंतर्ज्ञान आहे काय ?

रोम. २:१४,१५. कां तर ज्या विदेशी लोकांस शास्त्र नाहीं, ते स्वभावानें शास्त्रांतील गोष्टी पाळितात, तेव्हां त्यांस जरी शास्त्र नाहीं तरी ते आपणच आपल्याला शास्त्र आहेत. ते आपल्या अंतःकरणांत शास्त्रानें लिहिलेला आहे असें प्रगट करितात: त्यांस त्यांचा सदसद्विवेक साक्षी आहे, आणि त्यांच्या कल्पना त्यांस परस्परें दोष लावितात किंवा अनुमोदन देतात. १:१९. ईयो. ३२:८. प्रेषि. १७:२८,२९. (७४६)

## ५० ईश्वर आपल्या कृत्यांवरून प्रगट होतो.

गीत ९९:१. परमेश्वर राज्य करितो, राष्ट्रांनी कांपावें, तो करूबांवर बसतो, पृथ्वीनें थरथरावें. २. ७५:१. रोम. १:२०. कारण कीं त्याच्या अदृश्य गोष्टी, ह्मणजे त्याची अनादि शक्ति व देवपणा, हीं निर्मिलेल्या पदार्थांवरून जाणलेलीं असतां सृष्टीच्या उत्पत्तीपासून स्पष्ट दिसून येतात, यास्तव ते निरुत्तर आहेत. ११:३६. इब्री. ३:४. गीत ९:१६.

## ५१ ईश्वर नीतिज्ञकर्त्ता आहे व त्याला वास्तविक मनोवृत्ती आहेत.

गीत ७:११. देव नीतिमानाचा न्याय करितो, आणि सर्व दिवस देवाला राग येतो. १०३:१३. बाप पुत्रावर जसी ममता करितो, तसा परमेश्वर आपल्या भिणाऱ्यांवर ममता करितो. १४. ७:११. उत्प. ६:६. होशे. ११:८. जफान्. ३:१७. मात्थी ३:१७. १ योहान्न ४:८. (६८,७५,८३.)

## ५२ ईश्वराचा मुख्य हेतु स्वगौरव असा आहे.

नीति १६:४. परमेश्वरानें आपणासाठीं सर्व केलें, दुष्टहि अरिष्टाच्या

दिवसासाठीं केला. प्रगट. ४:११. हे प्रभू, गौरव व मान व सामर्थ्य घ्यायास तूं योग्य आहेस, कां कीं त्वां सर्व वस्तु उत्पन्न केल्या, आणि तुझ्या इच्छेकडून त्या आहेत व उत्पन्न झाल्या. गीत १०६:८. यशा. ४२:८. ४३:७,२१. ४८:११. यहेज्के. २०:९. ३६:३२. १करिंथ. १५:२८. कलस्. १:१६. (१४९–५०,३९५.)

# ईश्वराच्या अस्तित्वाचा प्रकार.

## ५३ ईश्वरी ऐक्यता. ईश्वर एकच आहे.

यशा. ४५:५. मीच परमेश्वर, दुसरा कोणी नाहीं, मजवांचून कोणी देव नाहीं, तरीं त्वां मला जाणलें नाहीं, तरी म्या तुझी कंबर बांधिली आहे. ४४:६–८. योहान्न १७:३. आणि सर्वकाळचें जीवन हेंच आहे कीं, जो केवळ खरा देव त्या तुला, व जो येशू ख्रीस्त त्वां पाठविला त्याला त्यांनी जाणावें. अनु. ४:३५. ६:४. ३२:३९. २शम. ७:२२. २राजा. १९:१५. नहेम. ९:६. १करिंथ. ८:६. १तीम. १:१७. याको. २:१९.

## ५४ देवपणांत अनेक आहेत कीं काय?

१योहान्न ५:७. कारण कीं आकाशांत तिघे साक्ष देणारे, बाप, शब्द व पवित्र आत्मा, असे आहेत; आणि हे तिघे एक आहेत. उत्प. १:२६. ३:२२. ११:७. यशा. ६:८. दानी. ४:१७. मात्थ. २८:१९. २करिंथ. १३:१४. एफस. २:१८. १पेत्रस. १:२. (२५७–८, ४११.)

# ईश्वराचा न्यायनिष्ठ अम्मल.

## ५५ ईश्वराच्या आज्ञा मानणाऱ्यांस सांप्रत कल्याण व सर्वकाळचें जीवन यांचीं वचनें.

१तीम. ४:८. कां कीं शरिरीं कसरत थोडीच उपयोगी आहे, परंतु सुभक्ति अवघ्याविषयीं उपयोगी आहे, तिला तर सांप्रतच्या व होणाऱ्याहि जीवनाचें वचन आहे. प्रगट. २२:१४. त्याच्या आज्ञा पाळणारे धन्य, कारण कीं जीवनाच्या झाडावर त्यांची सत्ता होईल, आणि

ते वेशींमधून नगरांत येतील. निर्ग. २०:६. लेवी. १८:५. अनु. ३२:४६,४७. नहे. ९:२९. गीत १९:११. २५:१०. १०३:१७,१८. नीति ३:१,७. यशा. ९:१९,२०. यहेज्के. १८:५,९. २०:१३. मात्थ. ७:२१, २४,७५. १९:१७. लुका १०:२७,२८. योहा. १२:२६. रोम. १०:५. (५६९, ४५३, ३८१.)

## ५६ ईश्वराच्या आज्ञा मोडणाऱ्यांस सांप्रत व सर्वकाळचा दंड.

गीत ३४:१६. परंतु परमेश्वराचें तोंड वाईट करणाऱ्याविरूद्ध यासाठीं आहे कीं, त्यांची आठवण पृथ्वींतून काढून टाकावी. १ करिंथ. ६:९. अन्यायी यांस देवाच्या राज्यांत वतन मिळणार नाहीं, हें तुह्मास ठाऊक नाहीं काय? फसूं नका; शिंदळ व मूर्तिपूजक व व्यभिचारी व स्त्रीसारिखा संभोग देणारे व पुरूषसंभोग घेणारे यांस वतन नाहीं. यशा. १:२०. रोम. २:७–१०. (५७०, ३८६–९२,८.)

# ईश्वराचे आवश्यक गुण.

## ५७ सनातनता.

गीत ९०:२. डोंगर उपजले आणि त्वां पृथ्वी व सृष्टि यांचा प्रारंभ केला यापूर्वी तूं सर्वकाळापासून सर्वकाळपर्यंत देव आहेस. ९३:२. १०२:२७. १ तीम. १:१७. तर सर्वकाळचा राजा, अविनाशी, अदृश्य, एकच ज्ञानी देव, याचा सन्मान व गौरव सदासर्वकाळ असो; आमेन. ६:१५,१६. अनु. ३३:२७. यशा. ४४:६. ५७:१५. हबा. १:१२. (२५८, ३.)

## ५८ भविष्य ज्ञान.

प्रेषि. २:२३. तोच देवाच्या ठरविलेल्या निश्चयाप्रमाणें व भविष्यज्ञानाप्रमाणें तुमच्या स्वाधीन झाल्यावर, तुह्मी त्याला धरून पापी हातांनीं खांबावर खिळून मारिलें. १५:१८. देवाचीं सर्व कार्यें त्याला अनादिकाळापासून ठाऊक आहेत. यशा. ४६:९,१०. (६४.)

## ५९ थोरपण, ऐश्वर्य आणि श्रेष्ठता.

१ काल. २९:११. हे परमेश्वरा, मोठेपणा व पराक्रम व तेज व जय

व मान, हीं तुझीं; कारण कीं जें आकाशांत व पृथ्वींत तें सर्व तुझें; हे परमेश्वरा, राज्य आणि सर्वांवरला मुख्य अधिकार तुझा आहे. १२. नहे. ९:६. ईयो. ११:७–९. २६:१४. ३६:२६. ३७:२२,२३. गीत २९:४. ४७:७. ९३:१. १०४:१–४. १४५:३ यशा. ४०:१२–१८. दानि. ४:३५. नहू. २:३–६. (४२१, ७९, १४८.)

## ६० स्वभावसिद्ध सुख.

१तीम. १:११. धन्य देवाच्या गौरवाचें जें शुभवर्त्तमान मला सोंपिलें आहे, त्याप्रमाणें. ६:१५. जो धन्य व एकच स्वामी, जो राजांचा राजा व प्रभूंचा प्रभु. रोम. १:२५. ९:५. २करिंथ ११:३१. (६८.)

## ६१ निराकारपण.

योहा. १:१८. देवाला कोणी कधींहि पाहिलें नाहीं; जो एकुलता पुत्र बापाच्या उरासीं असतो त्यानें तो कळविला आहे. ४:२४. देव आत्मा आहे, आणि जे त्याला भजतात त्यांनी आत्म्यानें व खरेपणानें त्याचें भजन केलें पाहिजे. कल. १:१५. १तीम. ६:१६. इब्री ११:२७.

## ६२ अपालटपणा.

मला. ३:६. मी परमेश्वर आहें, माझें मन फिरत नाहीं; म्हणून याकोबाच्या संतानानो, तुह्मी नाश पावलां नाहीं. इब्री १३:८. येशू ख्रीस्त, काल व आज व सर्वकाळपर्यंत, तसाच आहे. गण. २३:१९. १शमु. १५:२९. ईयो. २३:१३. गीत १०२:२५–२७. याको. १:१७. (९५.)

## ६३ सर्वशक्ति.

उत्प. १७:१. जेव्हां आब्राम नव्याण्णव वर्षांचा झाला, तेव्हां परमेश्वरानें आब्रामाला दर्शन देऊन त्याला म्हटलें कीं, मी सर्वसमर्थ देव आहें; तूं माझ्यासमोर चालून पूर्ण अस. मात्थी १९:२६. मग येशूनें त्यांकडे पाहून म्हटलें, माणसाच्यानें हें होत नाहीं, परंतु देवाच्यानें सर्व होतें. ईयो. ९:१२. यशा. ४३:१३. इर्म. ३२:१७. प्रगट. १:८. ११:१७. १९:६. (२५८, (५) ७९, १३२, ४३९.)

## ६४ सर्वज्ञता.

१काल. २८:९. "आणि हे शलमोना माझ्या पुत्रा, तूं आपल्या बा-

पाच्या देवाला ओळखून पूर्ण मनाने व जिवाच्या आवडीने त्याची सेवा कर; कारण कीं परमेश्वर सर्वांच्या अंतःकरणांचा झाडा घेतो, आणि कल्पनांचे सर्व विचार जाणतो; जर तूं त्याचा शोध करसील, तर तो तुला पावेल; आणि जर तूं त्याला सोडसील, तर तो तुला सर्वदा टाकील. इब्री ४:१३. आणि त्याच्या समोर कांहीं उत्पन्न झालेली वस्तु अदृश्य नाहीं; ज्याजवळ आमची झडती, त्याच्या दृष्टीस अवघीं देखील नग्न व उघडीं आहेत. १ शमु. २:३. १६:७. १ राजे ८:३९. ईयो. ११:११. ३४:२१,२२. गीत ११:४. ४४:२१. ९४:९. १३९:१–६,११,१२. १४७:५. नीति ५:२१. १५:३,११. १७:३. २१:२. २४:११,१२. यशा. ४०:२८. इर्म. २३:२३,२४. ३२:१९. यहेज्के. ११:५. प्रेषि. १:२४. १ योहान्न ३:२०. (२५८, (७) ५८.)

## ६५ सर्वव्यापकता.

इर्म. २३:२३,२४. परमेश्वर ह्मणतो, मी केवळ जवळचा देव आहें, आणि दुरचाहि देव नाहीं काय? परमेश्वर ह्मणतो, मनुष्य गुप्तस्थानांत लपेल आणि त्याला मी पाहणार नाहीं काय ? मी आकाशांत व पृथ्वींत व्याप्त नाहीं काय ? असें परमेश्वर ह्मणतो. गीत १३९:३,५–१०. मात्थी १८:२०. एफस. १:२३. (२५८, (६.))

## ६६ स्वयंभूत्व.

योहान्न ५:२६. कारण कीं जसें स्वतां बापामध्यें जीवन आहे, तसें स्वतां पुत्रामध्यें जीवन राहावें असें त्याने त्याला दिल्हें आहे. ६:५७. जसें जिवंत बापाने मला पाठविलें आणि मी बापाकडून वांचतों, तसें जो मला खातो तोहि मजकडून वांचेल. निर्ग. ३:१४. अनु. ३२:४०. इर्म. १०:१०. प्रेषि. १७:२४,२५. १ तीम. ६:१५,१६.

## ६७ चातुर्य आणि ज्ञान.

ईयो. ५:१३. तो शाहाण्यांला त्यांच्या शाहाणपणांत धरितो आणि कुटिलांची मसलत उतावळीने फिसकती. रोम. ११:३३. देवाच्या विद्येची व ज्ञानाची संपत्ति किती अगाध ! त्याचे न्याय किती अतर्क्य! आणि त्याचे मार्ग किती अगम्य ! ३४. १६:२७. गीत १०४:२४. यशा. २८:२९. १ करिंथ. १:२५. एफस. १:८. ३:९,१०. कलस. २:२,३. यहू. २५. (१५६, १४८.)

# ईश्वराचे मानसिक गुण.

## ६८ ईश्वराला त्याच्या परोपकारिक योजना व कृत्यें यांवरून सुख होतें.

गीत १०४:३१. परमेश्वराचें गौरव सर्वकाळपर्यंत होत जाईल; परमेश्वर आपल्या कृत्यावर संतुष्ट होईल. इर्म. ९:२४. परंतु जो गौरव मानितो तो याविषयीं मानो कीं, तो समजतो व मला जाणतो कीं, मी परमेश्वर आहें, जो मी पृथ्वीवर दया, नीति व न्याय करितों; कां कीं यांत मी संतोषतों, असें परमेश्वर ह्मणतो. यशा. ६२:५. ६५:१९. यहेज्के. ५:१३. जफा. ३:१७. (५१, ६०.)

## ६९ ईश्वराचे परोपकार.

यहेज्के. १८:३२. कां कीं जो मरतो, त्याच्या मरणाविषयीं मी संतोषत नाहीं; ह्मणून तुह्मी आपणांला फिरवा, आणि वांचा, असें प्रभु परमेश्वर ह्मणतो. योहान्न ३:१६. कां तर देवानें जगावर एवढी प्रीति केली कीं, त्यानें आपला एकुलता पुत्र दिल्हा, यासाठीं कीं जो कोणी त्यावर विश्वास ठेवितो त्याचा नाश होऊं नये, तर त्याला सर्वकाळचें जीवन व्हावें. १४–१७. अनु. ५:२९. ३२:२९. गीत ११९:६८. मात्थी ५:४४,४५. रोम. ५:८. ८:३२. १थेस्स. ४:३. १तीम. २:३,४. २पेत्रस. ३:९. १योहा. ४:७–१०. (२४२, ७३, ७८, ९९, ३८–४०, १६९, ३५७.)

## ७० ईश्वराची करुणा.

गीत १०३,१३. बाप पुत्रावर जसी ममता करितो, तसी परमेश्वर आपल्या भिणाऱ्यांवर ममता करितो. २५:६. ३६:७. ६९:१६. ७८:३८. ८६:१५. १४५:८,९. याको. ५:११. पाहा, जे साहतात ते धन्य, असें आह्मी ह्मणतों; तुह्मी इयोबाच्या सहनतेविषयीं ऐकिलें आहे, आणि प्रभूकडून जो परिणाम तो पाहिला आहे कीं, प्रभु फार कनवाळू व दयाळु आहे. निर्ग. ३२:१४. न्याया. १०:१६. विल. ३:२२,३२,३३. होशे. ११:८. लूक. ६:३५. (७८, ३१६, १६९.)

## ७१ ईश्वराचा विश्वासुपणा.

अनु. ७:९. तर तूं हें जाण कीं परमेश्वर जो तुझा देव तोच देव:

तो विश्वासी देव; जे त्यावर प्रीति करितात व त्याच्या आज्ञा पाळितात, त्यांजवळ तो हजारांच्या पिढींपर्यंत करार पाळून त्यांवर दया करितो. १थेस्स. ५:२४. तुह्मास बोलावणारा विश्वासू, तो करीलच. यहो. २१: ४५. २३:१४. गीत ३६:५. ८९:२,३३,३४. ११९:९०. (६७२,८०, ३१०–३१२,४०३)

## ७२ ईश्वराची क्षांति व सहनशीलता.

नहे. ९:३०. तथापि त्वां त्यांजवर बहुत वर्षें दया केली, आणि आपल्या आत्म्याने आपल्या भविष्यवाद्यांकडून त्यांस निक्षून सांगितलें, परंतु ते कान देईनात ह्मणून त्वां देशांच्या लोकांच्या हातीं दिल्हें. २पेत्रस. ३:९. कित्येक जसें उशीर करणें मोजितात, तसें प्रभु वचनाविषयीं उशीर करीत नाहीं, तर तो आह्माविषयीं फार धीर धरितो, कोणांचा नाश व्हावा ह्मणून इच्छित नाहीं, तर सर्वांनी पश्चात्ताप करावा ह्मणून इच्छितो. उपदे. ८:११. रोम. २:४. ९:२२. १तीम.१:१६. १पेत्रस. ३:१९,२०. (२४९.)

## ७३ ईश्वराचें चांगुलपण आणि विनयवृत्ति.

गीत ३३:५. तो नीतिमत्वावर व न्यायावर प्रीति करितो; परमेश्वराच्या दयेने पृथ्वी भरलेली आहे. ८:३,४. ५२:१. १०७:८,९. ११३:४–६. ११९:६८. १४५:७,९. यशा. ५७:१५. तर उंच व थोरावलेला जो सर्व काळचा वस्ती करितो, ज्याचें नाम पवित्र आहे, तो असें ह्मणतो कीं, मी उंच व पवित्रस्थानांत वसतों, आणि चेंचरलेल्या व नम्र आत्म्याच्या जनासींहि वसतों, नम्रांच्या आत्म्याला जीव आणायाला आणि चेंचरलेल्यांच्या हृदयाला जीव आणायास. निर्ग. ३४:६. १काल. १६:३४. जखा. ९:१७. मात्थी १९:१७. (२४२,२४३,६९,७८,९९, ४०,३५७.)

## ७४ ईश्वराची पवित्रता आणि सुंदरता.

निर्ग. १५:११. हे परमेश्वरा, देवामध्यें तुझ्यासारिखा कोण! पवित्रतेने तुझ्यासारिखा महान कोण! स्तवण्याविषयीं भयमान्, चमत्कार कर्ता आहेस. जखा. ९:१७. तर त्याचें चांगलेंपण केवढें? आणि त्याचें सुंदरपण केवढें आहे? धान्य तरूणांस, आणि नवा द्राक्षारस तरूणींस तुकतुकीत करील. लेवी. ११:४४. १शम.२:२. ईयो. ४:१७,१८. ३४:१०, गीत ५:४,५. २२:३. २७:४. ४५:७. ७१:२२. ९०:१७.

९९:९. १११:९. १४५:१७. यशा. ६:३. २८:५. ३३:१७. हबा. १:
१३. प्रगट. १५:४. (२३८.)

## ७५ ईश्वराचें पाप्यांशीं पवित्र दुःख, क्रोध आणि संवाद.

नहू. १:६. त्याच्या रागापुढें कोण उभा राहील? आणि त्याच्या संतप्त क्रोधाच्या समयीं कोण उभा ठाकेल? त्याचा कोप अग्नीसारिखा ओतलेला आहे, आणि त्यामुळें खडक उपटून जातात. इब्री. ३:१७, आणि देव कोणावर चाळीस वर्षें रागें भरला होता? ज्यांनी पाप केलें त्यांवर, म्हणजे ज्यांचीं प्रेतें रानांत पडलीं त्यांवर कीं नाहीं? १८. उत्प.६:५,६. गण. ३२:१४. अनु. २५:१६. गीत ७:११–१३. १०:३. ११:५. ७८:४०. ९५:८–१०. नीति ११:२०. १५:९,२६. इर्म. १२:८. होशे. ७:२. ९:१५. १२:२. १३:७,८. मीखा ६:२. मार्क. ३:५. प्रगट. ६:१६,१७. (५१,८१,५५७,५८२, आणि परलोकींचा दंड.)

## ७६ ईश्वराचा निष्पक्षपात.

रोम. २:११. कां तर देवाला पक्षपात नाहीं. १ पेत्रस. १:१७. आणि जो बाप पक्षपातावांचून प्रत्येकाच्या कर्माप्रमाणें न्याय ठरवितो, त्याचें नांव जर तुम्ही घेतां, तर आपल्या प्रवासाच्या काळीं भयानें वर्त्तणूक करा. उत्प. १८:२५. अनु. १०:१७,१८. २ काल. १९:७. यहेज्के. १८:२५. प्रेषि. १०:३४. एफस. ६:९. (४०८.)

## ७७ ईश्वराचा न्याय व सात्विकपणा.

गीत १४५:१७. परमेश्वर आपल्या सर्व चालींनीं पवित्र; आणि आपल्या सर्व कृत्यांवर उपकारीक आहे. ३३:४,५. ४८:१०. ९२:१५. ९७:२. १११:३. ११९:१३७,१३८,१४२. प्रगट. १५:४, हे प्रभू, तुला कोण न भिईल, आणि तुझ्या नांवाचें गौरव कोण न करील? कां कीं तूं एकच पवित्र, म्हणून सर्व राष्ट्रें येऊन तुझ्या समोर भजतील, कारण कीं तुझे न्याय प्रगट झाले आहेत. ३. २ काल. १९:७. ईयो. ८:३. ३४:१२. ३७:२३. इर्म. ९:२४. (८१.)

## ७८ ईश्वराची दया, कृपा, ममता.

निर्ग. ३४:६,७. तेव्हां परमेश्वरानें त्याच्यापुढें जवळून जाऊन मोठ्यानें असें म्हटलें कीं, "परमेश्वर, परमेश्वर, दयाळू कृपाळू देव, मंद-

क्रोधी आणि फार दयेचा व सत्यतेचा; हजारोंसीं दया राखितो, अन्याय व उल्लंघणें व पाप यांची क्षमा करितो, आणि दोष्यांस निर्दोष ठरविणारच नाहीं; वडिलांच्या अन्यायाचें शासन लेंकरांवर व लेंकरांच्या लेंकरांवर तिसऱ्या व चवथ्या पिढीपर्यंत करितो." गण. १४:१८. अनु. ४:३१. गीत २५:६. ३६:७. ८६:५ १००:५. १०३:८–१०. १०६: ४४,४५. ११६:५. ११९:६४. १३८:८. दानी. ९:९. योए. २:१३. योना. ४:२. लुक. ६:३५,३६. एफस. २:४–७. (७०,७३,४०,१६३, ३५७.)

## ७९ ईश्वराचा सर्वाधिकार व स्वतंत्रता.

दानी. ४:३५. आणि पृथ्वींतले सर्व राहणारे कांहीं नाहीं, असे मानिलेले आहेत; आणि तो आपल्या इच्छेप्रमाणें आकाशांतल्या सैन्यांत आणि पृथ्वींतल्या राहणाऱ्यांमध्यें करितो; आणि त्याचा हात कोणाच्याने आकळवत नाहीं; अथवा तूं काय करितोस? असें कोणाच्याने त्याला ह्मणवत नाहीं. एफस. १:११. जो आपल्या इच्छेच्या योजनेप्रमाणें अवघीं चालवितो त्याच्या बेताप्रमाणें आह्मी पूर्वी नेमलेले होतों. इयो. २३: १३. ३३:१३. गीत ११५:३. १३५:६. यशा. ५५:१०,११. माथी ११:२५,२६. २०:१२–१६. रोम. ९:१५–१८. फिलि. २:१३. (८५–९३.)

## ८० ईश्वराची सत्यता.

गीत १००:५. कां तर परमेश्वर उत्तम, याची दया सर्वकाळपर्यंत, आणि त्याची सत्यता पिढीपिढीं असी आहे. १९:९. ८९:१४. ११९: १४२. १४६:६. प्रगट. १५:३. आणि ते देवाचा दास मोशे याचें गायन, व कोंकऱ्याचें गायन गातां ह्मणाले, हे प्रभू देवा, सर्वसत्ताधारी, तुझीं कर्मे मोठीं व आश्चर्यकारक; हे पवित्रांच्या राजा, तुझे मार्ग न्यायी व खरे आहेत. निर्ग. ३४:६. गण. २३:१९. अनु. ३२:४. १ शमु. १५:२९. यशा. २५:१. दानी. ४:३७. (७१.)

## ८१ ईश्वराचा सूड उगविण्याचा न्याय.

नहू. १:२, देव आवेशी, आणि परमेश्वर सूड घेणारा आहे; परमेश्वर सूड घेणारा, आणि रोषयुक्त आहे; परमेश्वर आपल्या शत्रूंचा सूड घेईल, आणि तो आपल्या वैऱ्यांसाठीं रोष राखितो. ६. इब्री. १२:२९. कां तर आमचा देव भस्म करणारा अग्नि असा आहे. निर्ग. १५:३.

अनु. ४:२४. ३२:३५,३९–४२. गीत ७८:४९–५१. ९७:३. यशा. ३०:२७. ३५:४. ५९:१७–१९. ६६:१४,१५. विल. २:४. यहेज्के. ७:८. रोम. ३:५,६. ११:२२. १२:१९. २करिंथ. ५:११. २थेस्स. १:६–८. गीत १८:६–१४. (७५,७७, व परलोकींचा दंड.)

## ८२ सूड उगविण्याचा न्याय हा ईश्वरी गुण प्रीय, इच्छास्पद व समाधानकारक आहे.

अनु. ३२:४३. अहो राष्ट्रें, तुह्मी त्याचा लोकांसंगतीं उल्हास करा; कां तर तो आपल्या सेवकांच्या रक्तपाताचे सूड घेईल; आपल्या वैऱ्यांची सूडरूप फेड करीलच; परंतु आपल्या भूमीवर व आपल्या लोकांवर प्रसन्न होईल. गीत ४८:११. सीयोन डोंगराने आनंद करावा; तुझ्या न्यायांमुळें यहूदाच्या कन्यांनी हर्षावें. २८:४,५. ५८:९,१०. ९७:८. १३६: १,१०,११. इत्या. इर्म. ११:१९,२०. यहेज्के. ५:१३. (२७०,३९६.)

## ८३ ईश्वराचा आवेश.

यशा. ४०:२८. काय त्वां जाणलें नाहीं, त्वां ऐकिलें नाहीं काय? कीं सनातन देव परमेश्वर पृथ्वीच्या सीमांचा उत्पादक थकत नाहीं, आणि भागत नाहीं, त्याच्या बुद्धीचा शोध लागत नाहीं. ५९:१७. आणि त्याने न्याय उरस्त्राणाप्रमाणें घातला, व तारण शिरस्त्राणाप्रमाणें आपल्या डोईवर ठेविलें, आणि तो सूड उगवण्याचीं वस्त्रें पांघरूणासारिखीं ल्याला, मग झग्याप्रमाणें आवेशाने वेष्टिलेला होता. ९:७. अनु. ७:१०. यहेज्के. ५:१३. २पेत्रस. ३:९. (५१.)

# ईश्वराचे हक्क.

## ८४ ईश्वराला प्राणिमात्रावरील हक्क आहे.

१काल. २९:११. हे परमेश्वरा, मोठेपणा व पराक्रम व तेज व जय व मान, हीं तुझीं; कारण कीं जें आकाशांत व पृथ्वींत तें सर्व तुझें; हे परमेश्वरा, राज्य आणि सर्वांवरला मुख्य अधिकार तुझा आहे. गीत २४:१. पृथ्वी व तिचा भरणा, भूमि व तींतले राहणारे परमेश्वराचे आहेत. १००,३. हें जाणा कीं, तोच परमेश्वर, तोच देव; त्याने आह्मास उत्पन्न केलें; आह्मी आपल्या आपणच झालों नाहीं. आह्मी त्याचा लोक, आणि त्याच्या चारण्याचा कळप. ५०:१०–१२. ९५:५–७. यहेज्के. १८:४. रोम १४:८.

८५. ईश्वराला सृष्टींतील नेम स्थापण्याचा व स्वाधीन ठेविण्याचा हक्क आहे.

नीति ३:१९. परमेश्वरानें ज्ञानाकडून पृथ्वीचा पाया घातला, बुद्धीकडून त्यानें आकाशें स्थापिलीं. ईयो. ३८:३६. गीत ११९:९०. इर्म. ३१:३५. ३३:२५,२६.

८६ ईश्वराला नीतिसंबंधी नेम लावून देण्याचा हक्क आहे.

१ काल. २९:११. हे परमेश्वरा, मोठेपणा व पराक्रम व तेज व जय व मान, हीं तुझीं; कारण कीं जें आकाशांत व पृथ्वींत तें सर्व तुझें; हे परमेश्वरा, राज्य आणि सर्वांवरला मुख्य अधिकार तुझा आहे. निर्ग. २०:२,३. मात्थी ४:१०. २२:३७,३८. (१२४.)

८७ ईश्वराला पुनर्जन्म देणें किंवा न देणें—उपाय सफळ किंवा निष्फळ करणें—मनुष्याचें अंतःकरण वळविणें व आवरणें यांचा हक्क आहे.

रोम ९:२०,२१. आहाहा! अरे माणसा, जो देवासीं विवाद करितोस असा तूं कोण आहेस? घडलेली वस्तु घडणाऱ्याला, त्वां मला असें कां केलें, असें ह्मणेल काय? एकाच गोळ्यापासून एक पात्र उत्तम कार्यासाठीं व एक नीच कार्यासाठीं करावें, ह्मणून कुंभाराला मातीवर अधिकार नाहीं काय? —२३. अनु. २९:४. १ शम. २६:१९. गीत ३३:१४,१५. यशा. ४५:९. मात्थी १३:१०,११. २०:१५,१६. २ तीम. २:२५. (७९, १३७, ६६६.)

८८ ईश्वराला माणसांची परीक्षा पाहण्याचा हक्क आहे.

इर्म. ६:२१. याकरितां परमेश्वर ह्मणतो कीं, पाहा, मी या लोकांपुढें अडखळे ठेवीन, तेव्हां ते बाप व पुत्र मिळून त्यासीं अडखळतील; शेजारी व त्याचे सोबती नाहींसे होतील. १ करिंथ. ११:१९. कां कीं तुह्मामध्यें पटलेले ते प्रगट व्हावे ह्मणून तुह्मामध्यें फुटी झाल्या पाहि-

जेत. अनु. १३:१–३. १राजे. २२:२०–२३. ईयो. २:६,७. यहेज्के. ३:२०. मात्थी ४:१.

## ८९ ईश्वराला मनुष्यांचा जीव घेवविण्याचा हक्क आहे.

१शमु. १५:३. आतां तूं जाऊन अमालेकांस मार, आणि त्याचें जें कांहीं आहे त्याचा विनाश कर, त्यांवर कृपा करूं नको, परंतु पुरुष व स्त्रिया व लेंकरूं व तान्हें व गुरें व मेंढरूं व उंट व गाढव, या सर्वांस जिवें मार. उत्प. २२:२. अनु. २०:१६–१८.

## ९० ईश्वराला अधिकाऱ्यांस व कायद्यांस स्थापण्याचा हक्क आहे.

दानी. ४:१७. आज्ञा जागणाऱ्यांच्या ठरावानें, आणि प्रश्न पवित्रांच्या वचनानें आहे; अशासाठीं कीं जीवंतानी जाणावें, कीं मनुष्यांच्या राज्यावर परात्पर प्रभुत्व करितो, आणि ज्या कोणाला तो इच्छितो, त्याला तें देतो, आणि त्याजवर मनुष्यांतला नीच जन स्थापितो. होशे. १३:११. म्या आपल्या क्रोधानें तुला राजा दिल्हा, आणि आपल्या रोषानें याला काढिलें. १राजा. १९:१५. २राजा. ८:१२. यहेज्के. २०:२४–२६.

## ९१ ईश्वराला बापाच्या अन्यायामुळें लेंकरांस शासन करण्याचा हक्क आहे.

निर्ग. २०:५,६. त्याच्या पायां पडूं नको, आणि त्याची सेवा करूं नको, कां कीं मी परमेश्वर तुझा देव अवेशी देव आहें, जे माझा द्वेष करितात त्यांच्या तिसऱ्या व चवथ्या पिढीपर्यंत बापाच्या अन्यायामुळें लेंकरांचें शासन करितों. आणि जे मजवर प्रीति करितात आणि माझ्या आज्ञा पाळितात त्यांच्या हजारांवर मी दया करितों. (१८.)

## ९२ ईश्वराला माणसाच्या योगेंकरून आपले हेतु सिद्धीस नेण्याचा हक्क आहे.

१काल. ६:१५. आणि यहोजादाक, जेव्हां परमेश्वरानें यहूदा व इस्राएल यांस नबूखाद्नेज्जाराच्या हातें पाडाव करून नेलें, तेव्हां तोहि गेला. (१३८.)

९३ ईश्वराला आपला व आपल्या सेवकांचा सूड उगविण्याचा हक्क आहे.

अनु. ३२:३५. सूड घेणें व फेडणें हें माझ्याकडे आहे; कळिकरून त्यांचा पाय निसटेल: कारण कीं त्यांच्या संकटाचा दिवस जवळ आला आहे, त्यांचीं भविष्यें उतावळींच करितात. (३८३.)

## ईश्वराचे संकेत.

९४ ईश्वराने आपल्या कामाविषयीं पूर्ण योजना केली आहे.

अनु. ३२:४. तो खडकरूप, त्याचें काम पक्कें, कारण कीं त्याचे सर्व मार्ग न्यायाचे; तो सात्विक देव; अन्यायाचा नाहींच; नीतिवान व सरळ आहे. उपदे. ३:१४. जें कांहीं देव करितो तें सर्वकाळपर्यंत ठरेल, त्यासीं कांहीं लाववत नाहीं,आणि त्यापासून कांहीं काढवत नाहीं; आणि देवाने तें केलें आहे, त्यासमक्ष मनुष्याने भय धरावें ह्मणून: असें मी जाणतों. (६३३.)

९५ ईश्वराचे संकेत सर्वकाळिक व अपालट आहेत.

गीत ३३:११. परमेश्वराचा विचार सर्वकाळ टिकतो: त्याच्या मनांतल्या योजना पिढोपिढीं चालतात. यशा. १४:२४. सैन्यांच्या परमेश्वराने शपथ केली आहे कीं,निश्चयें जसें म्या कल्पिलें आहे, तसेंच होईल, आणि म्या जसें योजिलें आहे, तसेंच ठरेल. २७. ४६:९,१० नीति १९:२१. एफस. ३:११. (६२.)

९६ ईश्वराचे संकेत सर्वलौकिक व विविक्तहि आहेत.

प्रेषि. १७:२६. आणि त्याने मनुष्यांचीं सर्व राष्ट्रें पृथ्वीच्या सर्व पाठीवर राहण्यासाठीं एकाच रक्तापासून केलीं, व त्यांचे पूर्वीं नेमलेले समय व त्यांच्या वस्तीच्या सीमा त्याने नेमून ठेविल्या आहेत. एफस. १:११. जो आपल्या इच्छेच्या योजनेप्रमाणें अवघीं चालवितो त्याच्या बेताप्रमाणें आह्मी पूर्वीं नेमलेले होतों. ईयो. १४:५. यशा. १४:२६. (६३६.)

## ९७ ईश्वराच्या संकेताप्रमाणें संकटें व पाप देखील घडतात.

प्रेषि. २:२३. तोच देवाच्या ठरविलेल्या निश्चयाप्रमाणें व भविष्यज्ञानाप्रमाणें तुमच्या स्वाधीन झाल्यावर, तुह्मी त्याला धरून पापी हातानी खांबावर खिळून मारिलें. ४:२७,२८. १३:२९. १पेत्रस २:८. व ठेंचण्याचा धोंडा व अडखळण्याचा खडक असा झाला आहे; ते मानीत नसतां वचनाविषयीं ठेंचतात, त्यासाठीं तर ते नेमले होते. यहू. ४. प्रगट. १७:१७. (६७१, १३७–१४०.)

## ९८ ईश्वराचें राष्ट्रांस निवडणें.

अनु. ४:२०. आणि परमेश्वरानें तुह्मास घेऊन ठेविलें आहे; भणखी आजच्या दिवसाप्रमाणें तुह्मी त्याच्या वतनाचे लोक असें व्हावें ह्मणून तुह्मास लोखंडी भट्टी ह्मणजे मिसर देश यांतून काढिलें आहे. ७:६. कां तर तुह्मी आपला देव परमेश्वर यासाठीं पवित्र लोक असावें; तुमचा देव परमेश्वर याने तुह्मास यासाठीं निवडून घेतलें आहे कीं भूमीच्या पाठीवर जे सर्व लोक त्यांपेक्षां तुह्मी विशेषेंकरून त्याचेच लोक व्हावे. ३२:९,१०. गीत ३३:१२. यशा. ४५:४. रोम. ३:१,२. ९:४.

## ९९ ईश्वराचें एकएका माणसास निवडणें.

एफस. १:४. याजकडून जसें त्यानें जगाच्या मांडण्यापूर्वी आह्मास निवडिलें आहे, यासाठीं कीं आह्मी प्रीतीनें त्याच्या दिसण्यांत पवित्र व निर्दोष व्हावें तसें. ५,६,११. १पेत्रस १:२. देव बापाच्या पूर्व जाणण्याप्रमाणें आत्म्याच्या पवित्र करण्यानें मान्य होण्यासाठीं, आणि येशू ख्रिस्ताच्या रक्तानें शिंपडलेले होण्यासाठी निवडलेले, यांस येशू ख्रीस्ताचा प्रेषित पेत्रस यांचा सलाम; तुह्मावर कृपा व शांति हीं फार होवोत. मात्थी २०:१६. २४:२२. योहा. १३:१८. १५:१६,१९. प्रेषि. १३:४८. रोम. ८:२८,२९. ९:१०–१५. ११:५,७. १थेस्स. १:४. ५:९. २थेस्स. २:१३. (७९, ८७, १६८.)

## १०० ईश्वर त्यांस विश्वास धरण्यापूर्वीं निवडतो.

एफस. १:४. त्यानें जगाच्या मांडण्यापूर्वी आह्मास निवडिलें आहे. प्रगट. १७:८. ज्या श्वापदाला त्वां पाहिलें, तें होतें, आणि नाहीं, तर डोहांतून चढून येणार, आणि नाशांत जाणार आहे; आणि पृथ्वीवरील राहणारे, ज्यांचीं नांवें जगाचा पाया घालण्यापासून जीवनाच्या पुस्तकांत

लिहिलेली नाहींत, ते, हें श्वापद होतें, आणि नाहीं, तरी आहे, असें पाहून आश्चर्य करितील.

## १०१ ईश्वराचे संकेत क्रोधपात्रांविषयीं आहेत.

निर्ग. ९:१६. तर निश्चयें यासाठीं म्या तुला उभारिलें आहे कीं म्या आपला पराक्रम तुला प्रगट करावा, आणि यासाठीं कीं माझ्या नामाचें वर्णन सर्व पृथ्वीमध्यें व्हावें. नीति १६:४. परमेश्वराने आपणासाठीं सर्व केलें, दुष्टाहि अरिष्टाच्या दिवसासाठीं केला. मार्क. ४:११,१२. रोम. ९:१७,२२,२३. २ करिंथ. १३:५,६. २ पेत्रस. २:१२. (९७, १३३,१४०,६६६,६६७,३८५.)

## १०२ ईश्वराच्या संकेतांत उपाय आणि परिणाम हीं दोन्हीं येतात.

२ थेस्स. २:१३. अहो प्रभूकडून प्रीति पावलेल्या भावानों, तुह्माविषयीं तर आह्मास सर्वदा देवाची उपकारस्तुति करणें प्राप्त आहे, का कीं आत्म्याच्या पवित्र करण्याकडून व खरेपणाच्या विश्वासाकडून देवाने तुह्मास प्रारंभापासून तारणासाठीं निवडिलें आहे. १ पेत्रस. १:२. देव बापाच्या पूर्व जाणण्याप्रमाणें आत्म्याच्या पवित्र करण्यानें मान्य होण्यासाठीं आणि येशू ख्रीस्ताच्या रक्तानें शिंपडलेले, होण्यासाठीं निवडलेले, यांस येशू ख्रीस्ताचा प्रेषित पेत्रस याचा सलाम: तुह्मावर कृपा व शांति हीं फार होवोत. प्रेषि. २७;२२–२४, ३०, ३१. (३२८(३)

## १०३ ईश्वराच्या संकेतांवरून उपाय करण्यास आश्वासन होतें.

प्रेषि. १८:९,१०, तेव्हां प्रभूने रात्रीं पौलसाला दृष्टांतांत ह्मटलें कीं, भिऊं नको, बोलत जा, व उगा राहूं नको. का कीं मी तुजबरोबर आहें, तुझें वाईट करायाला कोणी तुजवर येणार नाहीं, कारण कीं या नगरांत माझे बहुत लोक आहेत. ११. दानी. ९:२. (६६२.)

# ईश्वराची स्तुति.

## १०४ एकांतीं व लोकांतीं भजन करितांना ईश्वराची स्तुति करावी–उदाहरणें.

गीत ९:११. जीयोनांत वस्ति करणारा जो परमेश्वर त्याचें कीर्त्तन

तुह्मी करा; लोकांत त्याचीं कृत्यें सांगा. २२:२२. ३५:१८. ४७:६, ७. ९५:१–३. १००:१–५. १०७:३१,३२. १५०:१–६. ५७:७–११. ९२:१–४. ९६:१–४. इब्री. १३:१५. त्यामुळें तर आह्मी देवाला स्तुतीचा यज्ञ, ह्मणजे त्याचें नांव पत्करणाऱ्या ओठांचें फळ असें नेहमीं अर्पावें. मात्थी २६:३०. प्रेषि. १६:२५. . (१०९.)

## १०५ ईश्वराची स्तुति भक्तशील भावाने करावी.

गीत ११९:१. जे चालीने पूर्ण, जे परमेश्वराच्या शास्त्राप्रमाणें चालतात, ते धन्य. कल. ३:१६. ख्रिस्ताचें वचन तुह्मामध्यें सर्व ज्ञानानें अतिशयें राहो. गीतें व स्तोत्रें व आत्मसंबंधी प्रबंध यांकडून तुह्मी आपणांस उपदेश व बोध करा, कृपापूर्वक आपल्या अंतःकरणाने प्रभूला गाते व्हा. १करिंथ. १४:१५. एफस. ५:१९,२०. (५.)

# ईश्वराचें भजन.

## १०६ ईश्वरच भजनपात्र आहे.

गीत ९६:४, कारण कीं परमेश्वर थोर, आणि फार स्तुतियोग्य: सर्व देवांवर तो भययोग्य आहे; ५,८,९. मात्थी ४:१०. तेव्हां येशू त्याला ह्मणाला, "अरे सैताना दूर हो, कां कीं प्रभू तुझा देव त्याचें भजन कर, आणि त्याचीच सेवा कर, असें लिहिलें आहे. निर्ग. २०:२, ३. (२६२,१२४,११७.)

## १०७ ईश्वराचें भजन लोकांतीं करावें–आश्वासनें व उदाहरणें.

इब्री. १०:२५. आपलें एकत्र मिळणें हें आह्मी कित्येकांच्या चालीप्रमाणें सोडूं नये, तर बोध करावा; आणि दिवस जसजसा जवळ येतो ह्मणून तुह्मी पाहतां, तसतसा तो अधिक करावा. गीत ४०:७–१०. मात्थी १८:२०. प्रेषि. ११:२५, २६. १३:१४–१६. (नहे. ८:१–७. प्रेषि. १३:४ २–४५.)

## १०८ उपदेशासहित लोकांतीं भजन करण्याचीं उदाहरणें.

नेह. ८:८. तेव्हां त्यानी पुस्तक ह्मणजे देवाचें नेमशास्त्र स्पष्ट वाचि-

लें, आणि जें वाचिलें तें ध्यानांत आणून देऊन समजविलें. योहा. १८:२०. येशूनें त्याला उत्तर दिल्हें कीं, मी जगास उघड बोलत असें, सभास्थानांत व देवळांत यहूदी सर्वदा मिळतात तेथें मी सर्वदा उपदेश करीत असें आणि गुप्तांत कांहीं बोललों नाहीं. ८:१,२. मार्क. २:१,२. लुक. ४:४३,४४. प्रेषि. १८:४,५. (६६१.)

### १०९ ईश्वराची प्रार्थना व स्तुति करून लोकांतीं भजन करावें.

गीत ८९:७. पवित्रांच्या सभेमध्यें देव फार भयंकर आहे; तूं आपल्या सर्व चहुंकडल्यांसहि भययोग्य आहेस. मात्थी २६:३०. नंतर गीत गाऊन ते निघून जाइत झाडांच्या डोंगरास गेले. लेवी. १८:३०. १राजे. ८:२२. इब्री. १२:२८,२९. (१०४—५.)

## ईश्वरासीं माणसांचे मुळचे धर्म.

### ११० ईश्वरावर प्रीति करावी.

अनु. ६:५. तर तूं आपल्या सर्व अंतःकरणानें व आपल्या सर्व जिवानें व आपल्या सर्व शक्तीनें आपला देव परमेश्वर यावर प्रीति कर. ११:१०. ३०:१५,१६. यहोश. २२:५. नीति २३:२६. मात्थी २२:३७,३८. (मार्क. १२:३०. लूक. १०:२७.) यहू. २१. (१२७,४५२.)

### १११ जे ईश्वरावर प्रीति करितात त्यांस वचनें.

नीति ८:१७. जे मजवर प्रीति करितात त्यांवर मी प्रीति करितों, आणि जे झटून मला शोधितात त्यांला मी सांपडेन. १करिंथ. २:९. परंतु लिहिलें त्याप्रमाणें, देवानें आपल्या प्रीति करणाऱ्यांसाठीं ज्या गोष्टी तयार केल्या, त्या डोळ्यानें पाहिल्या नाहींत, व कानानें ऐकिल्या नाहींत, व माणसाच्या अंतःकरणांत आल्या नाहींत. निर्ग. २०:६. अनु. ७:२. ११:१३—१५. गीत. ९१:१४ १४५:२०. योहा. १४:२१—२३. रोम. ८:२८. याको. १:१२. (५५, ३८१.)

### ११२ ईश्वराचें भय धरावें.

उपदे. १२:१३. साऱ्या गोष्टीचे शेवट आपण ऐकूं; देवाचें भय धर, आणि त्याच्या आज्ञा पाळ; कां कीं मनुष्याचें सगळें करायाचें तें हेंच आहे. लुक. १२:५. तुह्मी तर कोणाला भ्यावें हें मी तुह्मास दाखवितों:

जिवें मारिल्यावर जो नरकांत टाकायाला समर्थ आहे त्याला भ्या, होय, मी तुह्मास सांगतों, त्याला भ्या. अनु. ६:२४. १०:१२,२०. यहोश. २४:१४. २ राजे. १७:३५,३६. गीत ३३:८. ८९:७. नीति २३:१७. यशा. ८:१३.

## ११३ ईश्वराचें भय धरितात त्यांस वचनें.

मला. ३:१६,१७. तेव्हां जे परमेश्वराचें भय धरीत असत, ते परस्परें बोलत होते; आणि परमेश्वरानें कान देऊन ऐकिलें; मग जे परमेश्वराचें भय धरीत असत, आणि त्याच्या नामाचा सन्मान करीत असत, त्यांकरितां त्यासमोर स्मरणाचें पुस्तक लिहिलें. आणि सैन्यांचा परमेश्वर ह्मणतो कीं, ज्या दिवसीं मी आपलें खासगीचें द्रव्य सिद्ध करीन, त्या दिवसीं ते माझे होतील; आणि जसा कोणी आपली सेवा करणारा जो आपला पुत्र त्यावर दया करीत असतो, तसा मी त्यांवर दया करीन. ४:२. ईयो. २८:२८. गीत २५:१२–१४. ३१:१९,२०. ३३:१८,१९. ३४:७–९. १०३:११–१३. १११:५,१०. १४५:१९. १४७:११. (नीति ९:१०) नीति १४:२६,२७. उपदे. ८:१२. लुक. १:५०.

## ११४ ईश्वरावर भरंवसा व आशा ठेवावी.

यशा. २६:४. तुह्मी सदासर्वकाल परमेश्वरावर भाव ठेवा; कां कीं प्रभु जो परमेश्वर त्याच्या ठायीं सर्वकाळचा आश्रय आहे. ५०:१०. तुह्मामध्यें परमेश्वराला कोण भितो, आणि त्याच्या सेवकाचें भाषण कोण ऐकतो, जो अंधारांत चालतो आणि त्याला कांहीं प्रकाश नाहीं? तो परमेश्वराच्या नामावर भाव ठेवो, व आपल्या देवावर टेंको. गीत ४:५. ४२:५. ६२:८. ११५:९–११. नीति ३:५. (५१६,४५.)

## ११५ ईश्वरावर भरंवसा व आशा ठेवणाऱ्यांस वचनें व आश्वासन.

गीत १२५:१. जे परमेश्वरावर भरंवसा ठेवितात, ते सीयोन डोंगरासारिखे आहेत; तो हालत नाहीं, सर्वकाळ राहतो. १४६:५. ज्याला आपल्या सहायावर याकोबाचा देव, ज्याची आशा आपला देव परमेश्वर यावर आहे, तो धन्य. २:१२. १७:७. २८:७. ३१:१९,२०,२४, ३२:१०. ३४:८,२२. ३७:३. ३८:१५. ४०:४. ११२:६–८. ११८:८,९. २ शमु. २२:३१. नीति १८:१०. २८:२५. २९:२५. ३०:५, यशा. २६:३. ५७:१३. इर्म. १७:७,८.

## ११६ ईश्वरावर भरंवसा व आशा ठेवण्याचीं उदाहरणें.

दानी. ३:१६–१८. शद्राख, मेशाख, आणि अबेद्नगो राजाला उत्तर करीत ह्मणाले, हे नबूखद्नेझारा, तुला या आज्ञेविषयीं उत्तर द्यायाला आह्मी अगत्य धरीत नाहीं. जर असें असेल, तर आमच्या ज्या देवाची सेवा आह्मी करितों, तो आह्माला जळत्या अग्नीच्या भट्टींतून सोडवायाला समर्थ आहे; आणि हे राजा, तो आह्माला तुझ्या हातांतून सोडवील. परंतु जरी नाहीं, तरी हे राजा, तुला कळो, कीं आह्मी तुझ्या देवांची सेवा करणार नाहीं, आणि जी सोन्याची मूर्त्ति त्वां स्थापिली आहे, तिला आह्मी भजणार नाहीं. १ शमु. १७:३७. २ राजे. १८:५–७. ईयो. १३:१५. गीत ७:१. ५६:४. ७१:५ (३४४.)

## ११७ ईश्वराची मान्यता व भक्ति संपूर्ण अंतःकरणानें करावी.

अनु. १३:४. तुह्मी आपला देव परमेश्वर याला मानून चाला, आणि त्याचें भय धरा; त्याच्या आज्ञाहि पाळा, आणि त्याचा शब्द ऐका: त्याचीच सेवा करा, त्यालाच लगटून राहा. रोम. १२:१. तर अहो भावानो, मी देवाच्या दयांवरून तुह्मास विनवितों कीं, तुह्मी जिवंत, पवित्र व देवाला आवडतें, असें अर्पण आपलीं शरिरें द्यावीं: हीं सेवा तुह्मास योग्य आहे. गीत ९५:६–८. ९६:९. ९९:५ उपदे. १२:१३ कल. ३:२३,२४. (१२९,११०,११२,३४६,१०६–७.)

## ११८ ईश्वराविषयीं आनंद करावा.

गीत ५:११. परंतु तुजवर जे भरंवसा ठेवितात त्या सर्वांनी आनंद करावा; त्यांनीं सर्वकाळ हर्षशब्द करावा; कां तर तूं त्यांचें रक्षण करितोस; जे तुझ्या नामावर प्रीति करितात, त्यांनी तुजविषयीं उल्हास करावा: ३२:११. ३३:१. ३७:४. ४०:१६. ६८:३, ४. ९७:१, २. १४९:२. फिलि. ३:१. शेवटीं अहो माझ्या भावानो, प्रभूविषयीं आनंद करा: तशाच गोष्टी तुह्मास लिहिणें हें मला तर भारी नाहीं, आणि तुमच्या रक्षणार्थ आहे. ४:४. प्रभूमुळें सर्वदा आनंद करा; मी पुन्हा सांगतों, आनंद करा. १ काल. १६:३१. यशा. ४९:१६. (३१.)

## ११९ ईश्वराविषयीं आनंद करण्याचीं उदाहरणें.

१ शमु. २:१. मग हान्ना प्रार्थनाकरून बोलली कीं, "माझें मन पर-

मेश्वराच्याठायीं आनंदित आहे, माझें शृंग परमेश्वराने उंच केलें आहे, माझें मुख माझ्या शत्रूंवर उघडिलें आहे, कां कीं मी तुझ्याकडून जें तारण त्यांत आनंद पावतें. १ पेत्रस. १:८. त्या येशूला पाहिलें नसताहि तुह्मी त्यावर प्रीति करितां; आतां जरी त्याला पाहत नाहीं, तरी विश्वास ठेवून अवाच्य व गौरवयुक्त आनंदाने उल्हासतां; नहे. ८:१०. हबा. ३: १७–१९.

## १२० ईश्वराला वश्य असावें.

यशा. ४५:९. जो आपल्या निर्माणकरणाऱ्यासीं विवाद करितो, त्याला हाय हाय; खापर भूमींतल्या खापरासीं विवाद करो; तूं काय करितोस? असें चिखल आपल्या घडणाऱ्याला ह्मणेल काय? आणि त्याला हात नाहींत, असें तुझें कृत्य ह्मणेल काय? याकों. ४:७. यास्तव देवाच्या स्वाधीन असा; सैतानाविरूद्ध उभे राहा, ह्मणजे तो तुह्मापासून पळेल. लेवी. २६:४१–४३. अनु. २७:२६. मात्थी ६:९,१०. (१५१, ४७३.)

## १२१ ईश्वराला वश्य असण्याचीं उदाहरणें.

गीत ३९:९. मी उगा राहिलों, म्या आपलें तोंड उघडलें नाहीं, कारण कीं तसें त्वां केलें. मात्थी २६:३९. मग तो कांहींसा पुढें जाऊन पालथा पडला, आणि त्याने असी प्रार्थना केली कीं हे माझ्या बापा, साधेल तर हा प्याला मजपासून टळून जावो; तथापि माझी इच्छा आहे असें नको, तर तुझी आहे तसें होवो. लेवी. १०:१–३. १ शमु. ३:१४,१८. २ शमु. १५:२५,२६. ईयो. १:१९–२१. लुक १५:१८,१९. २३: ४०,४१. प्रेषि. २१:१४. प्रगट. १९:१–३. (३६८,१०,७१४.)

## १२२ ईश्वराचा सन्मान व गौरव केला पाहिजे.

१ काल. १६:२८,२९. लोकांच्या कुळांनो, परमेश्वराला मानून द्या, परमेश्वराला गौरव व पराक्रम द्या. परमेश्वराला त्याच्या नामाचें गौरव मानून द्या: अर्पण घेऊन त्याच्या दर्शनास या; पवित्रतेच्या शोभेने परमेश्वराला भजा. १ करिंथ. ६:२०. कां कीं तुह्मी मोलाने विकत घेतलेले आहां; तर तुह्मी आपलें शरीर व आपला आत्मा, जीं देवाचीं आहेत, त्यांकडून देवाचें गौरव करा. १०:३१ ईयो. ३६:२४. गीत ११५:१. नीति ३:९. इर्म. १३:१६. मला. १:६. योहा. ५:२२, २३. ८:४९. १ तीम. १:१७. प्रगट. ४:११. (४७५.)

### १२३ ईश्वराचा सन्मान व गौरव जे करीत नाहींत त्यांवर त्याचा राग येतो.

मला. २:२. सैन्यांचा परमेश्वर ह्मणतो कीं, माझ्या नामाला गौरव द्यावें, ह्मणून जर तुह्मी ऐकणार नाहीं, आणि जर तुह्मी हें मनास आणणार नाहीं, तर मी तुह्मावर शाप पाठवीन, आणि तुमच्या आशीर्वादांस शापीन; होय म्या त्यांस शापिलें आहेच, तुह्मी हें मनास आणीत नाहीं ह्मणून. प्रेषि. १२:२३. त्याने देवाला गौरव दिल्हें नाहीं, ह्मणून प्रभूच्या दुताने लागलेंच त्याला मारिलें, नंतर किड्यानी त्याचा देह खाऊन तो मरण पावला. १शमु. २:३० दानी. ५:२३–२५. रोम. १:२१,२४ (७५.)

## ईश्वरी आज्ञा.

### १२४ नेम देणारा व अधिकारी असा जो मुख्य व योग्य तो ईश्वर आहे.

गीत २२:२८. कां तर राज्य परमेश्वराचें आहे; तोच राष्ट्रावर अधिकार करितो. १०३:१९. परमेश्वराने आपलें सिंहासन आकाशांत स्थापिलें आहे, आणि त्याचें राजपण सर्वांवर आहे. ४७:२,७,८. ८९:१८. ९९:१. १४६:१०. यशा. ३३:२२. दानी. ४:३४. प्रगट. १९:६,१६. (८६,१३३,१०६.)

### १२५ दाहा आज्ञा किंवा मुख्य नेम.

निर्ग. २०:१–१७. योह. १३:३४,३५.

### १२६ दाहा आज्ञा प्रसिद्ध करण्याचा समारंभ.

निर्ग. १९:१८,१९. तेव्हां सीना डोंगर अगदी धूरमय झाला, यामुळें कीं परमेश्वर अग्नीने त्यावर उतरला, आणि त्याचा धूर भट्टीच्या धुरासारिखा वरतीं गेला, सर्व डोंगरहि फार कांपला. मग शिंगाचा शब्द वाढून फार मोठा झाला तेव्हां मोशे बोलला, आणि देवाने शब्देकरून त्याला उत्तर दिल्हें. १०–२५. अनु. ५:२२–२४.

### १२७ दाहा आज्ञांचें सार व स्पष्टीकरण.

मात्थी ७:१२. याकरितां माणसानी ज्या ज्या रीतीने तुह्मासीं वर्त्तावें

ह्मणून तुमची इच्छा आहे त्याच रीतीने तुह्मीहि त्यांसीं वर्त्ता; का कीं नेमशास्त्र आणि भविष्यशास्त्र हेंच आहे. ५:४३–४८. २२:३५–४०. गल. ५:१४. कारण कीं अवघें नेमशास्त्र एका वाक्यांत पूर्ण होतें तें असें कीं, जसी आपणावर तसी आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर. रोम. १३:८–१०. याको. २:८–१०. (९,१०.)

## १२८ ईश्वर आपल्या आज्ञा कशा मानितो.

यशा. ४२:२१. त्याच्या न्यायाकरितां परमेश्वर संतोषित आहे; तो नेमशास्त्रास मोठेपणा देऊन प्रतिष्ठित करील. ६६:२. तर ते सर्व पदार्थ माझ्या हाताने उत्पन्न केले, ह्मणून ते सर्व आहेत, असें परमेश्वर ह्मणतो; परंतु जो दीन व अनुतापी आत्म्याचा असून माझ्या वचनाचें भय धरितो, त्याजकडे मी पाहीन. मात्थी ५:१९ (४१८,४२६.)

## १२९ ईश्वरी आज्ञा मनुष्यानी अगदीं पवित्र असावें अशा आहेत.

उत्प. १७:१. जेव्हां आब्राम नव्याण्णव वर्षांचा झाला, तेव्हां परमेश्वराने आब्रामाला दर्शन देऊन त्याला ह्मटलें कीं, मी सर्वसमर्थ देव आहें; तूं माझ्यासमोर चालून पूर्ण अस. मात्थी ५:४८. यास्तव जसा तुमचा आकाशांतील बाप पूर्ण आहे, तसे तुह्मी पूर्ण व्हा. २२:३७–३९. अनु. १८:१३. १राजे. ८:६१. नीति. २३:१७. १करिंथ. १०:३१. २करिंथ. ७:१. १३:११. याको. १:४. १पेत्रस. १:१५,१६. २पेत्रस. ३:११,१२. यहू. २९. (४५४,३८०.)

## १३० ईश्वरी आज्ञा योग्य–बरोबर पाळण्याने पूर्ण सुख होतें.

गीत १९:७ परमेश्वराचें नेमशास्त्र पूर्ण आहे, जिवाला ठिकाणीं आणितें; परमेश्वराचा प्रमाणनेम खरा आहे, भोळ्याला ज्ञानी करितो. ८–११. ३३:४. ११९:८६,१२८,१७२. १योहान्न ५:३. का तर हीच देवावरची प्रीति आहे कीं, आह्मी त्याच्या आज्ञा पाळाव्या, आणि त्याच्या आज्ञा भारी नाहींत. अनु. ६:२४,२५. १०:१२,१३. नहे. ९:१३. रोम. ७:१२. (५६९. ३८१.)

## १३१ ईश्वरी आज्ञा मोडण्याचें फळ.

रोम. ६:२३. का कीं पापाची मजुरी मरण आहे, परंतु देवाचें कृ-

पादान हें आमच्या प्रभु येशू ख्रीस्ताकडून सर्वकाळचें जीवन आहे. याको. १:१५. मग इच्छा ही गर्भ धरून पापाला प्रसवती, आणि पाप पूर्ण झाल्यावर मरणास उपजवितें. उत्प. २:१७. यहेज्के. १८:४. ३३: ११. मात्थी २५:४१. योहा. ८:५१. गल. ३:१०,१३. प्रगट. २:११. (६३८, ३८५-३८८, ३९२.)

# ईश्वरी सूत्र किंवा करणी.

## १३२ ईश्वरी सूत्र किंवा करणी कार्यसाधक आहे.

उत्प. १:३. तेव्हां देव बोलला कीं, उजेड होवो, मग उजेड झाला. गीत ३३:६, परमेश्वराच्या शब्दानें आकाश, त्याच्या मुखश्वासानें त्यांतलें सर्व मंडळहि उत्पन्न झालें. ८,९. २९:४-९. ६६:७. इब्री ११:३. (६३.)

## १३३ ईश्वरी सूत्र विश्वजनिक व विविक्तहि आहे.

गीत १३५:६, जें परमेश्वरानें इच्छिलें, तें सर्व त्यानें आकाशांत व पृथ्वींत, समुद्रामध्यें व अवघ्या डोहांमध्यें केलें आहे. ७. १४७:८,९, १५-१८. रोम. ११:३६. कां कीं त्यापासून व त्याकडून व त्याकरितां सर्व आहेत; त्याला सर्वकाळ गौरव असो, आमेन. १शमु. २९:१२. नीति १६:३३. यशा. २६:१२. ४५:७. इर्म. १०:१३. आमो. ३:६. मात्थी १०:२९,३०. १करिंथ. १२:६. एफस. १:११. फिलि. २:१३ इब्री. १३:२०,२१. (६७१. १३७-१४०.)

## १३४ ईश्वरी सूत्र दैहिक गरजा पुरवितें.

गीत १०४:२७,२८, ते सर्व तुजकडे लक्ष लावितात, त्वां यथाकाळीं त्यांस भक्ष्य द्यावें ह्मणून. तूं त्यांस देतोस, ते टिपून घेतात. तूं आपला हात उघडतोस, ते उत्तमपणानें तृप्त होतात. १४,२१. मात्थी ५:४५ ६:२६, २८-३०.

## १३५ ईश्वरी सूत्राला सर्व प्राणी आश्रयून आहेत.

प्रेषि. १७:२६-२८. आणि त्यानें मनुष्यांचीं सर्व राष्ट्रें पृथ्वीच्या सर्व पाठीवर राहण्यासाठीं एकाच रक्तापासून केलीं, व त्यांचे पूर्वी नेमलेले समय व त्यांच्या वस्तीच्या सीमा त्यानें नेमून ठेविल्या आहेत. यासाठीं

कीं त्यांनी प्रभूचा शोध करावा, म्हणजे त्यांनी चांपसत त्याला कसें तरी मिळवून घ्यावें; तरी तो आम्हांतील कोणाएकापासूनहि दूर नाहीं. कारण कीं आम्ही त्याजमध्यें जगतों व वागतों व आहों; तसेंच तुमच्या कित्येक कवींनीहि म्हटलें आहे कीं, आम्ही त्याचा वंश आहों. ईयो. १२: १०. (दान. ५:२३.) गीत २२:२९. ८७:७. इर्म. १०:२३. १८:६. योहा. १५:५. २करिंथ. ३:५.

## १३६ ईश्वरी सूत्राकडून सर्व प्राणी रक्षिले आहेत.

गीत ३६:६. तुझी नीति सबळ डोंगरासारिखी, तुझा न्याय मोठा समुद्र आहे; हे परमेश्वरा, तूं मनुष्याचें व पशूंचें संरक्षण करितोस. ६३:८. ६६:८,९. १२१:७. इब्री १:३. हा त्याच्या गौरवाचें तेज, व तत्वतेची प्रतिमा असतां आणि आपल्या सामर्थ्याच्या शब्दानें अवघीं वागवीत असतां, आपणाकडूनच आमच्या पापांचें शुद्धिकरण करून, आकाशलोकांत महत्वाच्या उजवीकडे बसला आहे. नहे. ९:६. ईयो. ७:२०. १०:१२. ३४:१४,१५. नीति २४:१२.

## १३७ ईश्वर अंतःकरण निर्मितो, फिरवितो, व आवरतो.

नीति १६:१. ९. मनाचे संकल्प मनुष्याचे, परंतु परमेश्वरापासून जिभेचें उत्तर आहे. मनुष्याचें मन त्याच्या मार्गाचा विचार करितें, परंतु परमेश्वर त्याचीं पावलें निटावितो. २१:१. १काल. ५:२६. २काल. १८:३१. इज्रा. ६:२२. ७:२७. यशा. ६४:८. जखा. १२: १. प्रेषि. १६:१४. (८७–९१.)

## १३८ ईश्वर माणसांच्या योगेंकडून आपला हेतु साधितो.

यशा. १०:५,६. अश्शूर जो माझ्या क्रोधाचा दंड आणि ज्याच्या हातांतली काठी माझा रोषच आहे त्याला हाय हाय. अधार्मिक राष्ट्रावर मी त्याला पाठवीन, आणि माझ्या कोपाच्या लोकांवर त्याला आज्ञा देईन; त्यानें हरण करावें आणि लूट घ्यावी, आणि आळ्यांतल्या चिखलाप्रमाणें त्यांस तुडवावें म्हणून. ७,१२,१५. १३:५. ३७:७. २शमु. ७:१४. २राजे.५:१. १काल. ६:१५. ईयो. १:१५, १७, २१. गीत १७:१३,१४. इर्म. २७:८. ५०:९. यहेज्के. २५:१४. हबा. १:६, १२. (१५१.)

## १३९ ईश्वर लोकांची मर्जी व राग आपल्या इच्छेप्रमाणें वळवितो.

दानी. १:९. तर देवानें दानीयेलाला शंडांच्या अधिकाऱ्यापुढें कृपा आणि करूणा दिल्ही होती. प्रेषि. ७:९,१०. नंतर त्या पूर्वजांनी हेवा धरून योसेफाला मिसरांत विकून टाकिलें, पण देव त्याच्या संगतीं होता. आणि त्यानें त्याला त्याच्या सर्व संकटांतून काढिलें, आणि मिसराचा राजा फारो याच्या समक्ष त्याला कृपा व ज्ञान दिल्हें, यास्तव त्यानें मिसरावर व आपल्या सर्व घरावर त्याला अधिकारी केलें. उत्प. ३९:२१. निर्ग. ३:२१. गीत ७५:६,७.

## १४० ईश्वरी सूत्र पापवासना व मतिभ्रंश यांजवर चालतें.

यशा. ४४:१८. ते जाणत नाहींत, व समजत नाहींत कारण कीं त्यानीं पाहूं नये ह्मणून त्यानें त्यांचे डोळे मिटविले, आणि समजूं नये, ह्मणून त्यांचीं हृदयें झांकिलीं आहेत. ४५:७. मी प्रकाश निर्माण करितों, आणि अंधकारास उत्पादितों, मी कुशल घडवितों आणि अरिष्ट उत्पादितों, मी परमेश्वर हीं सर्व कामें करितों. १९:१४. २९:१०. ६३:१७. निर्ग. ७:३. ९:१२. १०:१. १४:८,१७. अनु. २:३०. यहोश. ११:१९,२०. न्याया. ७:२२. २शमु. २४:१. १राजे. २२:२३. ईयो. १२:४. गीत २८:३. १०५:२५. ११९:३६, १४१,४. यहेज्के. १४:९. जखा. ८:१०. लुक १०:२१. योहा. १२:३९–४१. रोम. ९:१८. ११:७,८. २थेस्स. २:१०–१२. प्रगट. १७.१७. (९७, १०१, ६६६.)

## १४१ ईश्वर वाईटापासून चांगलें करून घेतो.

निर्ग. ९:१६. तर निश्चयें यासाठीं म्या तुला उभारिलें आहे कीं म्या आपला पराक्रम तुला प्रगट करावा, आणि यासाठीं कीं माझ्या नामाचें वर्णन सर्व पृथ्वीमध्यें व्हावें. १०:१,२. गीत ७६:१०. कां कीं माणसाच्या संतापानें तुझी स्तुति होईल, आणि बाकीचा संताप तूं आवरसील. उत्प. ४५:५. मात्थी १८:७. रोम. ३:५–८. ५:२०. ६:१७. ८:२८. १करिंथ. ११:१९. (१५०.)

## १४२ ईश्वर पापाचा कर्ता किंवा उत्तेजक नाहीं.

याको. १:१३, १४. कोणी परिक्षेंत पडला असतां, मी देवाकडून परीक्षेंत पडलों, असें त्यानें ह्मणूं नये, कां तर वाईट गोष्टीने देवाची परिक्षा होत नाहीं, आणि तो कोणालाहि परिक्षेंत पाडीत नाहीं. तर प्रत्येक आपल्या इच्छेनें ओढलेला व भुलविलेला होऊन परिक्षेंत पडतो. १५-१७. ३:१४-१७. इर्म. ७:९, १०. १ करिंथ. १४:३३. १ योहान्न २:१६.

## १४३ ईश्वराचे व मनुष्याचे हेतु त्याच गोष्टी साधतांना कधीं निरनिराळे आहेत.

उत्प. ५०:२०. तुह्मी तरी मजवर वाईट योजिलें, परंतु देवानें तें बऱ्यासाठीं योजिलें, ह्मणजे तेणेंकडून जसें या दिवसीं झालेलें, तसें करावें कीं बहुत लोकांस वांचवावें. १९. ४५:४-६. प्रेषि. २:२३. तोच देवाच्या ठरविलेल्या निश्चयाप्रमाणें व भविष्यज्ञानाप्रमाणें तुमच्या स्वाधीन झाल्यावर, तुह्मी त्याला धरून पापी हातानी खांबावर खिळून मारिलें. यशा. १०:५-७, १२. मार्क. १५:९, १०. योहा. ३:१६.

## १४४ ईश्वरी सूत्राधीन असतांहि मनुष्यें स्वतंत्रतेनें चालतात.

अनु. ३०:१९. मी आज तुह्माविषयीं आकाश व पृथ्वी हे साक्षीदार करून घेतों; जीवन व मरण, आशीर्वाद व शाप तुझ्यापुढें ठेविलीं, तर तूं जीवन निवडून घे, ह्मणजे तूं आपल्या संतानासुद्धां जगसील. योहा. ५:४०. परंतु तुह्मी जीवन पावण्यासाठीं मजकडे येण्यास मान्य होत नाहीं. निर्ग. ८:३२, ९:२७. १०:१६,१७. यहोश. २४:१५ २ शमु. २४:१,१०. नीति १:२९-३१. १६:९. २३:२६, यशा. ६६:३ होशे. १३:९. मात्थी १३:१५. १८:७. लूक २२:२२. प्रेषि. ४: २७,२८. रोम. २:१५. फिलि. २:१२,१३. शा. गीत १:४ (६५५, १, ४१, ४०८, ४५१-२.)

## १४५ ईश्वरी सूत्राविषयीं दिकत.

यहेज्के. ३३:२०. तथापि तुह्मी ह्मणतां कीं, प्रभूचा मार्ग बराबर नाहीं; अहो इस्राएलाच्या वंशानो, मी तुमचा प्रत्येकाचा न्याय त्याच्या मार्गांप्रमाणें करीन. रोम. ९:२०. अहाहा! अरे माणसा, जो देवासीं

विवाद करितोस असा तूं कोण आहेस? घडलेली वस्तु घडणाऱ्याला, त्वां मला असें कां केलें, असें ह्मणेल काय? १९,२१. ३:७,८. मात्थी २५:२४,२५. (४१,७२२,७३३.)

## १४६ ईश्वरी सूत्राविषयीं दिकतखोऱ्यांचा निषेध.

यशा. ४५:९, जो आपल्या निर्माणकरणाऱ्यासीं विवाद करितो, त्याला हाय हाय; खापर भूमींतल्या खापरांसीं विवाद करो; तूं काय करितोस? असें चिखल आपल्या घडणाऱ्याला ह्मणेल काय? आणि त्याला हात नाहींत, असें तुझें कृत्य ह्मणेल काय? १०. लूक १९:२७. अणखी म्या त्यांवर राज्य करावें, असी ज्यांची इच्छा नव्हती त्या माझ्या शत्रूंस एथें आणा, आणि माझ्या समोर मारून टाका. ईयो. ४०:२. मात्थी २०:१५. रोम. ९:२०,२१.

## १४७ ईश्वरी सूत्राचीं कामें चमत्कारिक.

निर्ग. १५:११. हे परमेश्वरा, देवांमध्यें तुझ्यासारिखा कोण! पवित्रतेनें तुझ्यासारिखा महान कोण! स्तवण्यांविषयीं भयमान्, चमत्कार कर्त्ता आहेस. दानी. ४:३, त्याचे उत्पात केवढे मोठे, आणि त्याचे चमत्कार केवढ्या पराक्रमाचे आहेत? त्याचें राज्य सनातन राज्य, आणि त्याचें प्रभुत्व युगानुयुगच आहे. अनु. ४:३२–३४. ईयो. ५:८,९. गीत ७७:११–१४.

## १४८ ईश्वरी सूत्र दुर्बोध.

रोम. ११:३३,३४, देवाच्या विद्येची व ज्ञानाची संपत्ति किती अगाध! त्याचे न्याय किती अतर्क्य आणि त्याचे मार्ग किती अगम्य! कां कीं प्रभूचें मन कोणी जाणिलें आहे, किंवा त्याचा बोधक कोण झाला आहे? ३५,३६. गीत ३६:६. ७७:१९. ९७:२. नीति २५:२. उपदे. ३:११. (५२,६७.)

## १४९ चमत्कार व अद्भुतें यांवरून मनुष्यांचें मन ईश्वराकडे लागतें.

निर्ग. ८:२२. ९:१६. परंतु गोशेन प्रांत ज्यांत माझे लोक राहतात, त्यांला मी त्या दिवसीं वेगळें करीन; असें कीं तेथें माश्या कांहीं होणार नाहींत, यासाठीं कीं त्वां जाणावें कीं मी परमेश्वर या देशामध्यें आहें. तर निश्चयें यासाठीं म्या तुला उभारिलें आहे कीं म्या आपला पराक्रम

तुला प्रगट करावा, आणि यासाठीं कीं माझ्या नामाचें वर्णन सर्व पृथ्वीमध्यें व्हावें. अनु. ४.३४–३९. यहोशा. ४:२३, २४. १ राजे. १८: ३७–३९. यहेज्के. २५:७. दानी. ४:२५. (६७२, ५०, ३९५.)

## १५० ईश्वर आपल्या सर्व कामांकडून स्वगौरव करून घेईल–सैतानाचा पराभव होईलच.

गीत ४६:१०. तुह्मी दम धरा आणि जाणा कीं, मी देव आहें; राष्ट्रांमध्यें थोर होईन, पृथ्वीवर थोर होईन. ८६:९. १०४:३१. १४५: १०–१२. १ योह. ३:८. जो पाप करितो तो सैतानाकडील आहे, कां तर सैतान प्रारंभापासून पाप करित आहे; देवाचा पुत्र यासाठींच प्रगट झाला कीं, त्यानें सैतानाचीं कामें मोडावीं. गण. १४:२०, २१. लूक १०:१८. (५२, १४१, १७१.)

## १५१ ईश्वरी सूत्र हा, आशा, आनंद व मान्यता, यांस आधार आहे.

गीत ३९:९. ९७:१. मी उगा राहिलों, म्या आपलें तोंड उघडलें नाहीं, कारण कीं तसें त्वा केलें. परमेश्वर राज्य करितो, पृथ्वीनें हर्ष करावा; बेटांच्या समुहानीं संतोष करावा. १ शमु. ३:१८. २ शमु. १६:१०, ११. ईयो. १:१५, २१, २२. यशा. ५२:१७. योह. १८: ११ .(११८–२१.)

## १५२ ईश्वरी गुण व संकेत व सूत्र हीं समजून घ्यावीं आणि दाखवावीं.

अनु. ३२:२, ३. पावसाप्रमाणें माझ्या अनुसंधानांची वृष्टि होईल: मझा बोध दहिंवरासारिखा पाझरेल; जसें धुकें हरळीवर, आणि जशा पाहळ्या हिरवळीवर तसा. कारण कीं मी परमेश्वराचें नाम गाजवीन: तुह्मी आमच्या देवाला थोरपण मानून द्या. गीत ३६:९. योह. १७: २५, २६. २ करिंथ. ३:१८. (४२४, ४२७, ६६४, १८४.)

## उत्पत्ति.

### १५३ उत्पन्न कर्त्ता ईश्वर आहे.

उत्प. १:१. प्रारंभीं देवानें आकाश व पृथ्वी यांस उत्पन्न केलें. गीतें ३३:६, ९. परमेश्वराच्या शब्दानें आकाश, त्याच्या मुखश्वासानें त्यांतलें सर्व मंडळहि उत्पन्न झालें. कारण कीं तो बोलतांच, ती झाली; त्यानें आज्ञा करितांच स्थीर राहिली. नहे. ९:६. यशा. ४२:५. योह. १: १, ३, १४. एफ. ३:९. कल. १:१६. इब्री ३:४. प्रग. ४:११.

### १५४ हें जग उत्पन्न करण्यास ईश्वराला किती काळ लागला?

निर्ग. २०:११. का कीं परमेश्वरानें साहा दिवसांत आकाश व पृथ्वी व समुद्र यांस व यांमध्यें जीं सर्व त्यांस उत्पन्न केलें, आणि सातव्या दिवसीं तो स्वस्थ राहिला; यास्तव परमेश्वरानें शाब्बाथ दिवसाला आशीर्वाद देऊन त्याला पवित्र ठरविलें. उत्प. २:१, २, ४.

### १५५ आकाशमंडळाचा उपयोग.

उत्प. १:१४, १५. मग देव बोलला कीं, दिवस व रात्री यांस वेगळें वेगळें करायासाठीं आकाशमंडळांत ज्योती होवोत, आणि खुणा व नेमकाळ व दिवस व वर्षें यांसाठीं होवोत. आणि पृथ्वीवर प्रकाशायासाठीं आकाशमंडळांत ज्योती असे होवोत; तेव्हां तसें झालें. १६–१८. इर्म. ३१:३५.

### १५६ उत्पत्तींतल्या कामांवरून ज्ञान प्रगट होतें.

गीत १९:१, २. आकाश देवाचें गौरव वर्णितें. आणि अंतराळ त्याच्या हाताचें कृत्य दाखवितें. दिवसास दिवस गोष्ट सांगतो, आणि रात्रीस रात्रि ज्ञान सुचविती. १०४:२४. नीति ३:१९, २०. इर्म. १०: १२. (६७.)

## उद्योगीपणा.

### १५७ उद्योगीपणाचें अगत्य व आश्वासन—सुस्तीचा निषेध.

निर्ग. २०:९. साहा दिवस उद्योग करून आपलें सर्व काम कर

रोम. १२:११. झटण्यांत अळसी होऊं नका, आत्म्यांत आवेशी व्हा, प्रभूची सेवा करा. १३:११. उत्प. ३:१९. न्याय. ५:२३. १काल. २२:१६. नीति १०:४,५. १२:२४ १३:४. २२:२९. २७:२३, २४. २८:१९. उपदे. ५:१२. ९:१० यशा. ५२:१. आम. ६:१. एफ. ४:२८. १थेस्स. ४:११,१२. (२४५,४७,६८३,४३.)

# उधळपट्टी.

## १५८ उधळपट्टी हें पाप आहे–उदाहरणें.

लूक. १५:१३,१८. मग थोडक्या दिवसांनी धाकटा पुत्र सर्व जमा करून दूर देशांत गेला, आणि तेथें उधळेपणाने वागून आपली संपत्ति उडविली. मी उठून आपल्या बापाकडे जाईन व त्याला म्हणेन, हे बापा, म्या आकाशाच्या विरुद्ध आणि तुझ्या समोर पाप केलें आहे; १७. १६: १९,२२,२३. १राजे. ११:१,३. उपदे. २:१०. (६००,६,३६२.)

# उद्धार.

## १५९ उद्धाराचा करार.

योह. ६:३९. आणि ज्या बापाने मला पाठविलें त्याची इच्छा हीच आहे कीं, त्याने जें मला दिल्हें त्यांतून कांहींच म्या हरवूं नये, तर शेवटल्या दिवसीं म्या तें उठवावें. १७:६, ११. इब्री १३:२०,२१. तर आमचा प्रभु येशू, सर्वकाळचा कराराच्या रक्ताने मेंढरांचा मोठा मेंढपाळ, याला ज्याने मेलेल्यामधून माघारें आणिलें. तो शांतीचा देव, तुम्ही त्याच्या इच्छेप्रमाणें करावें म्हणून तुम्हास प्रत्येक चांगल्या कामासाठीं सिद्ध करो, आणि त्याच्या दिसण्यांत जें आवडतें तें त्याने तुमच्या मध्यें येशू ख्रिस्ताकडून करावें. त्याला सदासर्वकाळ गौरव असो. आमेन. गीत ८९:३,४. यशा. ५३:१२. जख. ६:१२,१३.

## १६० प्रायश्चित्ताचें अगत्य–नेमशास्त्र पाळण्याने पाप्यांचा उद्धार होत नाहीं.

गल. २:१६,२१. असें जाणतों कीं, माणूस नेमशास्त्रांतील कर्मांकडून न्यायी ठरत नाहीं, केवळ येशू ख्रिस्तावरील विश्वासाकडून ठरतो;

आह्मी देखील ख्रीस्त येशूवर विश्वास ठेविला, यासाठीं कीं आह्मी नेमशास्त्रांतील कर्मांकडून नव्हे, तर ख्रीस्तावरील विश्वासाकडून न्यायी ठरावें, कारण कीं मनुष्यजातींतील कोणीहि नेमशास्त्रांतील कर्मांकडून न्यायी ठरणार नाहीं. मी देवाची कृपा व्यर्थ करीत नाहीं, का कीं न्यायीपण नेमशास्त्राकडून असलें तर ख्रीस्त उगाच मेला. २०. ३:१०–१२, १८–२४. गीत १४३:२. मात्थी १८:११. प्रेषि. ४:१२. १३:३८, ३९. रोम. ३:१९,२०. ५:६. ९:३१,३२. फिलि. ३:४–७. इब्री ९:२३. याको. २:१०. (६०७.)

## १६१ उद्धार ख्रीस्ताच्या रक्ताकडून होतो.

यशा. ५३:५. परंतु तो आमच्या अपराधांमुळें घायाळ, व आमच्या अन्यायांमुळें चेंगरलेला असा होता; त्याजवर आमची कुशल साधण्याची शिक्षा होती; आणि त्याच्या घायांकडून आह्मास आरोग्य झालें आहे. १योह. १:७. परंतु जसा तो उजेडांत आहे, तसे जर आह्मी उजेडांत चालतों, तर आह्मास एकमेकांसीं भागीपण आहे, आणि त्याचा पुत्र येशू ख्रीस्त याचें रक्त आह्मास सर्व पापापासून शुद्ध करितें. लेवी. १७:११. मात्थी २०:२८. २६:२८. योह. ३:१४,१५. ६:५१. प्रेषि. २०:२८. रोम. ३:२५. ५:८,९,११. १करिंथ. ५:७. १५:३. गल. ३:१३. एफ. २:१३. इब्री ९:१२–१४, २२, २६–२८. १०:१०–१४, १९, २०. १पेत्र. १:१८,१९. २:२४. ३:१८. (योह. १:२९. १०:१५. गल. १:४. २:२०. १तीम. १:१.)

## १६२ प्रायश्चित्ताचें साफल्य, ह्मणजे परमेश्वर आमचें न्यायत्व.

योह. ३:१७. का कीं जग अन्यायी ठरविण्यासाठीं नाहीं, तर जगाचें तारण त्याजकडून व्हावें, ह्मणून देवाने आपल्या पुत्राला जगांत पाठविलें. ६:५१,५५. १०:९. रोम. १०:४. का कीं ख्रीस्त हा प्रत्येक विश्वासणाऱ्याला न्यायीपण होण्यासाठीं नेमशास्त्राचा परिणाम आहे. ३. १:१६,१७. ३:२१,२२. ५:१०,११,१५–२१. यशा. ५३:६. इर्म. २३:६. दानी. ९:२४. एफ. ५:२. फिलि. ३:९. १योह. ४:९,१०. (१योह. ३,५.)

## १६३ उद्धारक पूर्ण असावा.

इब्री ७:२६,२७. तर जो पवित्र, निष्पापी, निष्कलंक, पाप्यांपासून

वेगळा, आणि आकाशापेक्षां अधिक उंच केलेला, असा मुख्य याजक आह्मास शोभतो. आणि असा कीं, मुख्य याजकासारिखें, पहिल्याने आपल्या पापासाठीं, मग लोकांच्या साठीं, प्रतिदिवसीं यज्ञ करावा, असें याला अगत्य नाहीं; कां तर याने आपणालाच अर्पून तें एकदांच केलें आहे. लेवी. २२:१९,२०. मल. १:८. १पेत्र. १:१९.

## १६४ उद्धारकाने सर्वांच्या खंडणीसाठीं आपणाला दिल्हें.

इब्री २:९. परंत जो येशू दुतांपेक्षां जरासा उणा केलेला होता, तो मरण सोसल्यामुळें गौरव व सन्मान यांचा मुगुट घातलेला, असा आमच्या दृष्टीस पडतो; तो यासाठीं उणा झाला कीं त्याने देवाच्या कृपेकरून सर्वांकरितां मरण सोसावें. १योह. २:२. आणि तो आमच्या पापांविषयीं प्रायश्चित्त आहे, आणि आमच्या विषयीं केवळ नव्हे, तर संपूर्ण जगाच्या विषयीं. योह. १:२९. ३:१७. ४:४२. रोम. ५:१८. २करिंथ. ५:१४, १५. १तीम. २:६. (३८.)

## १६५ प्रायश्चित्त करण्यांत देव जो बाप त्याची करणी.

योह. ३:१६. कां कीं जग अन्यायी ठरविण्यासाठीं नाहीं, तर जगाचें तारण त्याजकडून व्हावें, ह्मणून देवाने आपल्या पुत्राला जगांत पाठविलें. १योह. ४:९, १०. देवाची आह्मावरील प्रीति येणेंकरून प्रगट झाली कीं देवाने आपल्या एकुलत्या पुत्राला जगांत यासाठीं पाठविलें कीं, आह्मी त्याकडून जगावें. यांत प्रीति आहे, आह्मी देवावर प्रीति केली असें नव्हे, तर त्याने आह्मावर प्रीति केली, आणि आपला पुत्र आमच्या पापांविषयीं प्रायश्चित्त होण्याकरितां पाठविला. यशा. ६३:६, १०. रोम. ३:२५. गल. ४:४,५.

## १६६ उद्धाराने ईश्वरासीं समेट होतो.

रोम. ५:१,२, १०. यास्तव आह्मी विश्वासाने न्यायी ठरलेले असतां, देवासीं आमच्या प्रभु येशू ख्रीस्ताकडून आमची शांति आहे; ज्या कृपेंत आह्मी आहों तींत त्याकडूनच आमचा प्रवेशहि विश्वासाने झाला, आणि आह्मी देवाच्या गौरवाच्या आशेमुळें आनंद करितों. कां कीं आह्मी शत्रु असतां देवासीं त्याच्या पुत्राच्या मरणाकडून आमचा समेट

झाला, तर आतां समेट झाल्यावर त्याच्या जीवनाकडून फार विशेषें-करून आम्ही तरूं. २ करिंथ ५:१८,१९. एफ. २:१३–१९. कल. १:२०–२२. इब्री २:१७. (३५१.)

## १६७ उद्धाराने क्षमा, न्यायीकरण आणि देवाजवळ प्रवेश होतो.

यशा. ५५:७. दुष्ट आपल्या मार्गास, व अन्यायी मनुष्य आपल्या संकल्पांस सोडो, आणि परमेश्वराकडे फिरो, म्हणजे तो त्याजवर दया करील, आणि आमच्या देवाकडे फिरो, कां कीं तो फार क्षमा करील. ४३:२५. ४४:२२. रोम. ३:२४. त्याच्या कृपेने ते ख्रिस्त येशूने केलेल्या खंडणीमुळें फुकटवारी न्यायी ठरतात. ६:१४. ८:१, २, २८–३०, ३३, ३४, ३७. गीत ३२:१, २. (रोम. ४:७.) गीत ८५:२, ३. १३०:४. मीख. ७:१८, १९. १ करिंथ. ६:११. १५:५७. गल. ५:१८. एफ. १:६, ७. २:१८, १९. ३.१२. ४:३२. कल. १:२१. २:१३, १४. १ योह. २:१२.

## १६८ उद्धाराने दत्तपुत्रपणा प्राप्त होतो.

योह. १:१२. परंतु जितक्यांनी त्याला अंगीकारिलें म्हणजे त्याच्या नांवावर विश्वास ठेविला तितक्यांस त्याने देवाचीं लेंकरें होण्याचा अधिकार दिल्हा. एफ. १:५. त्याने आपल्या इच्छेच्या मनोदयाप्रमाणें, आपल्यासाठीं आम्हास येशू ख्रिस्ताकडून दत्तपुत्रपण पावण्याला पूर्वी नेमिलें. रोम. ८:१४–१७. २ करिंथ. ६:१७, १८. गल. ३:२६, २९. ४:४–७. १ योह. ३:१, २. (९९–१००, ४५७, ३५७.)

## १६९ उद्धाराने मंडळीसाठीं विशेष दया, विश्वासुपण व ममता दाखविली आहे.

प्रगट. १:५, ६. आणि येशू ख्रिस्त, विश्वासू साक्षी, जो मेलेल्यांमधून प्रथम जन्मलेला, व पृथ्वींतील राजांचा अधिकारी, त्यापासून तुम्हावर कृपा व शांति असो; ज्याने आम्हावर प्रीति केली, आणि आपल्या रक्ताने आमच्या पापांपासून आम्हास धुतलें; आणि देव म्हणजे आपला बाप यासाठीं आम्हास राजे व याजक केलें आहे, त्याला गौरव व पराक्रम सदासर्वकाळ असो. आमेन. अनु. ७:९. ३२:९–१२. नहे. ९:१७–२१. ईयो. ३६:७. गीत १०५:१२–१५. यशा. ४०:१. ४३:

१३–१६. ५४:८, १०, १७. ६३:९. होशे. २:१९. जख. २:८. मात्थी २८:२०. योह. १४:१६–१८. (२८२, २१५–२१६, ७८, ३५७.)

## १७० उद्धार कृपेने होतो.

२ तीम. १:९. त्याने आम्हास तारिलें व पवित्र बोलावण्याने बोलाविलें आहे, आमच्या कर्माप्रमाणें नव्हे, तर त्याचाच निश्चय व कृपा याप्रमाणें ही कृपा जगाच्या पूर्वी ख्रिस्त येशूकडून आम्हावर ठेविली होती; तित. ३:७. यासाठीं कीं आम्ही त्याच्या कृपेकडून न्यायी ठरून, आशेने सर्वकाळच्या जीवनाचे वतनदार व्हावें. ५, ६. प्रेष. २०:२४. रोम. ३: २४. ५:८, १५–१७. ९:१६. ११:५, ६. १ करिंथ. ४:७. १५:१०. एफ. १:५, ६. २:४–१०. १ पेत्र. १:१०. (६३४, ३५३.)

## १७१ उद्धार देवाला व त्याच्या नेमशास्त्राला मानदायक आहे.

गीत ८५:१०. दया व सत्यता एकत्र मिळाली आहे; नीति व शांति यांनी चुंबन घेतलें आहे. रोम. ३:२६, ३१. सांप्रत काळीं आपला न्याय दाखवावा, असा कीं येशूवर विश्वास ठेवणारा याला न्यायी ठरवून आपण न्यायी राहावें. तर आम्ही विश्वासाने नेमशास्त्राला व्यर्थ करितों काय? असें न घडो; पण आम्ही नेमशास्त्र स्थापितों. यशा. ४२:२१. २ करिंथ. ४:६. एफ. ३:८–११. १ तीम. १:११. १ पेत्र. १:१२. (१५०.)

# उपरोध.

## १७२ उपरोधी बोलणें शास्त्रांत कोठें कोठें आहे.

१ राजे. १८:२७. नेव्हां दुपारीं असें झालें कीं एलियाने त्यांची थट्टा करून ह्मटलें, "तुह्मी मोठ्या शब्दाने हाक मारा, कारण कीं तो देव आहे; कदाचित् ध्यान करीत असेल, किंवा कदाचित् तो बाहेर गेला, किंवा कदाचित् तो वाटेवर चालत असेल, कोण जाणे, तो निजला असला, तर जागा केला पाहिजे." ईयोब १२:१, २. आणि ईयोब उत्तर करीत ह्मणाला, "निश्चयें तुह्मीच लोक आहां, आणि तुह्मासहित ज्ञान मरून जाईल." न्याय. १०:१४. उपदे. ११:९.

# उपाध्यपण.

## १७३ ख्रिस्ती उपाध्यपणाचा हेतु व उपयोग.

एफ. ४:११–१३. आणि त्याने कोणी प्रेषित, व कोणी भविष्यवादी व कोणी सुवार्त्तिक, व कोणी पाळक व उपदेशक, असे नेमून दिल्हे आहेत, पवित्रांची पूर्णता करण्यासाठीं, सेवेच्या कामासाठीं, ख्रीस्ताच्या शरिराच्या रचनेसाठीं, सर्व आह्मी विश्वास व देवाच्या पुत्राची ओळख यांच्या ऐक्यांत येऊन, सिद्ध पुरुषपणास, ख्रीस्ताच्या पूर्णतेच्या वाढीच्या परिमाणास पोहंचतों, तोंपर्यंत. इर्म. ३:१५. १५:१९. यहेज्के. ३:१७. मात्थी ५:१३, १४. प्रेषि. २६:१७, १८. रोम. १०:१४, १५. (यशा. ५२:७.) १करिं. १:२१. २करिं. १:२४. ५:२०. (१तीम. ३:१. इब्री १३:१७.) (२२२.)

## १७४ उपाध्य ईश्वर नेमितो व सिद्ध करितो.

मल. २:७. तर याजकाच्या ओंठानी ज्ञान राखावें आणि त्याच्या मुखाजवळून लोकानी नेमशास्त्र शोधावें; कां कीं तो सैन्यांचा परमेश्वराचा दूत आहे. लूक १०:१. त्यानंतर प्रभूने अणखी सत्तर जण नेमून ज्या ज्या नगरांत व ठिकाणीं आपण जाणार होता तेथें त्यांस दोघांस आपल्या पुढें पाठविलें. २. यशा. ६२:६. प्रेषि. २०:२४, २८. २६:१६–१८. रोम. १२:६–८. १करिं. १:१, १७. २करिं. ५:१८. कल. ४:१७. १तीम. १:१२. तित. १:३. (१करिं. १२:७–११.) (५५०.)

## १७५ ईश्वर आमक्यांस शुभवर्त्तमान घोषण करण्यास बोलावितो.

१करिं. ९:१६. कां कीं जरी मी शुभवर्त्तमान सांगतों तरी मला नावाजून घेण्याचें कारण नाहीं, कां तर मला अगत्य पडलें आहे, आणि जर मी शुभवर्त्तमान सांगत नाहीं, तर मला हाय हाय आहे. इब्री ५:४. आणि कोणीहि आपल्या आपण ही पदवी घेत नाहीं; केवळ जो आहरोनासारिखा देवाकडून बोलावलेला तो मात्र घेतो. गल. १:१५, १६.

## १७६ उपाध्यांस कामावर स्थापावें.

मार्क. ३:१४. मग त्याने बारा जणांस नेमिलें; यासाठीं कीं त्यानी

आपल्या बरोबर असावें आणि आपण त्यांस गाजवायास पाठवावें. प्रेषि. १३:२, ३. ते प्रभूची सेवा व उपास करीत असतां पवित्र आत्म्याने सांगितलें कीं, बार्णबा व शौल यांस ज्या कार्यासाठीं म्या निवडिलें आहे, त्यासाठीं त्यांस मजकरितां निराळें करून ठेवा. तेव्हां त्यांनी उपास व प्रार्थना करून व त्यांजवर हात ठेवून त्यांची रवानगी केली. १४:२३. २तीम. २:२. तित. १:५. (७४०.)

## १७७ पूर्वेकडील उपाध्यपण.

उत्प. ४७:२२. याजकांची भूमि मात्र त्यानें विकत घेतली नाहीं, कां कीं फारोपासून याजकांस हक्क होता, आणि त्याचा हक्क फारो त्यांस देत होता तो ते खात होते, यास्तव त्यांनी आपली भूमि विकली नाहीं. निर्ग. ३:१. तेव्हां मोशे आपला सासरा इथ्रो जो मिद्यानांतील याजक त्याच्या शेरडांस चारीत होता: आणि तो शेरडांस रानाच्यामागें नेऊन देवाचा डोंगर होरेब तेथवर गेला.

## १७८ उपदेश करण्याची मुळची चाल.

१करिं. २:४, ५. आणि माझें बोलणें व माझें गाजविणें हीं मानवी ज्ञानाच्या मोहक गोष्टींनी नव्हतीं, तर आत्म्याच्या व सामर्थ्याच्या पटविण्याने होतीं; यासाठीं कीं तुमचा विश्वास माणसांच्या ज्ञानाने होऊं नये, तर देवाच्या सामर्थ्याने व्हावा. प्रेषि. १७:२. २करिं. ३:१२. ४:१, २. (१७३, १८४, १८७.)

## १७९ उपाध्यांची योग्यता व तयारी कशी असावी.

तित. १:६–९. कोणी निर्दोष असला, एकाच बायकोचा नवरा, ज्याचीं लेंकरें विश्वासणारीं आहेत, उधळेपणाचा आरोपांत किंवा अनधीन असीं नाहींत, [तर तो नेमावा.] कां तर अध्यक्ष देवाच्या कारभाऱ्यासारिखा निर्दोष असला पाहिजे, तो स्वच्छंदी किंवा रागीट किंवा मद्यपी किंवा मारका किंवा लोभिष्ट नसावा; तर पाहुणचार करणारा, चांगल्यांचा मित्र, सद्बुद्धिमान्, न्यायी, धार्मिक, जितेंद्रिय, उपदेशाप्रमाणें विश्वासू वचनाचा बळकट धरणारा, असा असावा; यासाठीं कीं त्याने निर्दोष उपदेशाकडून संबोध करायास, व अडविणाऱ्यांस कुंठित करायासहि शक्तिमान् व्हावें. १तीम. ३:२–७. २तीम. २:२, २४, २५. (मात्थी १३:५२. १करिं. ४:२.)

### १८० उपाध्यांच्या अर्थसूचक संज्ञा.

२ करिं. ५:२०. यास्तव आह्मी ख्रिस्तासाठीं वकिली करितों, देव आह्माकडून बोध करवीत असल्यासारिखा आहे; आह्मी ख्रिस्ताकरितां विनंती करितों कीं, तुह्मी देवासीं समेटाने मिळावें. ४:५. एफ. ४:११. आणि त्याने कोणी प्रेषित, व कोणी भविष्यवादी, व कोणी सुवार्तिक व कोणी पाळक व उपदेशक, असे नेमून दिल्हे आहेत. तित. १:७. १तीम. ५:१७. २करिं. १:२४. १करिं. ३:९. २करिं. ६:१. ११: १५. लूक. १:२. मात्थी २:७. ५:१३. प्रेषि. २०:२८. २६:१६. याको. १:१. इर्म. २३:४. यशा. २६:६. प्रग. ११:३.

### १८१ उपाध्यांचे अधिकार व हक्क.

१तिम. ५:१७. जे वडील चांगल्या प्रकारें अधिकार करितात, ते दुप्पट सन्मानास योग्य मोजावे; विशेषेंकरून वचन व उपदेश यांविषयीं श्रम करणारे. तित. २:१५. या गोष्टी बोलून व बोध करून, पूर्ण अधिकाराने निषेध कर; कोणी तुला तुच्छ करूं नये. प्रेषि. २०:१७, २८. २करिं. १०:८. १३:१०. २तीम. ४:१,२. इब्री. १३:७,१७.

### १८२ उपाध्यांच्या अधिकाराची मर्यादा.

मात्थी २०:२७,२८. आणि जो कोणी तुह्मामध्यें पहिला व्हायास पाहील तो तुमचा दास होवो; ज्याप्रकारें मनुष्याचा पुत्र सेवा घ्यायास नाहीं, तर सेवा करायास आणि बहुतांची खंडणी व्हावी ह्मणून आपला जीव द्यायास आला, तसेंच. २५,२६. १पेत्र. ५:३. आणि वतनावर धनीपण करावें असें नव्हे, तर कळपाचे कित्ते व्हा. (मार्क. १०:४२.) मात्थी २३:८—१०.

## उपाध्यांचे अवश्य धर्म.

### १८३ उपाध्यानी ज्ञान, धार्मिकपणा व चातुर्य बाळगावें.

प्रेषि. २०:२८. तर तुह्मी आपणांस व ज्या कळपावर पवित्र आत्म्याने तुह्मास अध्यक्ष करून ठेविलें त्या सर्वांस संभाळा, यासाठीं कीं देवाची जी मंडळी त्याने आपल्या रक्ताने विकत घेतली तिचें पाळण तुह्मी

करावें. २९–३१. ६:४. २तीम. ४:५, तूं तर सर्व गोष्टींविषयीं सावध ऐस, दुःख सोस, सुवार्तिकाचें काम कर, आपली सेवा पूर्ण कर. ७. १:१३. २:३, ४, २२, २३. यहेझ्के. २:८. मात्थी १०:१६. रोम. २:२१. १करिं. ९:२५–२७. १थेस्स. २:१०. १तीम. ४:१२–१६. ६:२०, २१. तित. २:७, ८. (५२४, १८९.)

## १८४ उपाध्यानीं ख्रीस्ताचे वकील असून विश्वासुपणानें शुभवर्त्तमान घोषण करावें.

यहेझ्के. २:७. आणि त्यानीं ऐकिलें किंवा न ऐकिलें, तरी त्यांस माझीं वचनें सांग; कां कीं ते फितूरी आहेत. ३:१०, ११. २तीम. २:१५. देवाजवळ पटलेला, लज्जाकारणाविरहित कामकरी, खरेपणाचें वचन नीट वांटणारा, असा होण्यास प्रयत्न कर. ४:१–५. अनु. ३३: १०. नहे. ८:८. उपदे. १२:९. इर्म. १:१७. २३;२८. २६:२. मात्थी २८:१९, २०. प्रेषि. ५:४२. २०:१८, २०, २६–२८. १करिं. ४:१, २. ९:१६. २करिं. २:१७. ४:१, २. गल. १:१०. १थेस्स. २:३–५. तित. २:१. १पेत्र. ४:११. (४२४, २४७, ६१२, १५२, ६६१, १८८.)

## १८५ उपाध्यानीं निरुपद्रविक असावें.

२करिं. ६:३, ४. आह्मी कोणाला कांहीं अडखळण देत नाहीं, यासाठीं कीं आपल्या सेवेवर दोष लागूं नये. परंतु सर्व प्रसंगीं आह्मी देवाचे सेवक असें आपणांस दाखवितों; फार सहनतेनें, संकटानीं, गरजानीं, पेंचानीं. मात्थी १७:२७. रोम. १४:२१. १करिं. ९:१९, २०, २२. १०:३२, ३३. २तीम. २:२४. (२४९, ७००.)

## १८६ उपाध्यानीं मनुष्यांचें भय टाकून धैर्य धरावें.

इर्म. १:७, ८. तेव्हां परमेश्वरानें ह्मटलें, मी पोर आहें, असें बोलूं नको; कां कीं ज्या सर्वांकडे मी तुला पाठवीन त्यांजजवळ जासील, आणि जें मी तुला आज्ञापीन तें सर्व बोलसील. त्यांस भिऊं नको, कां तर तुला पार पाडायासाठीं मी तुझ्याजवळ आहें, असें परमेश्वर ह्मणतो. १७–१९. यहेझ्के. २:६. प्रेषि. ४:१३, १८–२०, २९. ६:१०. ९:२९. १८:९, १०. १९:८. फिलि. १:२०. (३६७, ३४८.)

## १८७ उपाध्यानीं पापें उघडकीस आणावीं आणि अपराध्यांचा निषेध करावा.

यशा. ५८:१. तूं गळा काढून ओरड, नियमन करूं नको, तूं आपला शब्द कर्ण्याप्रमाणें उंचाव, माझ्या लोकांस त्यांचे अपराध, व याकोबाच्या घराण्यास त्यांचीं पातकें दाखीव. १तीम. ५:२०. पाप करणाऱ्यांस सर्वांच्या देखतां धमकाव, दुसऱ्यांसहि भय वाटावें ह्मणून. १शमु. १३:१३,१४. २शमु. १२:७. १राजे. १८:१७,१८. २१:२०. यहेज्के. १६:२. मीख. ३:८. प्रेषि. २:२३. ७:५१–५३. २तीम. ४:२. तित. १:१०,११,१३. (३७४–५)

## १८८ उपाध्यानीं देवभक्त आणि दुष्ट यांचा भेद मानावा.

यहेज्के. ४४:२३,२४. आणि ते माझ्या लोकांस पवित्राचा व अपवित्राचा भेद शिकवितील, आणि अशुद्धाचा व शुद्धाचा भेद त्यांस कळवितील. आणि वादाविषयींचा न्याय करायाला ते उभे राहतील; आणि माझ्या न्यायांप्रमाणें ते ठरवितील; आणि ते माझ्या सर्व सभांत माझे विधि आणि माझे नियम पाळितील; आणि माझे शाब्बाथ दिवस पवित्र रक्षितील. इर्म. १५:१९,२०. मल. ३:१८. (१८४,३३०.)

## १८९ उपाध्यानीं प्रार्थना करावी, सावध असावें आणि लोकांच्या घरीं जाऊन समक्ष बोध द्यावा.

प्रेषि. २०:३१. यास्तव सावध असा, आणि हें आठवा कीं, तीन वर्षे रात्रंदिवस मी तुह्मा प्रत्येकास आसवानीं बोध करितां राहिलों नाहीं. १शमु. १२:२३. इर्म. २३:२. योए. २:१७. मात्थी २५:४२,४३. रोम. १:९. २करिं. ११:२. १२:१४,१५. गल. ४:१९,२०. फिलि. १:३–५,८. कल. १:९–११,२८. ४:१२,१३. १थेस्स. २:६–१२. (१थेस्स. ३:७–११.)

## १९० उपाध्यानीं आपल्या कामांत अगदीं तत्पर असावें.

१करिं. २:२. कारण कीं येशू ख्रीस्त ह्मणजे खांबीं दिल्हेला, याशि-

वाय तुह्मामध्यें कांहींच जाणूं नये, ह्मणून म्यां निश्चय केला होता. १तीम. ४:१५. तुझें प्रवीणपण सर्वांस दिसून यावें, ह्मणून तूं या गोष्टींचें चिंतन कर, यामध्यें तत्पर ऐस. लूक ९:५९, ६०. प्रेषि. ६:२–४.

# उपाध्यांचे हवाले, मोह व प्रतिफळें.

## १९१ उपाध्यांची जबाबदारी.

यहेज्के. ३३:७, ८. तसाच हे मनुष्याच्या पुत्रा, तूं आहेस; म्यां तुला इस्राएलाच्या वंशासाठीं पाहरेकरी ठेविलें आहे; ह्मणून तूं माझ्या मुखापासून वचन ऐकसील, आणि मजपासून त्याला बोध करिसील. जेव्हां मी दुष्टाला ह्मणतों अरे दुष्टा, तूं निश्चयें मरसील; तेव्हां जर दुष्टाला त्याच्या मार्गापासून बोध करायाला बोलत नाहींस, तर तो दुष्ट आपल्या अन्यायांत मरेल: परंतु त्याचें रक्त मी तुजपासून घेईन. ९. (३:१७, १९) ३४:८–१०. १तीम. १:११. ६:२०,२१.

## १९२ उपाध्यांचे मोह.

### १. ऐकणाऱ्यांस संतोषविण्याचा मोह.

गण. २४:१०, ११. तेव्हां बलामावर बालाकाने रागें भरून आपले हात आपटिले; आणि बालाक बलामाला बोलला, "माझ्या शत्रूंस शाप द्यायास म्यां तुला बोलाविलें: परंतु पाहा, त्वां आतां तीन वेळा त्यांस आशीर्वादच दिल्हा. तर आतां तूं आपल्या ठिकाणीं पळून जा; मी तुझें मोठें गौरव करीन, असें म्यां ह्मटलें: परंतु पाहा, परमेश्वराने गौरवाविषयीं तुला प्रतिबंध केला आहे."

### २. वडे लोकांची अवकृपा टाळण्याचा मोह.

आमो. ७:१२. आणि आमझ्या आमोसाला ह्मणाला, अरे दृष्टांत पाहणाऱ्या, तूं यहूदा देशांत पळून जा, आणि तेथें भाकर खा, आणि तेथें भविष्य सांग. १३. प्रेषि. ४:१८.

### ३. खऱ्या देवाची गोष्ट लपविण्याचा मोह.

यशा. ३०:९–११. कीं हे स्वतंत्र लोक, लटकें बोलणारीं लेंकरें आहेत, जे परमेश्वराचें नेमशास्त्र ऐकायाला मान्य नाहींत, असीं लेंकरें आहेत; जे दर्शविणाऱ्यांस ह्मणतात, पाहूं नका; आणि भविष्यवाद्यांस

आह्माजवळ प्रमाणिक गोष्टी भविष्य सांगूं नका; आह्माला गोड गोष्टी बोला, ठकविण्याच्या गोष्टी सांगा, मार्गांपासून सरा, वाटेंतून एकीकडे वळा, इस्राएलाचा पवित्र आमच्यासमोरून नाहींसा होई, असें करा.

## ४. लोकसिद्ध पाखंडें, मतिभ्रम व दुर्व्यसनें यांस पाठीस घालण्याचा मोह.

निर्ग. ३२:२१–२३. तेव्हां मोश्यानें आहरोनाला ह्मटलें, "या लोकांनीं तुला काय केलें ह्मणून त्वां त्यांवर मोठें पाप आणिलें?" तेव्हां आहरोनानें ह्मटलें, "माझ्या प्रभूचा राग तापूं नये, तूं लोकांला जाणतोस कीं ते दुष्कर्मी आहेत. तर त्यांनीं मला सांगितलें, तूं आह्मासाठीं असे देव कर कीं आमच्यापुढें चालतील, कां तर तो मोशे, ज्या माणसानें आह्मास मिसरदेशांतून आणिलें, त्याला काय झालें हें आह्मास कळलें नाहीं. आमो. २:११, १२.

## १९३ विश्वासू उपाध्यांची छळणूक व पाठलाग होत असतात.

१ करिं. ४:९, ११. कां तर मला असें वाटतें कीं, देवानें आह्मा प्रेषितांस सर्वांहून शेवटले, मरणासाठीं नेमलेले, तसें पुढें करून दाखविलें आहे, कारण कीं आह्मी जगाला व दूतांस व माणसांस सोंग असे झालों आहों. आतांच्या घटकेपर्यंत आह्मी भुकेले व तान्हेले व नागवे आहों, आणि मार खातों, आणि भडकत जातों. १३. इर्म. २:३०. १५:१०. यहेज्के. ३३:३०. मात्थी १०:१६–१८, २२–२५. २३:३४. योह. १६:३३. १७:१४. प्रेषि. ५:४०, ४१. ७:५२. ९:१५, १६. २०:२३. २ करिं. १:५–७. ४:८–११. ६:४, ५, ८–१०. ११:२३–२७, ३२, ३३. गल. १:१०. ५:११. १ थेस्स. ३:३, ४. २ तीम. २:३, ९. ३:११, १२. प्रग. १:९. (२५०, ४३५.)

## १९४ उपदेश करण्यांत यश पावण्याचीं वचनें व उदाहरणें.

दानी. १२:३. आणि जे ज्ञानी, ते अंतराळाच्याप्रकाशासारिखे, आणि ज्यांनीं बहुतांस न्यायी केलें, ते तान्यासारिखे सदासर्वकाळपर्यंत प्रकाशतील. योह. ४:३६. आणि कापणारा मजुरी पावतो आणि सर्वकाळच्या

जीवनासाठीं फळें एकवट करितो, असें कीं पेरणाऱ्यानें व कापणाऱ्यानेंहि बरोबर आनंद करावा. इफि. २३:२२. मार्क. १:१७. प्रेषित. ११:२४, १४:१. १ तीम. ४:१६. (६६३.)

## १९५ सांप्रतचा यश विश्वासुपणाप्रमाणें सर्वदां होतो कीं काय ?

योह. १२:३७,३८. त्यानें इतके चमत्कार त्यांच्या देखतां केले असतांहि त्यांनीं त्याजवर विश्वास ठेविला नाहीं. कां कीं यशाया भविष्यवाद्यानें जी गोष्ट सांगितली होती ती पूर्ण व्हायाची होती, ती असी कीं, हे प्रभू, आमची वार्त्ता कोणीं विश्वासली ? आणि प्रभूचा बाहु कोणाला प्रगट झाला आहे. ३९,४०. यशा. ४९.४,५. ५३:१. यहेज्के. ३:७. प्रेषित. १३:४६. (६६६.)

## १९६ विश्वासू उपाध्यांस ईश्वर आश्वासन व फळ देतो.

लूक. ६:२२,२३. जेव्हां मनुष्याच्या पुत्राकरितां माणसें तुमचा द्वेष करितील व तुह्मांस दूर करितील व निंदितील व तुमचें नांव वाइटासारिखें वर्जतील, तेव्हां तुह्मी धन्य आहां. त्या दिवसीं आनंद करा उड्याहि मारा, कां कीं पाहा, आकाशामध्यें तुमचें वेतन मोठें, कां तर त्याप्रमाणें त्यांच्या पूर्वजांनीं भविष्यवाद्यांस केलें होतें. इफि. १:१८,१९. १५:१९–२१. यहेज्के. ३:८,९. मात्थी २८:२०. २तीम. ४:७,८. (३८१.)

## १९७ विश्वासू उपाध्यासाठीं प्रार्थना करावी.

२थेस्स. ३:१,२. शेवटीं, भावानो, आह्मासाठीं प्रार्थना करा कीं, प्रभूचें वचन वेगें चालावें, आणि जसें तुह्मामध्यें तसेंच गौरव पावावें. आणि असें कीं आह्मी वावग्या व दुष्ट माणसांपासून सुटावें, कां तर अवघ्यांचा विश्वास नाहीं. एफ. ६:१८,१९. १थेस्स. ५:२५.

## १९८ विश्वासू उपाध्यांचा खर्चाचा निर्वाह करावा.

१ तीम. ५:१७,१८. जे वडील चांगल्या प्रकारें अधिकार करितात, ते दुप्पट सन्मानास योग्य मोजावे; विशेषंकरून वचन व उपदेश यांविषयीं श्रम करणारे. कां तर शास्त्रांत सांगितलें आहे कीं, मळणी करणाऱ्या बैलाला मुसकें घालूं नको, आणि कामकरी आपल्या मजुरीस योग्य आहे. गण १८:२१. मल. ३:१०. मात्थी १०:९,१०. योह. १३:२०. १ करिं. ९:११,१३,१४. गल. ६:६ १ थेस्स. ५:१२,१३:

# उपास.

## १९९ उपास कसा करावा.

मात्थी ६:१६–१८. आणि तुह्मी उपास करितां तेव्हां ढोंग्यासारिखे म्लानमुख होऊं नका; कां कीं आपण उपास करीत अहों, असें लोकांस दिसावें, ह्मणून ते आपलें तोंड उतरें असें करितात; मी तुह्मास खचीत सांगतों कीं, त्यांस त्यांचें फळ मिळालेंच आहे. तूं तर उपास करीत असतां आपल्या डोक्यांला तेल लाव, आणि आपलें तोंड धू, यासाठीं कीं, तूं उपास करितोस हें माणसांस नव्हे तर तुझा बाप जो गुप्तांत आहे त्याला दिसावें, मग गुप्तांत पाहणारा तुझा बाप तुला लौकिकांत फळ देईल. यशा. ५८:४–७.

## २०० उपास करण्याचीं उदाहरणें.

प्रेषि. १३:२,३. ते प्रभूची सेवा व उपास करीत असतां पवित्र आत्म्यानें सांगितलें कीं, बार्णबा व शौल यांस ज्या कार्यासाठीं म्या निवडिलें आहे, यासाठीं त्यांस मजकरितां निराळें करून ठेवा. तेव्हां त्यांनीं उपास व प्रार्थना करून व त्यांजवर हात ठेवून त्यांची रवानगी केली. १०:३०,३१. १४:२३. इज्रा. ८:२१–२३. दान. ९:३. योना. ३:५–१०. मात्थी ४:१,२. लूक. २:३६,३७. २ करिं. ६:५. ११:२७,२८.

## २०१ खोटा उपास.

यशा. ५८:३–५. आह्मीं कां उपास केला, आणि तूं पाहत नाहींस? आह्मीं आपल्या जीवाचें पीडन केलें, आणि तूं मानीत नाहींस? पाहा, तुह्मी आपल्या उपासाच्या दिवसीं आनंद पावतां आणि आपल्या सर्व कामकऱ्यांस श्रमवितां. पाहा, तुह्मी विवाद व भांडन यांसाठीं, व दुष्टतेच्या मुठीनें हाणायासाठीं उपास करितां; तुमचा शब्द उंच स्थानांत ऐकूं जावा, असें करायाला तुह्मी आज उपास करीत नाहीं. जो उपास ह्मणजे मनुष्याचा स्वजीव पीडनाचा दिवस मी निवडितों, तो असाच आहे काय? लव्हाप्रमाणें आपलें डोसकें लवविणें व आपल्याखालीं राख व गोणताट विस्तरणें आहे काय? याला उपास व परमेश्वराचा मान्य दिवस ह्मणसील कीं काय? जख. ७:५,६. लूक. १८:११,१२. (६ १५,३६०,४३४·६·८२,७१६.)

# औदार्य.

## २०२ औदार्य करावें.

मात्थी १०:८. रोग्यांस बरें करा, मेलेल्यांस उठवा, कोड्यांस शुद्ध करा, भूतें काढा, फुकट तुह्मास मिळालें आहे, फुकट द्या. इब्री. १३: १६. आणि उपकार करणें व दान देणें हीं विसरूं नका; कारण कीं अशा यज्ञानी देव संतुष्ट होतो. उपदे. ११:१,२. लूक ३:११. १२: ३३,३४. १६:९,११,१३,१४. प्रेषि. २०३५. २ करिं. ८:७. गल. ६: ९,१०. १ तीम. ६:१७–१९. (५२५, ३२०.)

## २०३ औदार्याचीं उदाहरणें.

प्रेषि. १:४. तेव्हां त्याजकडे लक्ष लावून तो भयभीत होऊन ह्मणाला, हे प्रभू, काय आहे ? मग तो त्यासीं बोलला कीं, तुझ्या प्रार्थना व तुझे दानधर्म हीं देवासमोर स्मरणासाठीं वरतीं आलीं आहेत. (३०,१०, ३४६.)

## २०४ औदार्याचीं फळें व लोभाचे अपकार.

२ करिं. ९:६,७. तर असें कीं, जो चुंबकपणानें पेरितो तो चुंबकपणानें कापणीहि करील, आणि जो उदारपणानें पेरितो तो उदारपणानें कापणीहि करील. प्रत्येक आपल्या अंतःकरणांत जसी योजना करितो त्याप्रमाणें त्यानें द्यावें; खेदानें किंवा अगत्यानें नये; कां कीं संतोषानें देणाऱ्यावर देव प्रीति करितो. ८. २ काल. ३१:१०. गीत ३७:३,२५, २६. १३:७. यशा. ३२:८. मल. ३:९–१२. लूक ६:३८. प्रेषि. २०: ३५. (११,३२१,३८१,७१४.)

---

# कामातूरपणा.

## २०५ कामातूरपणा हा अधर्म फार रूढींत आहे.

इर्म. ९:२. २३:१०. मला जंगलांत वाटसरूंचा आश्रय कोण देईल? ह्मणजे मी आपले लोक सोडून त्यापासून दूर जाईन; कारण कीं ते सर्व जारकर्मी, अविश्वासूंच्या सभा आहेत. कां तर देश जारकर्म्यांनीं भरिला आहे; आणि शापामुळें भूमि शोक करिते, रानांतलीं कुरणें सुकलीं

आहेत, आणि त्यांची धांव दुष्ट व त्यांचें बल ठीक नाहीं. यहेज्क. २२: ९,११. मात्थ. १२:३९. योह. ८:७,९. गल. ५:१९. १ पेत्र. ४:३,४. (उत्प. १९:५. लेवी. १८:२२–२५. १ शमु. २:२२. होशे. ७:४.)

## २०६ कामातूरपणा हा ठकाऊ व मोहकारक आहे.

नीति ५:३. कां कीं परनारीचे ओंठ मधाच्या शिशासारिखे गळ-तात, आणि तिचें मुख तेलापेक्षां मऊ असतें. ६:२३–२५. ७:१०–१८

## २०७ कामातूरपणा मना केला आहे.

मात्थी ५:२७,२८. "व्यभिचार करूं नको," असें प्राचीन लोकांस सांगितलें होतें, हें तुह्मी ऐकिलें आहे. परंतु मी तुह्मास सांगतों कीं, जो कोणी बायकोकडे कामदृष्टीने पाहतो, त्याने आपल्या अंतःकरणांत तिज-सीं व्यभिचार केला आहे. निर्ग. २०:१४. प्रेषि. १५:२०. रोम. १३: १३. एफ. ५:३,४. कल. ३:५,६. १ तीम. १:१०. १ पेत्र. २:११. (उत्प. ३९: ७–९. लेवी. १८:२०–२३. १९:२९. नीति ३१:३. हब. २:१५. १ थेस्स. ४:३-५.)

## २०८ कामातूरपणाबद्दल दोष व दंड.

प्रग. २१:८. २२:१५. परंतु भेकड व अविश्वासी व ओंगळ व घातक व व्यभिचारी व चेटकी व मूर्त्तिपूजक व सर्व लबाड, यांचा भाग, जें स-रोवर अग्नीने व गंधकाने जळतें, त्यांत होईल. हें दुसरें मरण आहे. परंतु कुत्रे व चेटकी व व्यभिचारी व घातक व मूर्त्तिपूजक व सर्व जे लबा-डीवर प्रीति करितात आणि ती करितात, ते बाहेर आहेत. उत्प. ३९:९. लेवी. २०:१०. नीति. २:१८,१९. ५:३,४,८–१२. ७:२२–२७. उपदे. ७: २६. इर्म. २३:१४,१५ मल. ३:५. १ करिं. ५:११. ६:९,१०. १०:८. (गण. २५:१–९.) गल. ५:१९–२१. एफ. ५:५,६. इब्री. १३:४. यहु. ७. (नीति ६:२६–३४. ९:१६–१८. २९:३. उपदे. ७:२५,२६. इर्म. ५: ७–९. होशे. ४:११. रोम. १:२७.)

# किन्ना.

## २०९ चांगले किन्ने दाखविण्याचा धर्म.

मात्थी ५:१६. माणसांपुढें तुमचा उजेड असा प्रकाशो कीं, त्यांनी

तुमचीं चांगलीं कामें पाहावीं, आणि तुमच्या आकाशांतील बापाचें गौरव करावें. तीत. २:७,८. सर्व गोष्टींविषयीं चांगल्या कामांचा कित्ता असें आपणाला दाखीव, उपदेशांत शुद्धपण, गंभीरता, ज्या शुद्ध बोलण्यावर दोष ठेवितां येत नाहीं, तें दाखीव; यासाठीं कीं, जो प्रतिकूळ त्याला तुझाविषयीं कांहीं वाईट बोलण्याची जागा नसतां, भीड व्हावी. कल. ४:५. १तीम. ४:१२.

## २१० चांगल्या क्रियांस अनुसरावें आणि वाईट क्रियांस वर्जावें.

याक. ५:१०. माझ्या भावानो, जे भविष्यवादी प्रभूच्या नावानें बोलले आहेत, त्याचें उदाहरण दुःख सोसण्याविषयीं व धीराविषयीं घ्या. १ पेत्र. २:२१. कारण कीं याकरितां तुम्ही बोलाविलेले आहां; कां तर ख्रीस्तानेंहि आह्मासाठीं सोसून आह्माकरितां कित्ता घालून ठेविला आहे, तुह्मी त्याच्या पावलांस अनुसरावें ह्मणून. निर्ग. २३:२. मात्थी २३:३. १करिं. ११:१. फिलि. ३:१७. इब्री. ६:१२.१३:७. ३योह. ११.

# कृतज्ञता.

## २११ कृतज्ञतेचीं उदाहरणें व फळें.

२शमु. ९:६,७. आणि शाऊलाचा पुत्र योनाथान याचा पुत्र मफीबोशेथ दावीदाजवळ आला, तेव्हां पालथा पडून त्यानें नमस्कार केला; मग दावीद बोलला, "हे मफीबोशेथा," आणि त्यानें उत्तर केलें "पाहा, आपला चाकर आहे." तेव्हां दावीदानें त्याला ह्मटलें, "भिऊं नको, कारण कीं तुझा बाप योनाथान यामुळें मी निश्चय करून तुजवर कृपा करीन, आणि तुझा आजा शाऊल याचीं सर्व शेतें मी तुला देईन, आणि माझ्या मेजावर तूं नित्य भोजन करसील." १९:३२,३३. मात्थी २५:३४-३६.

---

# ख्यालीखुशाली व हास्य.

## २१२ माणसाचा ख्यालीखुशालीचा कल-त्याचें हासील.

उपदे. २:१. म्यां आपल्या मनांत ह्मटलें, ये हो मी तुला हर्षे करून

पारखितों, ह्मणून तूं सुख भोगीत जा; मग पाहा हेंहि व्यर्थता आहे. २,१०,११.७:२–४. ११:९,१०. २पेत्र. २:१३. त्यांस अन्यायाचें वेतन मिळेल; दिवसा चैनबाजी करणें हें सुख असें ते मोजितात, ठिपके व डाग असे ते आहेत, आपल्या भुलथापींनीं माजलेले तुमच्या संगतीं भोजन करितात. इयो. २१:११–१४. नीति १४:१३.२१:१७. लूक. ६:२५. १करिं. १०:७. (७२५,२७४.)

# ख्रिस्ती मंडळी.

## २१३ ख्रिस्ती मंडळी स्थापण्याचा हेतु.

मात्थी ५:१४. तुह्मी जगाचा उजेड आहां. डोंगरावर वसलेलें नगर लपत नाहीं. १३–१६. १तीम. ३:१५. यासाठीं कीं मला उशीर लागला, तरी देवाच्या घरांत तुला कसें वर्त्तलें पाहिजे, हें त्वां जाणावें तें जिवंत देवाची मंडळी; खरेपणाचा स्तंभ व आधार असें आहे. एफ. ३:१०,११.

## २१४ ख्रिस्ती मंडळीचा पाया.

एफ. २:२०,२१. प्रेषित व भविष्यवादी यांचा जो पाया त्यावर तुह्मी रचलेले आहां, येशू ख्रीस्त तोच कोपऱ्याचा मुख्य धोंडा आहे. त्यामध्यें अवघी रचना जुळून रचली असतां, प्रभूसाठीं पवित्र देऊळ असें वाढते. मात्थी १६:१६,१८;२१:४२. (गीत ११८:२२. यशा. २८:१६. १पेत्र. २:७.) १ करिं. ३:९,११.

## २१५ ख्रिस्ती मंडळी प्रीतिपात्र व प्रार्थनापात्र आहे.

गीत ५१:१८.८७:२. आपल्या प्रसन्नतेने जीयोनाचें बरें कर; यरूशालेमाचीं गांवकुसें बांध. याकोबाच्या सर्व वस्त्यांपेक्षां जीयोनाचे दरवाजे परमेश्वराला आवडतात. १२२:६–९.१३७:५,६. श. गीत ७:१०. यशा. ६२:६,७. एफ. ५:२५,२९. (२३२,४५७,१६२,३५७)

## २१६ ख्रिस्ती मंडळी निर्भय आहे.

गीत ४६:१ १२५:२. देव आमचा आश्रय व सामर्थ्य, संकटांमध्यें फार सुलभ सहाय आहे. यरूशालेम, याच्या चहुंकडे डोंगर आहेत. आणि परमेश्वर आतांपासुन सर्वकाळपर्यंतहि आपल्या लोकांच्या चहुंकडे

आहे. ४६:२-७. नीति १८:१०. यशा. ४३:२-६. ५४:१४,१७. (३१०-१२,१६९.)

२१७ ख्रिस्ती मंडळीचा मस्तक ख्रीस्त आहे.

एफ. १:२२,२३ सर्व सत्ता, व अधिकार, व पराक्रम, व धनीपण, व प्रत्येक नाव जें या काळीं केवळ नव्हे, तर येणाऱ्या काळींहि ह्मटलें, त्यापेक्षां फार उंच केलें आहे. आणि अवघीं वश करून त्याच्या पायांखालीं ठेविलीं, आणि त्याला अवघ्यावर मंडळीचा मस्तक असें करून ठेविलें आहे. मात्थी २३:८-१०. (२५८.)

## ख्रिस्ती मंडळीचे कामदार.

२१८ विशेष कामदार, ह्मणजे प्रेषित यांस ख्रीस्ताने स्वतः बोलाविलें.

मात्थी ४:१८,१९. नंतर येशू गालीलाच्या समुद्राजवळ चालत असतां त्याने दोघे भाऊ, पेत्रस ह्मटलेला शीमोन आणि त्याचा भाऊ आंद्रयास यांस समुद्रांत जाळें टाकितां पाहिलें, कारण कीं ते मासे धरणारे होते. तेव्हां तो त्यांस ह्मणाला, "माझ्या मागें या, ह्मणजे मी तुह्मांस माणसें धरणारे करीन." १०:५. गल. १:१.

२१९ प्रेषित ईश्वरी प्रेरणेने शिकविले होते.

मात्थी १०:१९,२०. परंतु तुह्मास पराधान करितील, तेव्हां कसें काय बोलावें, याविषयीं काळजी करूं नका, कारण कीं तुह्मी काय बोलावें याची त्याच घटकेस तुह्मास सूचना होईल. कां कीं बोलणारे तुह्मी नव्हां, तर तुमच्या बापाचा आत्मा तोच तुह्मामध्यें बोलणारा आहे. गल. १:११,१२. २:८.

२२० प्रेषित ख्रीस्त मेलेल्यांमधून उठल्याचे साक्षी.

प्रेषि. १३:३०,३१. परंतु देवाने त्याला मेलेल्यांमधून उठविलें. त्याच्या संगतीं जे गालीलापासून यरूशलेमांत आले त्यांच्या दृष्टीस तो अनेक दिवस पडला, त्याचे ते लोकांस साक्षी आहेत. १:२१,२२. १ करिं. १५:८.

## २२१ प्रेषितांस चमत्कार करण्याचा अधिकार व शक्ति दिल्ही आहे.

मात्थी १०:१. तेव्हां त्याने आपल्या बारा शिष्यांस जवळ बोलावून त्यांस असा अधिकार दिल्हा कीं, त्यानी अशुद्ध आत्म्यांस काढावें, आणि सर्व रोग व सर्व दुखणीं बरीं करावीं. १६:१९.१८:१८,१९. योह. २०: २३. ज्या कोणांचीं पापें तुह्मी सोडाल तीं त्यांस सुटतील, आणि ज्या कोणांचीं तुह्मी राहवाल तीं राहतील. प्रेषि. ८:१७–१९.१५:२८,२९. २करिं. १२:१२. (६१३)

## २२२ वडील, पाळक, सेवक, अध्यक्ष, उपदेशक, शिक्षक, सुवार्तिक या सर्वांचें काम शिकविणें, बोध व उपदेश करणें, आणि सुमार्गास लावणें असें होतें.

एफ. ४:११,१२. आणि त्याने कोणी प्रेषित, व कोणी भविष्यवादी, व कोणी सुवार्तिक, व कोणी पाळक व उपदेशक, असे नेमून दिल्हे आहेत. पवित्रांची पूर्णता करण्यासाठीं, सेवेच्या कामासाठीं, ख्रीस्ताच्या शरीराच्या रचनेसाठीं. इब्री. ३:१५. लूक. १:२. प्रेषि. १५:६,२३.२०: २८. फिलि. १:१. १तीम. २:७.३:१. २तीम १:११. १पेत्र.५:१–३. (१७३.)

## २२३ कारभाऱ्यांचें काम धर्म व पंक्तिसेवा इत्यादि करणें.

प्रेषि. ६:२,३. तेव्हां बारा जण शिष्यांचा समुदाय एकत्र बोलावून ह्मणाले कीं, देवाचें वचन सोडून आह्मी पंक्तिसेवा करावी, हें योग्य नाहीं. तर अहो भावांनो, तुह्मी आपल्यांमधून पवित्र आत्म्याने व ज्ञानाने पूर्ण असीं सात चांगल्या अब्रूचीं माणसें शोधून काढा, ह्मणजे आह्मी त्यांस या कामावर नेमूं. १–६. १तीम. ३:८–१३.

## २२४ प्रेषितांच्या वेळीं एका मंडळींत अनेक वडील होत असत कीं काय?

प्रेषि. १४:२३. २०:१७. तेव्हां त्यानी त्यांच्या साठीं प्रत्येक मंड-

ळींत वडील नेमून उपास व प्रार्थना करून, ज्या प्रभूवर त्यांनीं विश्वास ठेविला होता त्याकडे त्यांस निरविलें. मग त्यानें मिलेतसांतून एफस-साला निरोप पाठवून मंडळीचे वडील बोलावून घेतले. तिन. १:५. याक. ५:१४.

# ख्रिस्ती मंडळींतले संस्कार.

## २२५ बाप्तिस्मा व प्रभुभोजन यांची स्थापना.

माथ्थी २६:२६, २७, २८. आणि ते जेवीत असतां येशूनें भाकर घेतली, आणि आशीर्वाद मागून ती मोडिली, आणि शिष्यांस दिल्ही व ह्मटलें, घ्या, खा, हें माझें शरीर आहे. नंतर त्यानें प्याला घेतला आणि आशीर्वाद मागून तो त्यांस दिल्हा, आणि ह्मटलें, यांतून सर्व प्या. कारण कीं हें माझें रक्त आहे, हें नव्या कराराचें, हें पापांची क्षमा होण्यासाठीं बहुतांकरितां ओतिलें असें आहे. ३०. (मार्क. १४:२२–२५. लूक. २२:१४–२०.) माथ्थी २८:१९, १करिं. ११:२३–२६.

## २२६ प्रभुभोजन घेणाऱ्यांनीं तयारी केली पाहिजे.

१करिं. ११:२७, ३०. यास्तव जो कोणी अयोग्य प्रकारें ती भाकर खाईल अथवा प्रभूचा प्याला पिईल, तो प्रभूचें शरीर व रक्त यांविषयीं दोषी होईल. यामुळें तुह्मामध्यें बहुत अशक्त व रोगी, व पुष्कळ निजत आहेत. ५:७, ८. (७४२.)

## २२७ मंडळींतले संस्कार पाळणें हें कृपादान आहे.

गीत २७:४. म्या परमेश्वराजवळ एक गोष्ट मागितली आहे; मी हें शोधितों कीं परमेश्वराचें आवडतें पाहायास आणि त्याच्या देवळांत शोध करायास माझ्या आयुष्याच्या सर्व दिवसांत परमेश्वराच्या मंदिरांत माझें राहणें व्हावें. ३६:८. ६३:१, २. ६५:४. ८४:१–४, १०. ८७:५, ६. ९२:१३, १४. (३४३.)

## २२८ ख्रीस्ताला अंगीकारणें व मंडळींतले संस्कार पाळणें यांविषयीं उदाहरणें व आज्ञा.

रोम. १०:९, १०. ती असी कीं, जर तूं आपल्या तोंडानें प्रभु येशूला

पत्करसील, आणि देवानें त्याला मेलेल्यांमधून उठविलें असा तूं आपल्या अंतःकरणांत विश्वास धरसील, तर तारण पावसील. कां कीं न्यायीपणासाठीं अंतःकरणांत विश्वास होतो व तारणासाठीं तोंडानें पत्कर होतो. अनु. २६:१७, १८. यशा. ४४:५. मात्थी ५:१५, १६. १०:३२,३३. २६:२७. लूक १२:८, ९. मार्क. ८:३८. १६:१६. लूक २२:१९. १ करिं. ११:२६. २ तीम. २:१२. १ योह. ४:१५.

# ख्रिस्ती मंडळींतले नेम, शिक्षा, साहित्य इत्यादि.

## २२९ ख्रिस्ती मंडळीची प्रेषितांच्या वेळची सभा.

प्रेषि. १५:५, ६. परंतु परोशी यांच्या पंथांतील कित्येक विश्वास धरणारे उभे राहून ह्मणाले, त्यांची सुंता झाली पाहिजे, आणि मोशेयाचें नेमशास्त्र पाळायास आज्ञा दिल्ही पाहिजे. मग प्रेषित व वडील या गोष्टिविषयीं विचार करायाला जमले. २२–२९.

## २३० ख्रिस्ती मंडळींतली शिक्षा.

मात्थी १८:१५–१७. आणि तुझ्या भावानें तुझा अन्याय केला तर जा, आणि तूं व तो एकांतीं असतां त्याचा दोष त्याला सांग; त्यानें तुझें ऐकिलें तर त्वां आपल्या भावाला आपलेंसें केलें. परंतु त्यानें न ऐकिलें, तर तूं अणखी एका दोघांस आपल्याबरोबर घे; दोन किंवा तीन साक्ष्यांच्या तोंडानें प्रत्येक गोष्ट ठरावी ह्मणून. आणि त्यानें त्यांचें न ऐकिलें तर मंडळीला कळीव, आणि त्यानें मंडळीचेंहि न ऐकिलें तर मूर्तिपूजक किंवा जकातदार यांसारिखें त्याला मान. गीत १४१:५. १ करिं. ५:४,५,९–१३. गल. ६:१. २ थेस्स. ३:६,१४, १५. तित. ३:१०, ११. प्रग. २:२,३. (३७४.)

## २३१ ख्रिस्ती मंडळ्या सद्गुणी होण्याविषयीं बोध.

इब्री. १०:२४, २५. आणि एकमेकांकडे प्रीति व सत्कर्में करायास चेतविण्यासाठीं आह्मी लक्ष द्यावें. आपलें एकत्र मिळणें हें आह्मी कित्येकांच्या चालीप्रमाणें सोडूं नये, तर बोध करावा; आणि दिवस जसजसा जवळ येतो ह्मणून तुह्मी पाहतां, तसतसा तो अधिक करावा. ३:१३. रोम. १२:४–१०. १४:१९. १५:१–३. एफ. ४:१५, १६, २९. कल. ३:१६. (इब्री. १०:२४,२५.) १ थेस्स. ५:११.

### २३२ ख्रिस्ती मंडळींतली बंधु प्रीति, साहित्य व ऐक्य यांविषयीं उदाहरणें व आज्ञा.

योह. १३:३४, ३५. मी तुह्मास नवी आज्ञा देतों कीं, एकमेकांवर प्रीति करा, जसी म्या तुह्मावर प्रीति केली तसी तुह्मीहि एकमेकांवर प्रीति करा. तुमची एकमेकांवर प्रीति असली, तर यावरून सर्व जाणतील कीं, तुह्मी माझे शिष्य आहां. १५:१२. १७:२०–२२. प्रेषि. ४:३२. तेव्हां विश्वासणाऱ्यांचा समुदाय एका अंतःकरणाचा व एका जीवाचा होता, आणि कोणीहि आपल्या मालमत्तेंतील कांहीं आपलें असें ह्मणत नव्हता, तर त्यांस सर्व पदार्थ समाईक होते. २०:३७, ३८. १ शमु. १८:३. २ शमु. १:२६. गीत. १३३:१, २. यशा. ५२:८. रोम. १२:१०. १५:५, ६. १ करिं. १:१०. २ करिं. १३:११. गल. ६:१०. एफ. ४:१–३. ५:२. फिलि. १:४, ५, २७. २:१, २. ३:१६. १ थेस्स. ४:९, १०. इब्री. १३:१. १ पेत्र. १:२२. २:१७. २ पेत्र. १:५–७. १ योह. ३:११–१४, १६–१९, २३. ४:७, ८, १०, ११, २१. २ योह. ५. (२१५, २३५, ५२५.)

### २३३ ख्रिस्ती मंडळींतल्या साहित्याची मर्यादा.

एफ. ५:११. आणि अंधारांतील निरर्थ कामांमध्यें भागीदार होऊं नका, तर त्यापेक्षां निषेधच करा. २ थेस्स. ३:६, आणि भावानो, आह्मी आपल्या प्रभु येशू ख्रीस्ताच्या नावानें तुह्मास आग्रहानें सांगतों कीं, प्रत्येक बावगा चालणारा भाऊ, व आह्माजवळून घेतलेल्या सांप्रदायाप्रमाणें नाहीं, त्यापासून तुह्मी दूर व्हावें. १४, १५. २ काल. १९:२. मात्थी १०:११–१४. १ करिं. ५:९–११. १०:२०. २ तीम. ३:५. २ योह. १०, ११. (२३६, ७०७, ५१९, ७०५.)

## ख्रिस्ती मंडळींतली ऐक्यता.

### २३४ ख्रिस्ती मंडळी हें एक शरीर आहे.

१ करिं. १२:१३. कां कीं आह्मी जरी यहूदी किंवा हेल्लेणी, किंवा दास किंवा मोकळे आहों, तरी सर्व एका आत्म्याकडून एक शरीर होण्यासाठीं बाप्तिस्मा पावलों आहों आणि एक आत्मा होण्यासाठीं आह्मा सर्वांस पाजलें आहे. एफ. ४:४–६.

## २३५. ख्रिस्ती मंडळींतली ऐक्यता हीं द्वेष व फुट यांकडून मोडूं नये.

रोम. १६:१७, १८. अणखीं अहो भावानो, मी तुह्मास विनंती करितों कीं, जो उपदेश तुह्मी शिकून घेतला त्याविरूद्ध फुटी व अडखळे करणारे, यांविषयीं संभाळून त्यांपासून दूर असा. का कीं तसे आमच्या प्रभु येशू ख्रिस्ताची सेवा करीत नाहींत, तर आपल्या पोटाची: आणि भुलथापिने व दंभाने भोळ्याच्या अंतःकरणास भुलवितात. मात्थी १२:२५, २६. १करिं. १:११–१३. ३:३, ४. १२:२४–२७. गल. ५:१५. १योह. ३:१४, १५. ४:२०. यहू. १८, १९. (२३२.)

## २३६ ख्रिस्ती मंडळींतली ऐक्यता व साहित्य संबंध अविश्वासणाऱ्यासीं ठेवूं नये.

२करिं. ६:१४–१८. तुह्मी अविश्वास्यांच्या जोडीचे होऊं नका; का कीं न्यायीपण व अधर्म यांचा काय संबंध? आणि उजेड व अंधार यांचा काय भागीपणा? ख्रिस्ताचा बलियालासीं काय मेळ? विश्वासणाऱ्याचा अविश्वास्यासीं काय विभाग? आणि देवाच्या देवळाचा मूर्त्तींसीं काय संबंध? तुह्मी तर जिवंत देवाचें देऊळ आहा. देवाने तसें ह्मटलें आहे कीं मी त्यांच्या मध्यें वस्ती करीन व चालेन; आणि मी त्यांचा देव होईन व ते माझे लोक होतील. यास्तव त्यांमधून निघून वेगळे व्हा, असें प्रभु सांगतो, आणि अपवित्राला शिवूं नका, ह्मणजे मी तुह्मास अंगीकारीन; आणि मी तुमचा बाप असा होईन, आणि तुह्मी माझे पुत्र व कन्या असीं व्हाल; असें सर्वसत्ताधारी प्रभु ह्मणतो. लूक १२:५१. प्रग. १८:४. (२३३, ७०७, ५१९.)

## २३७ ख्रिस्ती मंडळ्या ह्या आब्राहामीक मंडळीच्या फांद्या आहेत.

गल. ३:७–९. यास्तव जाणा कीं, विश्वासाचे जे तेच आब्राहामाचे पुत्र आहेत. आणि देव विदेश्यांस विश्वासाकडून न्यायी ठरवील, हें अगोदर पाहून शास्त्राने शुभवर्त्तमान आब्राहामाजवळ पूर्वीं सांगितलें कीं, तुजकडून सर्व राष्ट्रें आशीर्वाद पावतील. यास्तव जे विश्वासाचे ते विश्वासी आब्राहामासहित आशीर्वाद पावतात. रोम. ११:१६–२४. (रोम. ४:११. २५. प्रेषि. ७:३८. एफ. २:१२.)

# ख्रीस्त.

## २३८ ख्रीस्ताची पवित्रता, नीतिमत्व, निष्कापट्य व अस्वार्थ बुद्धि.

१पेत्र. २:२१–२३. कारण कीं याकरितां तुह्मी बोलाविलेले आहां; कां तर ख्रीस्तानेंहि आह्मासाठीं सोसून आह्माकरितां कित्ता घालून ठेविला आहे, तुह्मी त्याच्या पावलांस अनुसरावें ह्मणून. त्याने पाप केलें नाहीं, आणि त्याच्या मुखांत कपट सांपडलें नाहीं. गांजलेला असतां त्याने उलटून गांजिलें नाहीं, सोसीत असतां त्याने धमकाविलें नाहीं; तर यथार्थ न्याय ठरविणाऱ्याजवळ आपणाला सोंपून दिल्हें. यशा. ११:५. नीति ८:५०. योह. १८:१९–२१. प्रेषि. ३:१४. २करिं. ५:२१. इब्री ४:१५. ७:२६, २७. (७४, ३८१.)

## २३९ ख्रीस्ताने ईश्वरास मानिलें व संतोषविलें.

गीत ४०:७, ८. तेव्हां म्या ह्मटलें, "पाहा, मी आहे; पुस्तकाच्या भेंडोळ्यांत मजविषयीं लिहिलेलें आहे. हे माझ्या देवा, तुझें आवडतें करायास मी संतुष्ट आहें; तुझें शास्त्र माझ्या मनांत आहे. मात्थी ३:१७. योह. ४:३४. ५:३०. ६:३८. ८:२९, ४९. १७:४.

## २४० ख्रीस्ताचें दरिद्र व स्वहितत्याग.

मात्थी ८:२०. तेव्हां येशूने त्याला ह्मटलें, "कोकडांस बिळें व आकाशांतील पांखरांस कोटीं आहेत, परंतु मनुष्याच्या पुत्राला डोकें टेंकावयास ठिकाण नाहीं." २करिं. ८:९. कां तर आमच्या प्रभु येशू ख्रीस्ताची कृपा तुह्मी जाणतां कीं, तो धनवान असतां तुह्माकरितां दरिद्री झाला, यासाठीं कीं तुह्मी त्याच्या दरिद्राने धनवान व्हावें. रोम. १५:२, ३. इब्री १२:२.

## २४१ ख्रीस्ताने हें जग व त्याचा सन्मान कसा मोजला?

योह. ५:४१. १६:३३. मी माणसांपासून गौरव करून घेत नाहीं. मजकडून तुह्मी शांति पावावी ह्मणून म्या तुह्मांस या गोष्टी सांगितल्या आ-

हेत: जगामध्यें तुह्मास संकट होईल, परंतु धीर धरा, म्या जगाला जिं-
किलें आहे. १८:३६. (३६३, ३९९.)

## २४२ ख्रीस्ताची माणसांवरील प्रीति व करूणा.

मात्थी ९:३५, ३६. आणि येशूने सर्व नगरें व गांव यामध्यें फिरत असतां त्यांच्या सभास्थानांमध्यें उपदेश केला, आणि राज्याचें शुभवर्त्तमान गाजविलें, आणि लोकांचे सर्व रोग व दुखणीं बरीं केलीं. आणि समुदायांस पाहून त्यांचा त्याला कळवळा आला, कारण कीं ज्या मेंढरांस मेंढपाळ नाहीं त्यांसारिखें ते कासाविस व पांगलेले होते. १४:१४. १५:३२. २३:३७. योह. १३:३४. १५:९. प्रेषि. १०:३८. रोम. ५:६–८. ८:३७. एफ. ५:२. (६९, ७०, ७३ अमंत्रणें व खंडणी पाहा.)

## २४३ ख्रीस्त निरभिमानाचा कित्ता आहे.

फिलि. २:६–८. तो देवाच्या रूपांत असून देवासमान असणें, हें अपहार मोजीत नव्हता. तथापि त्याने आपणाला शून्य केलें, ह्मणजे दासाचें रूप धरून माणसांच्या प्रतिमेने झाला. आणि माणसासारिख्या आकाराने प्रगट होऊन, त्याने मरणापर्यंत, खांबांच्या देखील मरणापर्यंत मान्य होऊन आपणाला नीच केलें. मात्थी ९:११, १२. १९:१४, १५. २०:२७, २८. लूक. २२:२७. योह. १३:१३, १४. इब्री २:११, १२, १६. (७३.)

## २४४ ख्रीस्ताची लीनता, शांति, विनय, मर्यादशीलता व सहनता.

१पेत्र. २:२१, २३ कारण कीं याकरितां तुह्मी बोलाविलेले आहां: कां तर ख्रीस्तानेंहि आह्मासाठीं सोसून आह्माकरितां कित्ता घालून ठेविला आहे, तुह्मी त्याच्या पावलांस अनुसरावें ह्मणून. गांजलेला असतां त्याने उलटून गांजिलें नाहीं, सोसीत असतां त्याने धमकाविलें नाहीं; तर यथार्थ न्याय ठरविणाऱ्याजवळ आपणाला सोपून दिल्हें. यशा. ४२:२. (मात्थी १२:१७–२०.) यशा. ५०:६. ५३:७. मात्थी ११:२९. २१:५. मार्क. १५:४, ५ लूक. २३:३४. २करिं. १०:१. (५२६, ३६६, ३४५.)

## २४५ ख्रीस्त आपल्या कामांत तत्पर होता.

लूक. २:४९. त्याने त्यांस ह्मटलें, माझा शोध कां केला? जें माझ्या

बापाचें त्यांत प्या असावें हें तुह्मास ठाऊक नव्हतें काय? योह. ९:४. दिवस आहे तोंपर्यंत माझ्या पाठविणाऱ्याचीं कामें मला केलीं पाहिजेत; रात्र येते, तेव्हां कोणाच्यानें काम करवत नाहीं. ५:१७. (१५७.)

## २४६ ख्रीस्त प्रार्थना करीत असे.

लूक. ५:१६. ६:१२. तेव्हां तो रानांमध्यें एकीकडे जाऊन प्रार्थना करिता झाला. आणि असें झालें कीं, त्या दिवसांमध्यें तो प्रार्थना करायास डोंगरावर गेला, आणि देवाची प्रार्थना करीत रात्रभर राहिला. ९:१८, २८. ११:१. गीत २१:२. मात्थी १४:२३. २३:३६, ३९, ४२, ४४. मार्क. ६:४६. योह. ११:४१, ४२. १४:१५, १६. (३११.)

## २४७ ख्रीस्त उपदेशक होता.

मात्थी ४:२३. १३:५४. तेव्हां संपूर्ण गालीलांत त्यांच्या सभास्थानांमध्यें उपदेश करीत, आणि राज्याचें शुभवर्त्तमान गाजवीत, आणि लोकांतले सर्व रोग व सर्व दुखणीं बरीं करीत फिरला. आणि आपल्या देशांत जाऊन त्यानें त्यांच्या सभास्थानांमध्यें त्यांस असा उपदेश केला कीं ते थक्क होऊन बोलले, "हें ज्ञान व हे चमत्कार याला कोठून? ७:२८, २९. गीत ४०:९, १०. यशा. ६१:१, २. (लूक ४:१८.) योह. ७:१४, १५, ४६.

## २४८ ख्रीस्त निषेध करणारा होता.

लूक ११:५२. १२:४९. तुह्मा शास्त्र्यांस हाय हाय! का कीं तुह्मी ज्ञानाची किल्ली नेली आहे, तुह्मी स्वतां आंत गेला नाहीं व आंत जाणाऱ्यांस मना केलें. मी पृथ्वीवर आग लावायास आलों आहें, आणि ती लवकर पेटावी ह्मणून मी कितीं इच्छितों बरें? यशा. ११:३, ४. मल. ३:२, ३. योह. १८:३७. मात्थी ५:२३. (३७४, ३७५.)

## २४९ ख्रीस्त नावांजला होता.

लूक ४:१४, १५. नंतर येशू आत्म्याच्या सामर्थ्यानें गालीलांत माघारा आला, आणि त्याची कीर्त्ति चहुंकडल्या सर्व प्रांतांत पसरली. आणि तो त्यांच्या सभास्थानांमध्यें उपदेश करीत असतां सर्वांनी त्याला गौरविलें. ५:१५. तथापि त्याविषयींची गोष्ट अधिकच पसरली, मग बहुत समुदाय ऐकायास व त्याकडून आपले रोग बरे करून घ्यायास जमले. मात्थी २१:८:९. (मार्क. ११:८–१०.) मार्क. १२:१२. योह. ६:१५. ११:४७, ४८. १२:१९.

### २५० ख्रीस्ताची निंदा व मरणप्राय पाठलाग.

मात्थी २७:२९–३१, आणि कांट्यांचा मुगुट गुंफून त्याच्या मस्तकीं घातला, आणि त्याच्या उजव्या हातांत वेत दिल्हा, आणि त्याच्या पुढें गुडघे टेंकून ते असी त्याची थट्टा करूं लागले कीं, हे यहूद्यांच्या राजा, सलाम. आणि त्यांनी त्यावर थुंकून वेत घेतला, आणि त्याच्या मस्तकावर मारिला. मग त्याची थट्टा केल्यावर त्यांनी तो झगा त्याच्या अंगांतून काढिला, आणि त्याचीं वस्त्रें त्याच्या अंगांत घातलीं, नंतर त्याला खांबीं देण्याकरितां नेलें. ३४. १०:२४,२५. १३:५५–५७. २६:६३–६८. गीत २:१–३. यशा ५३:२–४. मार्क. १५:२७–३२. लूक ४:२,२९. १६:१४. योह. १०:२०,३१. १९:५,६. (१९३, ४३५,७१७.)

## ख्रीस्ताचा मनुष्यपणा.

### २५१ ख्रीस्ताचा मानवी आत्मा व शरीर.

इब्री २:१६,१७ कां तर तो दूतांची प्रकृति धरीतच नाहीं, तर आब्राहामाच्या संतानाची धरितो. यास्तव त्याला सर्व प्रकारें आपल्या भावांसारिखें होण्याचें अगत्य होतें, यासाठीं कीं लोकांच्या पापांचें प्रायश्चित्त घेण्याकरितां आपण देवाकडल्या गोष्टींविषयीं दयाळू व विश्वासू मुख्य याजक असा व्हावा. १४–१८. ४:१५. मात्थी १:१. ८:२०. लूक* २:५२. योह. १:१४. १तीम. २:५. १योह. ४:३.

### २५२ ख्रीस्ताची रक्षण, ज्ञान इत्यादिकांविषयींची आधीनता.

योह. ५:१९,३०. यावरून येशूनें त्यांस उत्तर दिल्हें कीं, मी तुह्मास खचीत खचीत सांगतों, बापाला जें कांहीं करितां पाहिलें त्यावांचून पुत्राच्यानें आपल्या आपण कांहीं करवत नाहीं, कारण कीं तो जें जें करितो तें त्याप्रमाणें पुत्रहि करितो. माझ्यानें स्वतां कांहीं करवत नाहीं: जसें ऐकतों तसा न्याय ठरवितों, आणि माझें ठरविणें यथान्याय आहे,

---

*ख्रीस्त आपणाला मनुष्याचा पुत्र असें शास्त्रांत साठ वेळांवर ह्मणवितो.

कारण कीं मी आपली इच्छा नाहीं तर ज्या बापानें मला पाठविलें त्याची इच्छा पूर्ण करायाला पाहतों. ६:५७.८:२८,२९.१४:१०.२०:१७. यशा. ४२:६. मार्क. १३:३२. (मात्थी २४:३६.) २ करिंथ. १३:४. (६४.)

## २५३ ख्रीस्त अवतार घेतल्यावरून देवाचा पुत्र असा ह्मटला आहे.

लूक. १:३५. मग दुतानें तिला उत्तर दिलें कीं, पवित्र आत्मा तुजवर येईल आणि परात्पराचीं शक्ति तुजवर सावली करील, याकरितां जें पवित्र लेंकरूं होईल त्याला देवाचा पुत्र ह्मणतील. गीत २:७. योह. १:१४,१८. रोम. १:३,४. गल. ४:४. इब्री. १:५,६.

## २५४ ख्रीस्त आपल्या कामाविषयीं देव जो बाप त्याच्या आधीन होता.

योह. ६:३८.१४:२८. कां तर मी आपल्या इच्छेप्रमाणें नाहीं, तर ज्यानें मला पाठविलें त्याच्या इच्छेप्रमाणें करावें ह्मणून आकाशांतून उतरलों. मी जातों मग तुह्माकडे येईन, असें म्या तुह्मास सांगितलें तें तुह्मी ऐकिलें; जर तुमची प्रीति मजवर असती तर मी बापाकडे जातों असें ह्मटल्यावरून तुह्मी आनंद पावलां असतां; कां कीं माझा बाप मजपेक्षां मोठा आहे. ७:१६.८:२९.१०:३६.१२:४९.१७:३,८. रोम. १:३,४. १ करिं. ३:२३.११:३.१५:२७,२८.

## २५५ ख्रीस्ताची मनुष्यपणाविषयीं श्रेष्ठता.

कल. १:१५,१८. तो अदृश्य देवाची प्रतिमा, सर्व उत्पत्तीचा पहिला आहे. आणि तो शरिराचा ह्मणजे मंडळीचा मस्तक आहे, तो प्रारंभ, मेलेल्यांमधून पहिला उठलेला आहे, असा कीं अवघ्यांविषयीं तो अग्रसर असावा. गीत ८९:२७. योह. १:१५.३:३१. इब्री. १:४–६. प्रग. १:५.३:१४.

# ख्रीस्ताचा देवपणा.

## २५६ ख्रीस्ताचीं ईश्वरी नामें व हुद्दे.

१ योह. २:१. अहो माझ्या लेंकरानो, तुह्मी पाप करूं नये ह्मणून मी

हें तुह्मास लिहितों; परंतु जर कोणी पाप करितो, तर येशू ख्रीस्त जो न्यायी तो बापाजवळ आमचा अनुवादक आहे. ५:२०. प्रग. १:१८. आणि जो जिवंत आहे व मेलाहि होता, तो मी आहे, आणि सदासर्वकाळ जिवंत आहें, आमेन; आणि मृतलोकाच्या व मरणाच्या किल्ल्या मजपासीं आहेत. ५. ५:५. १७:१४. १९:१३ ३:१४. २२:१३. १पेत्र. २:२५ इब्री. २:१०. १:२,८. ३:१. ७:२५. यशा. ९:६. ४४:६. ५९:१६. मात्थी १:२३. २:६. २१:५. गीत २४:७. ४५:३,६. रोम. ९:५. यहु. २५. कल. २:१०. एफ. १:२२. योह. १:१,२३,४९. १३:१४. १०:११. १करिं. २:८. ५:७. १०:४. प्रेषि. १०:३६. ३:१५,२२. ५:३१. १तीम. २:५. मल. ३:१. ४:२. अनु. १८:१५. मीख. ५:२. लूक. २:११.

## २५७ ख्रीस्ताचें देवासमान असणें.

योह. ५:१७,१८. परंतु येशूनें त्यास उत्तर दिल्हें कीं, आजपावेतों माझा बाप काम करीत आला आहे, आणि मीहि काम करीत आलों. यावरून तर यहूदी त्याला जिवें मारायास अधिक झटले, कां कीं त्यानें शाब्बाथ मोडिला असें केवळ नाहीं, तर देव माझा बाप असें ह्मणून त्यानें आपणाला देवासमान केलें.* १०:३०,३३,३६–३८. १४:९. १७:५, १०. फिलि. २:५,६.

## २५८ ख्रीस्ताचे ईश्वरी गुण व हक.

### १ सर्वांवरचा अधिकार.

मात्थी १०:१. तेव्हां त्यानें आपल्या बारा शिष्यांस जवळ बोलावून त्यांस असा अधिकार दिल्हा कीं, त्यांनी अशुद्ध आत्म्यांस काढावें, आणि सर्व रोग व सर्व दुखणीं बरीं करावीं. प्रग. १:१८. आणि जो जिवंत आहे व मेलाहि होता, तो मी आहें, आणि पाहा सदासर्वकाळ जिवंत आहें आमेन. आणि मृतलोकाच्या व मरणाच्या किल्ल्या मजपासीं आहेत. मार्क २:५–११. कल. १:१८,१९. २:१०.

### २ स्वगौरव पाहण्याचा अधिकार.

कल. १:१६. कारण कीं अवघीं त्याकडून उत्पन्न झालीं; जें आका-

---

* ख्रीस्त देवाला आपला बाप असें शास्त्रांत पन्नास वेळांवर ह्मणतो.

सामर्थ्ये व जें पृथ्वीवर, जें दृश्य व जें अदृश्य, सिंहासनें किंवा प्रभुत्वें, किंवा सत्ता, किंवा अधिकार, अवघीं त्याकडून व त्यासाठीं उत्पन्न झालीं. (५२, ४११.)

## ३ सनातनता.

योह. १:१,२. प्रारंभीं शब्द होता, आणि शब्द देवाजवळ होता, आणि शब्द देव होता. तोच प्रारंभीं देवाजवळ होता. ८:५८.

## ४ अविकार.

इब्री. १३:८. येशू ख्रीस्त, काल व आज व सर्वकालपर्यंत, तसाच आहे.

## ५ सर्व सामर्थ्य.

योह. १:३. त्याकडून अवघें झालें, आणि जें झालें असें काहींच त्याने केल्यावांचून झालें नाहीं. १०. २:१९. ५:२१,२५. १०:१७,१८. ११: २५. १ करिं. १:२४. ८:६. फिलि. ३:२०,२१. कल. १:१६,१७. इब्री. १:३.(६३.)

## ६ सर्वव्यापिता.

मात्थी १८:२०. २८:२०. कारण कीं जेथें दोघे तिघे माझ्या नामाने जमले आहेत, तेथें त्यांच्या मध्यें मी आहें. ज्या ज्या आज्ञा तुह्मास दिल्या त्या सर्व पाळण्यास त्यांस शिकवा; आणि पाहा, काळाच्या समाप्तीपर्यंत मी तुह्माबरोबर सर्वकाळ आहें. योह. ३:१३.(६५.)

## ७ सर्वज्ञान.

मात्थी ९:४. ११:२७. तेव्हां येशू त्यांच्या कल्पना जाणून ह्मणाला, "तुह्मी आपल्या अंतःकरणांत वाईट कल्पना कां आणितां. माझ्या बापाने माझ्या हातीं सर्व दिल्हें आहे, आणि बापावांचून पुत्राला कोणी ओळखत नाहीं. आणि पुत्रावांचून व ज्याला प्रगट करायास पुत्राची इच्छा असेल, त्यावांचून बापाला कोणी ओळखत नाहीं. लूक १०: २२. योह. २:२४,२५. १०:१५. २१:१७. गल. १:११,१२. कल. २:३,९. (६४.)

## २५९ ख्रीस्ताने आपलें देवपण व प्रेषितपण पटविण्यास आपल्या नावाने चमत्कार केले.

लूक ४:३५,३६. तेव्हां येशू त्याला धमकावून बोलला, उगाच राहा,

व यांतून नीघ. मग भूत त्याला मध्यें पाडून त्याला कांहीं उपद्रव दिल्या-वांचून त्यांतून निघालें. तेव्हां सर्व थक्क होऊन आपापल्यांमध्यें ह्मणाले, ही गोष्ट कसी? कारण कीं तो अधिकाराने व सामर्थ्यानें अशुद्ध आत्म्यांस आज्ञा करितो ह्मणजे ते निघतात. मात्थी ८:३. मार्क. ४:३९, ४१. योह. २:२३. ५:३६. ७:३१. १०:३७,३८. ११:४२–४५,४७,४८. २०:३०,३१. (४१९.)

## २६० भविष्यवादी व प्रेषित चमत्कार करीत असत पण आपल्या नावानीं नव्हे.

प्रेषि. ९:३४. १६:१८. आणि त्याला पेत्रसानें ह्मटलें, ऐन्यासा, येशू ख्रीस्त तुला बरें करितो, ऊठ व आपलें अंथरूण नीट कर; तो लागलाच उठला. असें तिनें बहुत दिवस केलें, मग पौलस कष्टी होऊन मागें फिरून आत्म्याला बोलला, येशू ख्रीस्ताच्या नावानें मी तुला आज्ञा करितों कीं, तूं इजमधून निघून जा; तेव्हां तो तत्काळ निघाला. ३:६, ११,१२. गण. २०:१०–१२.

## २६१ ख्रीस्ताला ईश्वरी मान दिल्हे होते व त्याने ग्रहण केले.

मात्थी १४:३२,३३. मग ते तारवांत बसल्यानंतर वारा राहिला, तेव्हां तारवांतलीं माणसें येऊन त्याच्या पायां पडून ह्मणालीं, तूं देवाचा पुत्र आहेस, खरा. २:१,२. ८:२. २८:९,१६,१७,१९. गीत २:१२. लूक २४:५१,५२. योह. ५:२२,२३. प्रेषि. ७:५९. २ करिं. १३:१४. फिलि. २:९–११. इब्री १:६. २ पेत्र. १:१७. ३:१८. प्रग. ५:११–१४.

## २६२ उत्पन्न झालेल्या प्राणिमात्रांस ईश्वरी भजन व मान देऊं नये.

मात्थी ४:१०. तेव्हां येशू त्याला ह्मणाला, "अरे सैताना, दूर हो, कां कीं प्रभू तुझा देव त्याचें भजन कर, आणि त्याचीच सेवा कर, असें लिहिलें आहे. प्रेषि. १४:१३–१५. कल. २:१८. प्रग. २२:८,९, १९:१०.

## २६३ ख्रीस्ताविषयींचें गुज.

एफ. ६:१९. व मजसाठींहि, कीं ज्या शुभवर्त्तमानासाठीं मी बंदांत

वकील आहे, त्याचें गुज कळविण्याकरितां प्रशस्तपणानें माझें तोंड उघडून, १तीम. ३:१६. आणि सुभक्तीचें गुज निस्संशय मोठें आहे, देव देहानें प्रगट झाला, आत्म्यानें न्यायी ठरला; दुतांच्या दृष्टीस पडला, राष्ट्रांमध्यें गाजविलेला. जगांत त्यावर विश्वास झाला, त्याला गौरवांत वर घेतलें. माथ्थी १:२३. २२:४१–४६. प्रग १९:१२. २२:१६.

## २६४ खीस्ताचा शेवटीं विजय व गौरव.

माथ्थी २५:३१,३२. अणखी मनुष्याचा पुत्र आपल्या गौरवानें येईल आणि त्या बरोबर सर्व पवित्र दूत येतील, तेव्हां तो आपल्या गौरवाच्या आसनावर बसेल. आणि त्यासमोर सर्व राष्ट्रें जमा होतील, आणि ज्या प्रकारें मेंढपाळ शेरडांतून मेंढरें वेगळीं करितो, त्या प्रकारें तो त्यास वेगळें वेगळें करील. २४:३०. गीत ७४:७. जख. ६:१३. एफ. १:१९–२१. फिलि. २:९–११. इब्री १:१–४. प्रग. १७:१४. (२१७.)

# खीस्ताचें राज्य.

## २६५ खीस्त राजा आहे.

गीत २:६. पण "म्या आपला पवित्र डोंगर जीयोन, यावर आपल्या राज्याला अभिषेक करून स्थापिलें आहे. ४५:६,७. प्रग. १:५. आणि येशू खीस्त, विश्वासू साक्षी, जो मेलेल्यांमधून प्रथम जन्मलेला, व पृथ्वींतील राजांचा अधिकारी, त्यापासून तुह्मावर कृपा व शांति असो; ज्यानें आह्मावर प्रीति केली, आणि आपल्या रक्तानें आमच्या पापांपासून आह्मास धुतलें. मीख. ५:२. जख. ९:९. माथ्थी २७:११. योह. १:४९. (यशा. ९:६: इर्म. २३:५:६. ३०:९. होशे. ३:५. लूक. १:३२.)

## २६६ खीस्ताचें राज्य कसें आहे.

योह. १८:३६. येशूनें उत्तर दिल्हें कीं, माझें राज्य या जगांतलें नव्हें; माझें राज्य या जगांतलें असतें तर म्या यहूद्यांच्या स्वाधीन होऊं नये ह्मणून माझ्या चाकरांनीं लढाई केली असती; परंतु आतां माझें राज्य एथलें नव्हे. रोम. १४:१७. कां कीं खाणें व पिणें यांत देवाचें राज्य नाहीं, तर न्यायीपण व शांति व पवित्र आत्म्याकडून आनंद, यांत आहे.

## २६७ ख्रीस्ताच्या राज्यासीं, जलप्रलयाच्यापूर्वीं, आणि ख्रीस्त आल्यापूर्वीं, सार्वत्रिक विरोध.

उत्प. ६:५. आणि परमेश्वरानें पाहिलें कीं माणसाचें पाप पृथ्वीमध्यें मोठें, आणि त्याच्या हृदयाच्या विचारांतील प्रत्येक भावना सर्व दिवसांमध्यें केवळ वाईट आहेत. यशा. ५३:३. तो धिक्कारलेला, व मनुष्यांनीं नाकारलेला, शोकाचा पुरुष व खेद अनुभवलेला होता, आणि त्याजपासून जसें मुखाच्छादन होत असे; तो धिक्कारलेला होता, आणि आह्मी त्याला मानिलें नाहीं.

## २६८ ख्रीस्ताच्या राज्यासीं वर्ष साहस्र येण्यापूर्वीं अणखी एक फितणें किंवा सार्वत्रिक विरोध होईल कीं काय?

२ पेत्रस. २:१,२. परंतु लोकांमध्यें खोटे भविष्यवादीहि होते, तसें तुह्मामध्यें खोटे उपदेशक होतील, असे कीं, नाशकारक पाखंड मतें चोरून चालू करितील, आणि ज्या प्रभूनें त्यांस विकत घेतलें, त्याला नाकारून आपणांवर त्वरित नाश आणितील. आणि त्यांच्या नाशाच्या मार्गास बहुत अनुसरतील, यांच्या योगें खरेपणाचा मार्ग निंदा पावेल. ३:३,४. यशा. २४:५. ५९:१३–१५. दान. १२:७. योएल ३:१३. आम. ८:११. मात्थी २४:२४. लूक १८:८. २ थेस्स. २:३,४,७. २ तीम. ३:१–५. यहू. १७:१९. प्रग. ३:१०. ११:३,७,१०. १२:१२. १३:३,४. १६:१३,१४.

## २६९ ख्रीस्ताच्या राज्याचे शत्रू, वर्षसाहस्र येण्यापूर्वीं, नाश पावतील कीं काय?

गीत २:८,९. माझ्याजवळ माग, ह्मणजे मी राष्ट्रें तुझें वतन आणि पृथ्वीच्या सीमा तुझें धन असें करून देईन. तूं लोखंडी काठीनें त्यांवर राज्य करसील, कुंभाराच्या मडक्यासारिखें त्यांस फोडसील. ३७:९. (१०:१३) ८२:८. यशा. १:२७,२८. २:१२, (१७–२०) १३:९. २४:१–६, १७–२०, २३. २६:२०, २१. २८:२१, २२. ३४:१–४, ८, (५–७, ९, १०. ३५.) ६३:१–४. ६६:१५, १६. इर्म. २५:३१–३३. यहेज्के. ३८:३९:१–१०, १२, १७. योएल. ३:९, १३–१७. जफ. १:२

३. (१७,१८.) ३:८,९,१२,१३. मल. ४:१—३. प्रग. १६:१७—२१. १९:१९,२१. २०:१,२. (१ शमु. २:१०. नीति २:२१. यशा. ११: १—६. २९:७,८.) दान. १२:१. (५६६,५७०,४३७,३९१,५८१,८.)

## २७० ख्रीस्ताच्या शत्रूंच्या पराभवावरून आनंद.

जफ. ३:१४,१५. अगे जीयोनेच्या कन्ये, तूं गायन कर; अहो इस्राएल, तुह्मी गजर करा; अगे यरूशालेमेच्या कन्ये, तूं अवघ्या हृदयाने हर्ष व उल्लास कर. परमेश्वराने तुझीं शासनें दूर केलीं आहेत त्याने तुझा वैरी घालवून दिल्हा आहे; इस्राएलाचा राजा परमेश्वर तुजमध्यें आहे; तूं पुन्हा संकट पाहणार नाहींस. यशा. २४:१३—१६. (८२,३९६.)

## २७१ ख्रीस्ताच्या शत्रूचा पराभव होण्यापूर्वीं बोध व सुचना होतात.

मात्थी २४:१४. आणि सर्व लोकांस साक्ष व्हावी ह्मणून राज्याचें हे शुभवर्तमान सर्व जगामध्यें गाजवितील, तेव्हां शेवट होईल. प्रग. ११:३. १४:६,७.

## २७२ ख्रीस्ताच्या राज्याची वृद्धि शेवटीं विजय.

यशा. ९:७. त्याच्या अधिकाऱ्याच्या वृद्धीचा व कल्याणाचा कांहीं अंत होणार नाहीं, तो दावीदाच्या सिंहासनावर, व त्याच्या राज्यावर तें नीतीने व न्यायाने आजपासून सर्वकाळपर्यंत स्तुतित, व दृढ करायाला राहिला; सैन्याच्या परमेश्वराचा आवेश हें साधील. प्रग. ११:१५. मग सातव्या दुताने वाजविला, तेव्हां आकाशांत मोठ्या वाण्या झाल्या. अशा कीं, जगांतील राज्यें आमच्या प्रभूचीं व त्याच्या ख्रीस्ताचीं झालीं आहेत, आणि तो सदासर्वकाळ राज्य करील. २०:४. गीत ७:८—३ ११. दान. २:३५,४४,४५. ७:१३,१४. जख. १४:९. मात्थी १३:२१—३३. (५९३.)

## २७३ ख्रीस्ताच्या राज्याचा टिकाव.

गीत ४५:६. हे देवा, तुझें सिंहासन सदासर्वकाळचें आहे; तुझ्या राज्याची काठी सरळपणाची काठी आहे. दान. ७:१४. आणि त्याला प्रभुत्व व राज्य व गौरव दिल्हें, आणि सर्व लोक, जाति, व भाषा हीं त्याची

सेवा करितीं झालीं; त्याचें प्रभुत्व सनातन प्रभुत्व आहे, तें ढळायाचें नाहीं, आणि जें क्षीण व्हायाचें नाहीं असें त्यांचें राज्य आहे. लूक १:३३.

# गंभीरपणा.

## २७४ गंभीरपण व सावधपण बाळगावें.

तित. २:११–१३. कां तर देवाची तारक कृपा सर्व माणसांस प्रसिद्ध झाली आहे. ती आम्हास असें शिकविती कीं, आम्ही अभक्तीला व जगांतल्या इच्छांस नाकारून, या सांप्रतकाळीं सुबुद्धीनें व न्यायानें व सुभक्तीनें वागावें; आणि धन्य अशा प्राप्तीची म्हणजे मोठा देव व आमचा तारणारा येशू ख्रीस्त याच्या गौरवाचें प्रगट होणें याची वाट पाहावी. १ पेत्र. १:१३–१५. ४:७. ५:८. (२१२.)

# गर्व व अहंपणा.

## २७५ गर्व व अहंपणा हीं पापें फार रूढांत आहेत.

गीत १०:२. ७३:६ दुष्टांच्या गर्वाकडून दिनांवर जळजळाट होतो; ज्यां कुयुक्ति त्यांनी योजिल्या, त्यांत हे गुंतले. यास्तव त्यांस अहंकार हाररूप होतो; त्यांस पोषाकरूपें बळात्काराचें आच्छादन आहे. ७–९ उत्प. ११:४. यहेज्के. १६:४९,५०. (७२३,७३०.)

## २७६ गर्व व अहंपणा हे ईश्वराला त्रासदायक आहेत—दंड सूचना.

नीति. ८:१३. परमेश्वराचें भय दुष्कर्मांचें द्वेषणें आहे, गर्व व अभिमान व कुमार्ग व कुटिलमुख यांला मी द्वेषितों. १५:२६. १६:५. मात्थी २६:१२. आणि जो कोणी आपणाला उंच करील, तो नीच होईल, आणि जो कोणी आपणाला नीच करील, तो उंच होईल. २९–३१. २ शमु. २३:२८. गीत १२:३,४. १८:२७. ११९:२१. १३८:६. यशा. २:१२. ३:१६–२३. १३:११. २६:५. ६५:५. दानी. ४:३०–३२. २ थेस्स. २:४,८. याक. ४:६; १६. (४३७.)

### २७७ गर्वाचा परिणाम नाश असा आहे.

नीति. १६:१८. १८:१२. भंगाचा पुढारी गर्व, आणि नाशाचा पुढारी अभिमानी आत्मा आहे. नाश होण्यापूर्वी मनुष्याचें मन गर्विष्ठ असतें, आणि गौरवापूर्वी नम्रता असती. २६:१२. २८:२६. २९:२३. एफ. ३:५, ६. ७:९. (८.)

## घर.

### २७८ घरीं राहणें–याला आश्वासन.

तित. २:४, ५. असें कीं त्यानीं तरणीं यांस असें शिकवावें कीं, त्या पतिप्रिय, अपत्यप्रिय, शाहाण्या, पतिव्रता, घर संभाळणाऱ्या, चांगल्या, आपल्या नवऱ्यांस मान्य अशा असाव्या, देवाच्या वचनाची निंदा होऊं नये ह्मणून. नीति २५:१७. २७:८.

## चंचळपणा.

### २७९ चंचळपणाचा निषेध–चंचळ माणसांस वर्जावें.

उत्प. ४९:४. तूं पाण्यासारिखा चंचल असून श्रेष्ठ होणार नाहींस, का कीं तूं आपल्या बापाच्या खाटेवर चढलास, तेव्हां त्वां ती विटाळिली; तो माझ्या अंथरूणावर चढला. इब्री १३:९. नाना प्रकारचे व अन्य उपदेश, यांकडून तुह्मी फिरविलेले होऊं नका; कां तर ज्याकडून आचरणाऱ्यांस लाभ नाहीं, अश्या खाण्याच्या पदार्थांनी नव्हे, तर कृपेनें अंतःकरण स्थिरावलेलें असावें, हें बरें आहे. नीति २४:२१. एफ. ४:१४. (७११.)

## चाकर आणि चाकरी.

### २८० चाकरांचे प्राचीन काळीं हक्क.

इयो. ३१:१३, १४. जेव्हां माझ्या दासानें अथवा दासीनें मजसीं वाद केला तेव्हां म्या जर त्यांचा न्याय तुच्छ मानिला, तर देव उठेल

तेव्हां मी काय करूं? आणि त्याने झडती केली ह्मणजे त्याला काय उत्तर देऊं? उत्प. १४:१४. १७:१२. २४:२–४, १०.

## २८१. यहूदी लोकांचें चाकर मिळवण्याचे ठेवण्याचे व सोडण्याचे नेम.

### १. खुशीचे चाकर, जन्म ठेपेचे व अमुक वर्षांचे चाकर–सोडण्याचे नेम.

निर्ग. २१:५, ६. परंतु जर तो चाकर निश्चयेंकरून ह्मणतो कीं, 'मी आपल्या मालकावर, आपल्या बायकोवर, आणि आपल्या लेंकरांवर प्रीति करितों, मी मोकळा होऊन जात नाहीं,' तर त्याच्या धन्याने त्याला न्यायाधीशांजवळ आणावें, आणि त्याने त्याला दाराजवळ अथवा चौकटीच्या बाहीजवळ आणावें, मग त्याच्या धन्याने आरी घेऊन त्याचा कान टोंचावा, नंतर त्याने त्याची चाकरी सर्वकाळ करावी. लेवी. २५:४७–५४. अनु. १५:१६, १७.

### २. यहूदी आपल्या लेंकरांसुद्धां कर्जाबद्दल कधीं विकले होते–त्यांस सोडण्याचे व इनाम देण्याचे नेम.

निर्ग. २१:२–४. जर तूं इब्री चाकर विकत घेतोस, तर त्याने साहा वर्षें चाकरी करावी, परंतु सातव्या वर्षी तो फुकट मोकळा व्हावा. जर तो सडाच आला, तर तो सडाच निघावा; जर तो बायको घेऊन आला, तर त्याच्या बायकोने त्याच्यासंगतीं निघावें. जर त्याच्या मालकाने त्याला बायको करून दिल्ही आणि त्या बायकोला त्यापासून पुत्र अथवा कन्या झाली, तर ती आणि तिचीं लेंकरें तिच्या मालकाचीं व्हावीं, आणि तो सडाच निघावा. लेवी. २५:३९–४३. अनु. १५:१२–१५, १८. २ राजे. ४:१. नहे. ५:२,५.

### ३. जन्म ठेपेचे चाकर यहूदी नसत तर परदेशी असत.

लेवी. २५:४४. आणि तुझा दास व तुझी दासी जीं तीं तुमच्या चहुंकडल्या राष्ट्रांतलीं असावीं; त्यांपासून तुह्मी चाकर किंवा चाकरीण विकत घ्यावी. ४५, ४६.

## २८२ चाकर मारण्याबद्दल मोश्याने नेमलेलें शासन.

निर्ग. २१:२०, आणि जर कोणी आपल्या चाकराला अथवा आपल्या चाकरणीला काठीने मारितो, आणि त्याच्या हाताखालीं तें माणूस मरतें, तर त्याला दंड व्हावाच व्हावा. २१, २६, २७.

## २८३ चाकरांसीं न्यायाने व कृपेने वर्त्तावें—जुलुमाची मनाई.

अनु. २३:१५, जो चाकर आपल्या धन्याजवळून निघून तुला शरण येतो, त्याला तूं त्याच्या धन्याच्या स्वाधीन करूं नको. १६. २४: १४, १५. इर्म. २२:१३. जो आपलें घर न्यायावांचून व आपल्या माड्या नीतिवांचून बांधितो, जो आपले शेजाऱ्याची सेवा फुकट घेतो, व त्याला त्याची मजूरी देत नाहीं, त्याला हाय हाय. कल. ४:१. १ तीम. ५:१८. (यहेज्के. १६:४९.) (३०७, ५८६, २९१.)

## २८४ धनी व चाकर यांच्या परस्पर कर्त्तव्यांविषयीं प्रेषितांचे बोध.

एफ. ६:५, ९. दासानो, तुह्मी आपल्या अंतःकरणाच्या साळसूदपणाने जसें ख्रीस्ताला, तसें आपल्या शरिरांच्या धन्यांस भयाने व कांपण्याने माना. आणि धन्यानो, त्याच प्रकारें त्यांपासीं करा, धमकावणें सोडा, कारण तुह्मी जाणतां कीं स्वतां तुमचाहि धनी आकाशामध्यें आहे, आणि त्यापासीं पक्षपात नाहीं. कल. ३:२२–२४. १ तीम. ६: १–४. तित. २:९, १०. १ पेत्र. २:१८–२०.

## २८५ दास व माणसांचे प्राण यांचा पुरातनचा व्यापार.

योएल ३:३, आणि त्यांनी माझ्या लोकांवर पण पाडिला आहे; आणि त्यांनी मुलगा देऊन कसबीण घेतली आहे, आणि त्याने मुलगी विकून प्यायासाठीं द्राक्षारस घेतला आहे. ६. यहेज्के. २७:१३. प्रग. १८: २, ११–१३. (३०५, ५८६.)

## २८६ माणसांस चोरून दासपणांत घातल्याबद्दल दंड.

निर्ग. २१:१६. आणि जो माणसाला चोरितो व त्याला विकितो अ-

थवा हा त्याच्या हातांत सांपडतो, तर तो मारिलाच जावा. अनु. २४: ७. इर्म. ५:२६. ३४:१७. १तीम. १;९, १०. (३०६–८, ५४१, ५८६.)

## २८७ महोत्साहाच्या वर्षी चाकर मोकळे होत असत.

लेवी. २५:१०. आणि पन्नासावें वर्ष पवित्र करा, आणि देशांतल्या सर्व राहणाऱ्यांस मोकळिक गाजवा; तें तुह्मास येबिल व्हावें, ह्मणजे तुह्मी सर्वांनी माघारें आपापल्या वतनावर परत जावें, आणि सर्वांनी आपापल्या कुळांत परत जावें.

## २८८ दासपणापेक्षां मोकळीक चांगली आहे.

१करिं. ७:२१–२३. तूं दास असतां तुला बोलाविलें काय? त्याची चिंता करूं नको, परंतु त्यापेक्षां जर तुला मोकळा होण्याचा उपाय आहे तर करून घे. कां कीं जो दास प्रभूकडून बोलाविला आहे, तो प्रभूचा मोकळा केलेला असा आहे; तसेंच जो मोकळा बोलाविला आहे, तो ख्रीस्ताचा दास आहे. तुह्मी मोलानें विकत घेतलेले आहां, माणसांचे दास होऊं नका. फिलेमो. १५, १६, २०, २१.

## २८९ माणसांस परस्परांच्या कर्त्तव्यांविषयीं बोध.

मला. २:१०. आह्मा सर्वांस एकच बाप नाहीं काय? एकच देवानें आह्माला उत्पन्न केलें नाहीं काय? आह्मी आपल्या पूर्वजांचा करार अप्रतिष्ठित करायाला एकमेकांसीं कां कपटानें वर्त्ततों? मात्थी ७:१२. याकरितां माणसांनीं ज्या ज्या रीतीनें तुह्मासीं वर्त्तावें ह्मणून तुमची इच्छा आहे त्याच रीतीनें तुह्मीहि त्यांसीं वर्त्ता; कां कीं नेमशास्त्र आणि भविष्यशास्त्र हेंच आहे. २२:३७–४०. गल. ५:१३–१५. (५२५, ९, १०, ५४१–५.)

## २९० दास, दरिद्री व पिडलेले यांजवर करुणा व औदार्य करावें.

यशा. ५८:६,७. जो उपास मी निवडितों, तो हाच नाहीं काय? ह्मणजे दुष्टतेच्या बेड्या तोडणें, जोखडाचे बंद सोडणें, व पिडलेल्यांस मोकळें करणें, व तुह्मी प्रत्येक जोखड मोडावें? हाच आहे कीं नाहीं, ह्मणजे त्वां आपलें अन्न भुकेल्यास वाढावें, आणि घालविलेल्या दरिद्र्यांस घरीं आणावें? जेव्हां तूं कोणाला उघडें पाहतोस, तेव्हां त्याला वस्त्र द्यावें आणि

तूं आपल्या सारिख्या माणसापासून न लपावें, असें करिसील? ८-११. इब्री १३:३ (३२१.)

### २९१ दुःखितांचा व पिडलेल्यांचा पक्ष स्वीकारण्याचा धर्म.

गीत ८२:३,४. दरिद्री व पोरका यांचा न्याय ठरवा, दीन व दुबळा यांचा निवाडा नीतीने करा. दरिद्री व दुबळे यांस मुक्त करा, दुष्टाच्या हातून त्यांस सोडवा. ते समजत नाहींत, आणि विचार करीत नाहींत; काळोखांत चालतात; पृथ्वीचे सर्व पाये हालतात. नीति २१:१३. २४:११, १२. ३१:८, ९. यशा. १:१७. १६:३,४. इर्म २१:१२. (३०७, ३२०, ३२१.)

## चाल.

### २९२ वाईट चालीचें प्राबल्य.

इर्म १३:२३. खुशी आपलें कातडें, अथवा चित्ता आपले ठिपके पालटायास समर्थ होईल काय? मग ज्या तुह्मास वाईट करण्याची सवई आहे ते उत्तम करायास समर्थ व्हाल. १०:२, ३. रोम. ७:१९, २०, २३, २४. (५१२, ४६०.)

## चोरी.

### २९३ चोरी मना केली आहे.

निर्ग. २०:१५. तूं चोरी करूं नको. एफ. ४:२८. ज्याने चोरी केली तो यापुढें चोरी न करो, तर त्यापेक्षां हातानी चांगलें करीत असतां उद्योग करो, यासाठीं कीं ज्याला गरज आहे त्याला वांटून देण्याकरितां आपल्याजवळ असावें. लेवी. १९:११. १ पेत्र. ४:१५.

### २९४ चोरीबद्दल दंड.

निर्ग. २१:१६. आणि जो आपल्या बापाला अथवा आपल्या आईला शाप देतो, तो मारिलाच जावा. १ करिं. ६:१०. व चोर व लोभी व मद्यपी व निंदक व हरण करणारे, यांस देवाच्या राज्यांत वतन मिळणार नाहीं. यहोशा ७:११, १२, १५. होशा. ४:२, ३.

# जग.

## २९५ जग ईश्वराला जाणत नाहीं.

योह. १७:२५. हे न्यायी बापा, जगानें तुला जाणिलें नाहीं, म्या तर तुला जाणिलें आहे, आणि त्वां मला पाठविलें असें त्यांनीं जाणिलें. १करिं. १:२०, २१. (७२०.)

## २९६ जग ईश्वराला व त्याच्या भक्तांला प्रतिकूल आहे.

योह. १७:१४. १८:३६. म्या तुझें वचन त्यांस सोपून दिल्हें आहे, आणि जगानें त्यांचा द्वेष केला आहे, कारण कीं जसा मी जगाचा नाहीं तसे तेहि जगाचे नाहींत. येशूनें उत्तर दिल्हें कीं, माझें राज्य या जगांतलें नव्हे; माझें राज्य या जगांतलें असतें तर म्या यहूद्यांच्या स्वाधीन होऊं नये ह्मणून माझ्या चाकरांनीं लढाई केली असती; परंतु आतां माझें राज्य एथलें नव्हे. गीत ८२:२–५. मात्थी १०:२२. एफ. २: १, २. याक. ४:४. १योह. २:१६. (२५०, २६८, १९३, ४३५, ७१७.)

## २९७ जग भ्रष्ट व नाशकारक आहे–सुचना.

मात्थी १३:२२. आणि कांट्यांच्या झाडामध्यें जो पेरलेला, तो हाच आहे कीं, वचन ऐकतो, परंतु या जगाची चिंता व द्रव्याची भूल, हीं वचनाला गुदमारितात, ह्मणून त्याला फळ येत नाहीं. २तीम. ४:१०. कां तर देमास या जगावर प्रीति करीत असतां मला सोडून थेस्सलनीकेस गेला आहे. लूक २१:३४. गल. १:४. फिलि. ३:१९. (७०७, ३६२.)

## २९८ जगावरील प्रीति मना केली आहे.

१योह. २:१५, १६. जगावर व जगांतल्या गोष्टींवर प्रीति करूं नका; जर कोणी जगावर प्रीति करितो तर बापाची प्रीति त्याला नाहीं. कारण कीं अवघें जें जगांत आहे तें देहाची इच्छा व डोळ्यांची इच्छा व संसाराचें डंभ; हीं बापापासून नाहींत, तर जगापासून आहेत. ईस. ४५:५. मात्थी ६:१९–२१, २४, २५, ३२, ३३. मार्क. ८:३६, ३७. लूक ६:४, २५. १२:१९–२१, ३३, ३४. याहे. ६:२७. रोम. २१: २. कल. ३:२. याक. १:२७. (३६३.)

### २९९ जग अनुग्रहाने व विश्वासाने पराजित होतें.

गल. ६: ४. परंतु आमचा प्रभु येशू ख्रीस्त याच्या खांबाच्या निमित्ताखेरीज मला नावाजून घेणें नसावें, त्याकडून मजविषयीं जग व जगाविषयीं मी खांबीं दिल्हेला आहें. १योह. ५:४. कारण कीं जें कांहीं देवापासून जन्मलेलें तें जगाला जिंकितें, आणि जगाला जिंकणारा जय तो हाच, ह्मणजे आमचा विश्वास आहे. (२४१.)

## जामिनकी.

### २०० जामिनकीविषयीं मोडती.

नीति ११:१५. २२:२६, २७. कोणी परक्याचा जामीन झाला तर हानि पावेल, परंतु जो टाळी देणाऱ्यांस अनुकूल होत नाहीं तो निर्भय राहतो. टाळी देणाऱ्यांतला अथवा ऋणासाठीं जे जामीन यांतला एक तूं होऊं नको. फेडायाला जर तुझ्याजवळ कांहीं नाहीं, तर त्याने तुजखालून तुझें अंथरूण का काढून घ्यावें? ६:१–५. (नीति १७:१८. २६:१६.)

## जीभ.

### २०१ जीभ बहुधा फार दुःखदायक व उपद्रवकारक आहे.

याक. ३:५–८. तसीच जीभ लहान अंग आहे, परंतु मोठ्या गोष्टींची फुशारकी सांगती; पाहा, थोडकी आग केवढ्या गंजीला पेटविती. आणि जीभ ही आग, व अन्यायाचें भुवन आहे; जीभ आमच्या अंगांमध्यें असी ठेविली आहे कीं, ती सगळ्या शरिराला मळविती, आणि जन्माच्या फेऱ्याला चेतविती, आणि ती नरकाकडून चेतलेली आहे. कां तर श्वापदांची व पांखरांची व वळवळणाऱ्यांची व जलचरांची प्रत्येक जात वश होत असती, आणि मनुष्यजातीने वश केलेली आहे; परंतु जिभेला वश करायास कोणी माणूस शक्तिमान नाहीं, ती अनिवार दुष्ट, मरणकारक विषाने भरलेली आहे. गीत ५२:२, ४. ५५:२१. ५७:४. नीति ११:९. १२:१८. १५:४. १६:२७, २८. १७:९. १८:७,

८, २१. २५:१८. २६:३०. इर्म. ९:८. (नीति ११:११.) (२८, ५८०, ७२९.)

## ३०२ दोषदृष्टी, निंदा, गप्पा झोंकणें, खुजबुजणें, कुटाळी करणें, चाहाडी इत्यादि मना केलीं आहेत.

कल. ३:८. परंतु आतां राग, आवेश, दुष्टपण, निंदा आपल्या मुखापासून अमंगळ बोलणें हीं अवघीं तुह्मी दूर करा. लेवी. १९:१६. गीत १०१:५. नीति ४:२४. १०:८. २४:२८. रोम. १४:१०. १करिं. ५:११. एफ. ४:२९, ३१. ५:३, ४. २तीम. २:१६. तित. ३:१, २. नाक. ४:११. १पेत्र. २:१, २. ३:९. यहू. ९. (५५३, ५८१.)

## ३०३ अधिकारी व वरचड यांची निंदा व स्पर्धा करणें मना केलें आहे.

निर्ग. २२:२८. तूं प्रभूची निंदा करूं नको, आणि आपल्या लोकाच्या अधिकाऱ्याला शाप देऊं नको. यहू. ८. अणखी त्याप्रमाणेंच हे स्वप्न पाहणारे देहाला विटाळवितात व धनीपण तुच्छ करितात व गौरवाची निंदा करितात. प्रेषि. २३:४, ५. २पेत्र. २:९–११. (६१९.)

## ३०४ जीभ आवरण्याची आज्ञा आहे.

गीत ३४:१३. तो तूं आपली जीभ वाइटापासून आणि आपले ओंठ कपट बोलण्यापासून राख. ३९:१. याक. १:२६. आपण भक्तिशील आहें, असें तर तुह्मामधील कोणोएकला वाटतें, तथापि तो आपल्या जिभेला अटोपीत नाहीं, पण आपल्या अतंःकरणाला भुलवितो, तर त्याची भक्ति व्यर्थ. नीति १०:१९. १३:३. २१:२३. उपदे. १०:२०. मीख. ७:५. १पेत्र. ३:१०.

# जुलूम.

## ३०५ प्राचीन जुलूमाचीं उदाहरणें.

निर्ग. ५:१५, १६. तेव्हां इस्राएलाच्या संतानांचे नायक येऊन फारोजवळ ओरडले कीं, "तूं आपल्या चाकरांस असें कां करितोस? तुझ्या चाकरांस पेंढा देत नाहींत, परंतु ते आह्मास ह्मणतात, 'इटा करा'

आणि पाहा तुझे चाकर मार खातात, परंतु अपराध तुझ्या लोकांचा आहे." १९. यहेज्के. २२:२७–२९. मीख. ३:२, ३. नहू. ३:१. (५५३,(७,) २८५, २८६.)

## २०६ जुलूम करणाऱ्यांस जुलूमाचें फळ.

नीति २१:७. दुष्टांचें लुटणें त्यांचा नाश करील, कां कीं नीति करायाला ते मान्य होत नाहींत. यशा. ३०:१२, १३. (८.)

## २०७ ईश्वर जुलूम करणाऱ्यांचा द्वेष करितो–दंडसूचना.

याक. २:१३ ५:४ कारण कीं ज्याने दया केली नाहीं, त्याचा न्याय दयेवांचून होईल, परंतु न्यायावर दया आनंदती. पाहा, ज्या कामकऱ्यानी तुमचीं शेतें कापिलीं आहेत, त्यांची जी मजुरी तुम्ही कपटाने अटकून ठेविली, ती ओरडती, आणि कापणाऱ्याच्या हाका सैन्याच्या प्रभूच्या कानीं गेल्या आहेत. निर्ग. ३:७,९. इयो. २७:१३,१४. गीत १२:५. ७२:४. नीति १४:३१. उपदे. ५:८. यशा. ६१:८. इर्म. ५:२७–२९. यहेज्के. १८:१०,१२,१३. २२:१२–१४,२९,३१. (३१७,५८६, २८३.)

## २०८ जुलूम करणाऱ्यांचें वेडेपण.

उपदे. ७:७. पीडन सुज्ञानालाहि उन्मत्त करितें: आणि दान हृदयाला बिघडितें. आम. ३:१०. आणि परमेश्वर ह्मणतो, ते ठीक करायाला जाणत नाहींत, ते आपल्या वाड्यांत बळात्कार आणि लूट सांठवितात. (७३४)

---

# टिकून राहणें.

## २०९ पवित्रतेंत टिकून राहण्याचें अगत्य.

माथी १०:२२. आणि माझ्या नामामुळें सर्व तुमचा द्वेष करितील; परंतु शेवटपर्यंत टिकणारा हाच तरेल. प्रग. २:१०. जीं तुला सोसायाचीं आहेत त्यांतील कशाचेंहि भय धरूं नको; पाहा, तुमची परीक्षा व्हावी, ह्मणून सैतान तुह्मामधील कित्येकांस बंदिशाळेंत टाकणार आहे, आणि तुह्मास दाहा दिवस संकट होईल; मरणापर्यंत विश्वासू ऐस, ह्मण-

जे मी तुला जीवनाचा मुगुट देईन. (२४:१३) ११,१७,२६. २१:७. योह. १५:६. रोम. २:६,७ १करिंथ ९:२७. १०:१२. कल. १:२३. इब्री. ३:६,१२–१४. ४:१,११. १पेत्र. १:१०. (३:५. १२:२१. २:७.) (६४२,६५०,४७७)

## ३१० देवभक्त टिकून राहतील याविषयीं वचनें व भविष्यें.

रोम. ८:३८,३९. कां कीं माझी खातरी आहे कीं, मरण किंवा जीवन, किंवा दूत, किंवा अधिकार, किंवा सामर्थ्य, किंवा हल्लींच्या गोष्टी, किंवा होणार गोष्टी, किंवा उंचपणा, किंवा नीचपण किंवा कोणतीहि दुसरी उत्पन्न झालेली वस्तु, आमच्या प्रभू येशु ख्रीस्ताकडून जी देवाची प्रीति आहे, तिजपासून आह्मास वेगळें करायास समर्थ होणार नाहीं. ३०. इयो. १७:९. गीत ३७:२३,२४. ८९:३०–३७. नीति ४:१८. यशा. ५४:१०. ५५:३. इर्म. ३२:४०. मात्थी २४:२४. योह. ३:१६, ३६. ५:२४,६:३९,४०,४७,५१,५४. १०:२७–२९. फिलि. १:६. २थेस्स. २:१४. इब्री. ६:१९. २तीम. ४:१८. १पेत्र. १:३–५,९. १योह. ५:१८. (२१६,३५२.)

## ३११ ख्रीस्ताची देवभक्तांसाठीं विनंती.

योह. १७:९. त्यांच्या साठीं मी विनंती करितों, मी जगासाठीं विनंती करीत नाहीं, तर जीं माणसें त्वां मला दिल्हीं त्यांच्यासाठीं, का कीं तीं तझीं आहेत. १०–२१. रोम. ८:३४. अन्यायी ठरविणारा कोण? जो मेला व विशेषेंकरून पुन्हा उठला तो ख्रीस्त, तो देवाच्या उजवीकडे आहे आणि तो आह्मासाठीं विनंती करितो. लूक २२:३१,३२. इब्री. ७:२५. ९:२४.

## ३१२ पवित्र आत्म्याचा शिक्का व विसार.

२करिं. १:२१,२२. ५:५. आणि जो आह्मास तुह्मासुद्धां ख्रीस्तामध्यें स्थिर करितो व ज्याने आह्मास अभिषेक केला, तो देव आहे. त्याने आह्मावर शिक्काहि केला व आमच्या अंतःकरणांमध्यें आत्मा हा विसार दिल्हा आहे. आणि ज्याने आह्मास याकारितांच तयार केलें तो देव आहे, त्याने आह्मास आत्म्याचा विसारहि दिल्हा आहे. रोम. ८:२३. एफ. १:१३,१४. ४:३०. २तीम. २:१९. (६५१.)

## ताटस्थ्य.

### ३१३ वास्तविक ताटस्थ्य ख्रीस्ताविषयीं होत नाहीं.

मात्थी १२:३०. जो मला अनुकूळ नाहीं तो मला प्रतिकूळ आहे, आणि जो माझ्या बरोबर गोळा करीत नाहीं तो विखरितो. १ राजे. १८:२१. मार्क. ९:४०. प्रग. ३:१५,१६.

## तृप्तता.

### ३१४ तृप्त असण्याचा धर्म व लाभ.

१ तीम. ६:६–८ सुभक्ति तर मनाच्या तृप्तीसुद्धां मोठी मिळकत आहे: कां कीं आह्मी जगांत कांहीं आणिलें नाहीं, आमच्याने त्यांतून कांहीं नेववत नाहीं, हें उघड आहे. तर आह्मास अन्नवस्त्र असल्यास आह्मी त्याकडून तृप्त असावें. फिलि. ४:११. इब्री. १३:५. (३६३.)

---

## दरिद्र.

### ३१५ दरिद्रावरून अनर्थ.

नीति १०:१५. १४:२०. धनवानाचें द्रव्य त्याचें सुदृढनगर आहे, गरिबाचा नाश त्याचें दरिद्र आहे. १९:७. २२:७. उपदे. ९:१६.

### ३१६ दरिद्र्यांस ईश्वर दया व साह्य करीत असतो.

गीत ७२:१२–१४. कां तर ओरडणारा दरिद्री व दीन, यांस सहाकारी नसतांना तो सोडवील. दरिद्री व दुबळा यांवर तो करूणा करील, आणि दरिद्र्यांचे जीव तारील. त्यांच्या जिवाला ठकण्यापासून व बळात्कारापासून खंडून सोडवील, आणि त्यांचें रक्त त्याच्या दृष्टींस फार मोलाचें होईल. १०:१४,१७,१८. १०२: १७. १४०:१२. १४६: ९ अनु. १०:१८. इयो. ५:१५,१६. (६९,७०.)

### ३१७ दरिद्र्यांवर जुलूम करणें मना केलें आहे–दंडसूचना.

निर्ग. २२:२१,२२. विदेश्याला तर तूं त्रास देऊं नको, त्याचा काच करूंच नको, का कीं तुम्ही मिसरदेशांत विदेशी होतां. कोणत्या विधवेला अथवा पोरक्याला तुम्ही जाचूं नका. गीत १२:५. ७२:४. नीति २१:१३. २२:१६,२२. २३:१०. यशा. ३:१५. १०:१-३. आम. ८:४-७. मल. ३:५. (३०७,२८३.)

## ३१८ दरिद्र्यांवर देवाची वारंवार विशेष कृपा होती.

याक. २:५. अहो माझ्या प्रिय भावांनो, ऐका, जे इहलोकीं दरिद्री परंतु विश्वासानें धनवान, आणि जें राज्य देवानें आपल्या प्रीति करणाऱ्यांस देऊं केलें त्याचे वतनदार, त्यांस त्यानें निवडिलें कीं नाहीं? लूक. १:५२.,५३. ४:१८. १०:२१. १४:२१. १ करिं. १:२६-२९.

## ३१९ दरिद्री व त्यांजवर जुलूम करणारे यांमध्यें पुढें मोठा भेद होईल.

१ शमु. २:८. तो दरिद्र्याला भूमीपासून उत्थापित करितो आणि भिकाऱ्याला मळापासून उभा करितो, यासाठीं कीं त्यानीं सरदारांमध्यें बसावें आणि त्याला गौरवयुक्त राजासन प्राप्त व्हावें; कारण कीं पृथ्वीचा पाया परमेश्वराचा आहे, आणि त्यावर त्यानें जग ठेविलें आहे. लूक १६:२५. आब्राहाम बोलला, मुला, हें आठीव कीं, तूं आपल्या आयुष्यांत आपलें सुख भरून पावलास, आणि त्याप्रमाणें लाजारस दुःख पावला, परंतु आतां समाधान पावला आणि तूं क्लेश भोगितोस. (४३७,२७६.)

## ३२० दरिद्री व पीडलेले यांचें साह्य करावें आणि अटी व पक्षपात वर्जावें.

याक. २:१. अहो माझ्या भावांनो, आमच्या गौरवाच्या प्रभु येशू ख्रीस्त याचा विश्वास पक्षपातासुद्धां धरूं नका. १:२७. २:२-९. १ योह. ३:१७. परंतु ज्याजवळ जगाचें उपजीवन असेल, आणि आपल्या भावाला गरज आहे, हें पाहून जो आपला कळवळा त्याविषयीं बंद करितो, त्याजमध्यें देवाची प्रीति कशी राहती. लेवी. १९:९,१०. २५:३५. अनु. १५:१०,११. दान. ४:२७. (६७५,२२१.)

## ३२१ दरिद्र्यांचें साह्य करण्यास आश्वासन.

गीत ४१:१,२. जो दरिद्र्याची चिंता करितो, तो धन्य; दुःखाच्या

दिवसांत परमेश्वर त्याचा निभाव करील. परमेश्वर त्याला राखील आणि त्याला वांचवील; तो देशांत धन्य होईल, आणि तूं त्याला त्याच्या शत्रूंच्या मनोरथावर सोपणार नाहींस. ११२:९. नीति १९:१७. २२: ९. मात्थी ५:७. २५:३४–३६. (२९,२०४,३८१,२९०.

# दिव्य दूत.

## ३२२ दूत बहुत आहेत.

इब्री. १२:२२. तुह्मी तर जीयोन डोंगराजवळ आलां आहां, आणि जिवंत देवाचें नगर ह्मणजे आकाशांतलें यरूशलेम याजवळ, आणि दुतांच्या अयुतांजवळ. प्रग. ५:११. तेव्हां म्या पाहिलें आणि आसन व प्राणी व वडील यांच्या भोंवतें बहुत दुतांचा शब्द ऐकिला; आणि त्यांची गणती अयुतांचीं अयुतें व हजारांचीं हजारें होतीं.

## ३२३ दिव्य दूतांचा उद्योग.

मात्थी १३:३९, आणि पेरणारा वैरी हा सैतान आहे; आणि कापणी ही काळाची समाप्ति आहे; आणि कापणारे हे दूत आहेत. ४१. १८: १०. इब्री. १:१४. सर्व दूत सेवा करणारे आत्मे, तारणाचें वतन पावणार जे त्यांसाठीं सेवा करायास पाठविलेले असे नाहींत काय? २ शमु. २४:१६. २ राजे. १९:३५. इयो. ३८:७. गीत ९१:११,१२. दान. ६:२२. ९:२१,२२. लूक. १६.२२.

# दुष्ट दूत.

## ३२४ दूतांचा धर्मभ्रंश.

२ पेत्र. २:४. कारण कीं ज्या दुतांनीं पाप केलें, त्यांस देवानें राखिलें नाहीं, तर नरकांत टाकून न्यायाकरितां राखण्यासाठीं निबिड काळोखाच्या बंधनांमध्यें ठेविलें. यहू. ६. आणि ज्या दुतांनीं आपल्या पहिल्या स्थितींत न राहतां आपली वस्ती सोडिली, त्यांस त्यानें सर्वकाळच्या बंधनांमध्यें निबिड काळोखाखालीं मोठ्या दिवसांतील न्यायासाठीं राखिलें आहे. प्रग. १२:७,८.

## ३२५ दुष्ट दूतांचीं नांवें.

योह. ८:४४. तुह्मी सैतान बापापासून झालां आहां, आणि आपल्या बापाच्या इच्छाप्रमाणें करायास इच्छितां, तो प्रारंभापासून मनुष्यघातक आहे, आणि तो खरेपणांत टिकला नाहीं, कारण कीं त्यामध्यें खरेपण नाहीं; तो खोटें बोलतो तेव्हां आपल्यांतूनच बोलतो, कां कीं तो लबाड व लबाडीचा बाप आहे. १४:३०. यशा. २७:१. मात्थी ४:३. १०:१. १३:३८,३९. मार्क. ५:९, लूक ११:१५, २ करिं. ४:४. एफ. २:२. ६:१२, १ पेत्र. ५:८. प्रग. ९:१०,११. १२:९.

## ३२६ दुष्ट दूतांचा स्वभाव व उद्योग.

२ करिं. ४:४. त्याविषयीं ह्मटलें तर या जगाच्या देवानें अविश्वासी लोकांच्या मनांस अंधळें केलें आहे, यासाठीं कीं जो देवाची प्रतिमा आहे, त्या ख्रीस्ताच्या गौरवाच्या शुभवर्त्तमानाचा उजेड त्यामध्यें प्रकाशित होऊं नये. १ पेत्र. ५:८. सावध असा, जागे राहा, कारण कीं तुमचा जो शत्रु सैतान तो गर्जणाऱ्या सिंहासारिखा कोणाला गिळावें, असें शोधीत फिरतो. इयो. १:७. मात्थी १३:१९,३८,३९. लूक ४:५. ८:१२. २२:३१. योहा. ८:४४. १३:२. प्रेषि. ५:३. एफ. २:२. ६:१२. २ तीम. २:२६. प्रग. २:२४. १२:९,१०,१२. २०:७,८.

## ३२७ दुष्ट दूत मनुष्यांस पाप व नाश यांकडे कसे लावितात.

२ थेस्स. २:९,१०. त्याचें येणें सैतानाच्या करण्याप्रमाणें सर्व सामर्थ्य व चमत्कार व खोटे उत्पात यांसुद्धां. आणि नाश पावणाऱ्यांचें सर्व अन्यायरूप ठकविणें यासुद्धां आहे, कारण कीं त्यांनीं आपलें तारण व्हावें ह्मणून खरेपणाची प्रीति धरिली नाहीं. उत्प. ३:१३. १ काल. २१:१. २ करिं. ११:३,१४. १ तीम. ४:१. २ तीम. २:२६. प्रग. १६:१३,१४. (७०२,७२९.)

## ३२८ दुष्ट दूतांच्या सूचना कीं.

### १. पापी लोक नेमलेला दंड सुचवतील.

उत्प. ३:४,५. मग साप स्त्रिला बोलला कीं, तुह्मी मरालच मराल, असें नव्हे; कां तर देव असें जाणतो कीं ज्या दिवसीं तुह्मी त्यावरचें खाल त्यांत तुमचे डोळे उघडतील. आणि तुह्मी बरें व वाईट जाणून देवासारिखीं व्हाल.

## २. धार्मिकपणा केवळ स्वार्थ आहे.

इयो. १:९-११. तेव्हां सैतान परमेश्वराला उत्तर करीत ह्मणाला, "ईयोब देवाची भीति फुकट धरितो काय? त्वां त्याजभोंवतें व त्याच्या घराभोंवतें व जें कांहीं त्याचें आहे त्याजभोंवतें समयांत कुंपण घातलें नाहीं काय? त्वां त्याच्या हाताच्या कामाला आशीर्वाद दिल्हा ह्मणून त्याचें धन देशांत वाढलें आहे. परंतु तूं आपला हात पुढें करून जें कांहीं त्याचें आहे त्याला स्पर्श, ह्मणजे तो निश्चयें तुझ्या तोंडावर तुला शापील."

## ३. ईश्वराने परिणाम नेमलेला असतां उपाय करणें व्यर्थ आहे.

मात्थी ४:५,६. मग सैतानाने त्याला पवित्र नगरांत नेलें, आणि देवळाच्या कंगोऱ्यावर त्याला उभें केलें. आणि त्याला ह्मटलें, "तूं देवाचा पुत्र असलास तर खालीं उडी टाक, का कीं असें लिहिलें आहे कीं, तो तुजविषयीं आपल्या दुतांस आज्ञा करील, आणि तुझा पाय धोंड्यावर कधीं अपटूं नये ह्मणून ते तुला हातांनीं धरतील". (१०२.)

## ४. लग्न करणें व मांस खाणें मना केलें आहे.

१ तीम. ४:१-३. आत्मा तर स्पष्ट ह्मणतो कीं, शेवटल्या काळांमध्यें विश्वासाविषयीं कित्येक भ्रष्ट होतील, ते फसवणाऱ्या आत्म्यांस व भुतांच्या उपदेशांस लक्ष देतील. लबाड बोलणाऱ्यांच्या ढोंगाने हे आपल्या भावनेंत बहिरावलेले असून लग्न करायाला मना करितील, जीं भक्ष्यें विश्वासणाऱ्यांनीं व खरेपण जाणणाऱ्यांनीं उपकारस्तुति करून स्वीकारावीं, ह्मणून देवानें उत्पन्न केलीं, त्यांपासून दूर व्हावें, असें सांगतील.

## ३२९ दुष्ट दूतांच्याविरुद्ध उभें राहिलें पाहिजे.

याक. ४:७. यास्तव देवाच्या स्वाधीन असा; सैतानाविरुद्ध उभें राहा, ह्मणजे तो तुह्मापासून पळेल. एफ. ४:२७. ६:१२,१३. १ पेत्र. ५:८,९. (७०५,६८३)

# देवभक्त.

## ३३० देवभक्त पाप्यांपासून वेगळे आहेत.

यहेज्के. ४४:२३. आणि ते माझ्या लोकांस पवित्राचा व अपवित्राचा

भेद शिकवितील, आणि अशुद्धाचा व शुद्धाचा भेद त्यांस कळवितील. १ पेत्र. २:९. परंतु तुम्ही निवडलेली जात, राजमान्य याजकवर्ग, पवित्र राष्ट्र, मोलानें मिळविलेली प्रजा असे आहां: यासाठीं कीं ज्यानें तुम्हास अंधारांतून आपल्या आश्चर्यवान् उजेडांत बोलाविलें आहे, त्याचे सद्गुण तुम्ही सांगून दाखवावे. उत्प. ७:१. इयो. २:३. गीत १:२,४. इस. १५:१९. योह. १५:१९. प्रेषि. ८:२१. तित. २:१४. १ योह. ५:१९. (४४२.)

# देवभक्तांस व पाप्यांस निरनिराळ्या संज्ञा आहेत.

## ३३१ धार्मिक व दुष्ट.

गीत १:१,४,५ तो माणूस फार धन्य जो दुष्टांच्या विचाराप्रमाणें चालत नाहीं, आणि पाप्यांच्या मार्गांत उभा राहत नाहीं, आणि निंदकांच्या आसनावर बसत नाहीं. जे दुष्ट ते तसे नाहींत, परंतु ज्या भुसाला वारा उडवितो, त्यासारिखे ते आहेत. यास्तव न्यायांत दुर्जन आणि नीतिमानांच्या सभेंत पापी टिकणार च नाहीं. ४:३.

## ३३२ न्यायी व अन्यायी.

नीति २९:२७. अन्यायी मनुष्य न्यायीला वीट, आणि सरळ मार्गी दुष्टाला अघोर असा आहे. मात्थी ५:४५. म्हणजे तुम्ही आपल्या आकाशांतील बापाचे पुत्र व्हाल, कां कीं तो वाइटांवर आणि चांगल्यांवरहि आपल्या सूर्याला उगववितो, आणि न्यायींवर आणि अन्यायींवरीह पाऊस पाडितो.

## ३३३ नीतिमान व अनीतिमान.

गीत ३७:१६,१७. बहुत दुर्जनांच्या द्रव्यापेक्षां नीतिमानाचें थोडें हें बरें आहे. कारण कीं दुर्जनांचे हात मोडले जातील, परंतु नीतिमानांस परमेश्वर आश्रय आहे. मल. ३:१८.

## ३३४ देवाचे मित्र आणि देवाचे शत्रू.

यशा. १:२४. याकरितां प्रभु सैन्यांचा परमेश्वर इस्राएलाचा पराक्रमी म्हणतो, अहा मी आपले शत्रू दूर करून स्वस्थ राहीन, आणि आपल्या वैऱ्यांचा सूड उगवीन. याक. ४:४. अहो व्यभिचारी व व्यभिचारिणी, जगाची मैत्री ही देवाचें वैर आहे, हें तुम्हास ठाऊक नाहीं

काय? यास्तव कोणी जगाचा मित्र व्हायास इच्छितो तो देवाचा वैरी ठरला आहे. (७१७.)

## ३३५ देवनिष्ठी आणि देवद्वेषी.

निर्ग. २०:६. आणि जे मजवर प्रीति करितात आणि माझ्या आज्ञा पाळितात त्यांच्या हजारांवर मी दया करितों. रोम. १:३० निंदक, देवद्वेषी, उद्धट, अहंकारी, आपणाला नावाजणारे, कुकर्म योजणारे, आईबापांच्या आज्ञा मोडणारे.

## ३३६ विश्वासी आणि अविश्वासी.

प्रेषि. ५:१४. आणि उत्तरोत्तर पुष्कळ पुरुष व बायका विश्वास धरून प्रभूकडे झाल्या. २ करिं. ६:१४.

## ३३७. मेंढरें आणि लांडगे किंवा सर्प.

मात्थी २३: ३३. अहो साप, फुरस्यांच्या पिल्लांनो, नरकदंड कसा चुकवाल. योह. १०:१४. प्रेषि. २०:२९.

## ३३८ देवाचीं लेंकरें आणि सैतानाचीं लेंकरें.

मात्थी १३:३८. आणि शेत हें जग आहे; आणि चांगलें बीं हे राज्यांतील पुत्र आहेत, आणि निदण हे त्या दुष्टांचे पुत्र आहेत; १ योह. ३:१०. (७१७.)

## ३३९ अज्ञांकित लेंकरें आणि आज्ञांकित लेंकरें.

एफ. २:१, २. आणि तुह्मी अपराध व पापें यांमध्यें मेलेले असतां, तुह्मास त्यानें जिवंत केलें. त्यांमध्यें तुह्मी या जगाच्या धोरणाप्रमाणें अंतरिक्षांतील सत्तेचा अधिकारी, आज्ञाभंगाच्या पुत्रांस आतां प्रेरणारा आत्मा, त्याप्रमाणें पूर्वी चालला. १ पेत्र. १:१४.

## ३४० उजेडाचीं लेंकरें आणि अंधाराचीं लेंकरें.

१ थेस्स. ५:५. सर्व तुह्मी उजेडाचे पुत्र, ह्मणजे दिवसाचे पुत्र आहां, आह्मी रात्रीचे व अंधाराचे नाहीं. यशा. ४२:१८. लूक १६:८.

## ३४१ राज्याचीं लेंकरें आणि क्रोधाचीं लेंकरें.

मात्थी १३:३८. आणि शेत हें जग आहे; आणि चांगलें बीं हे राज्यांतील पुत्र आहेत, आणि निदण हे त्या दुष्टाचे पुत्र आहेत. एफ. २:३.

## देवभक्तांचीं लक्षणें.

३४२ देवभक्त ईश्वरावर प्रीति संतोष व आशा ठेवितात आणि त्यासीं मैत्री व भागिपण ठेवून त्याजवळ व्हावयास इच्छितात.

गीत १८:२. परमेश्वर माझा खडक, माझा दुर्ग व माझें निभावण, माझा देव, माझा खडकरूप आश्रय; त्यावर मी आशा ठेवीन; माझी ढाल व माझ्या तारणाचें शिंग, माझा गड आहे. १६:५, ८. ३४:२. ३८:१५, २१. (३२:२२.) ३९:७. ४२:१, २. ४३:४. ५१:११. ६३ १–३, ८. ७३:२५, २६. ११९:५७. निर्ग. १५:२. १शम. २:१: यशा. १२:२. २६:८, ९. ६१:१०. इर्म. १४:८, ९. विलाप. ३:२४.. हब. ३:१७, १८. रोम. ५:२. १करिं. १:९. १योह. १:३. (६७४, ११६.)

३४३ देवभक्त ईश्वराच्या आज्ञा आवडीने पाळून त्याचीं सर्व वचनें व स्थापनें यांविषयीं आनंद पावतात.

गीत १:२. परंतु त्याची आवड परमेश्वराच्या शास्त्रांत आहे, आणि रात्रंदिवस तो त्याच्या शास्त्राचें मनन करितो. ११९:२०, २४, ९७, १०३, १११, १२७, १२८, १३१, १६२, १६७. इर्म. १५:१६. रोम. ७:२२. (२२७.)

३४४ देवभक्त ईश्वरावर परिणाम सोपून प्रमाणिक व स्थिर असतात.

२करिं. ४:१, २. यास्तव आह्मावर दया झाली त्याप्रमाणें ही सेवा आह्मास असतां, आह्मी थकत नाहीं. तर आह्मी लाजेच्या गुप्त गोष्टी नाकारिल्या, आह्मी कृत्रिमी भावाने चालत नाहीं व देवाच्या वचनाविषयीं कपट करीत नाहीं, तर खरेपण प्रगट करण्याने आह्मी देवासमक्ष आपणांस सर्व माणसांच्या मनांमध्यें पटवितों. १:१२. उत्प. २२:१०. यशा. ४९:४, ५. योह १:४७. (२३८, ११६, १८६, ४५७, ३८०.)

३४५ देवभक्त नम्र, सौम्य, सहनशील व क्षमाशील असतात.

गल. ५:२२,२३. परंतु आत्म्याचें फळ हें आहे, प्रीति, आनंद, सहनशीलता, उपकारिकपणा, चांगलेपण, विश्वास, नम्रता, इंद्रियदमन; अशांच्या विरुद्ध नेमशास्त्र नाहीं. मात्थी १०:१६. १ करिं. ४:१२, १३. १३:४,७. इब्री १०:३४. याक. ५:६. (२४४,५८३, ६२३,५७९.)

३४६ देवभक्त अस्वार्थिक, परोपकारी आणि ईश्वराच्या सेवेंत निमग्न असतात.

२ करिं. १२:१४, १५. पाहा, तिसरेदां मी तुह्माजवळ येण्यास तयार आहें, आणि मी तुह्मावर भार घालणार नाहीं, कां कीं मी तुमच्या मालमत्तेस नव्हे, तर तुह्मास शोधितों; कारण कीं लेंकरांस आईबापांसाठीं नव्हे, तर आईबापांस लेंकरांसाठीं सांठविलें पाहिजे. आणि तुमच्या जीवात्म्यांसाठीं मी अतिहर्षें खर्च करीन व आपण खर्चण्यांत येईन; मी तुह्मावर जसी अधिकाधिक प्रीति करितों तसी मजवर तुमची प्रीति कमी असली, तरी. प्रेषि. ४:३२. (११७,२०३,१०,७१४.)

३४७ जेव्हां पापी ईश्वराचा अपमान करितात तेव्हां देवभक्तांस दुःख वाटतें.

गीत ११९:१३६,१५८. ते तुझें शास्त्र पाळीत नाहींत यास्तव पाण्याचे ओघळ माझ्या डोळ्यांतून उतरतात. मी दगेखोरांस पाहून फार खेद पावलों; कारण कीं त्यांनीं तुझें वचन पाळिलें नाहीं. एज्रा. ९:२–५. १०:६. यहेज्के. ९:४. प्रेषि. १७:१६. रोम. ९:१–३. २ पेत्र. २:७, ८. (४७५.)

३४८ देवभक्त आपली योग्यता मनांत आणून आपले अपराध समजायास इच्छितात.

उत्प. ३२:१०. ज्या सर्व दया आणि सर्व सत्यता त्वां आपल्या दासावर केल्या आहेत, त्यांस मी अयोग्य आहें, कां तर मी आपली काठी घेऊन हा यार्देन उतरलों, आणि आतां दोन गोट झालों. इयो. १३:२३.

गीत २६:२. ५१:३. ११५:१. १३९:२३, २४. मात्थी ८:८. २५: ३७–३९. रोम. ७:२४. १ करिं. १५:९, १०. एफ. ३:८. (४६०, ४७४.)

## ३४९ देवभक्त ख्रीस्तावरील विश्वासानें जगतात.

गल. २:२०. मी ख्रीस्ताबरोबर खांबीं दिल्हेला आहें, तरी मी वांचतों, तथापि मी नव्हें, तर ख्रीस्त मजमध्यें वांचतो, आणि आतां देहांत जें माझें जिणें आहे तें देवाच्या पुत्रावरच्या विश्वासानें आहे, त्यानें मजवर प्रीति केली व आपणाला मजकरितां दिल्हें. १ पेत्र. १:८. (६०८.)

## ३५० देवभक्तांस प्रार्थना व ध्यान आवडतात.

गीत ११९:९७, १४८. मला तुझ्या शास्त्राची किती आवड आहे; सर्व दिवस तें माझ्या मननाचें आहे; तुझ्या वचनाचें ध्यान करायास माझे डोळे रात्रीच्या प्रहराची वाट पाहतात. २३, २४, ४८, ९९, १:२. १६:८. ६३:५. ७७:११, १२. १४३:५, ६. दान. ६:१०. (२४६, ४६८.)

## ३५१ देवभक्तांचें मन फार शांत आहे.

गीत ११९:१६५. जे तुझ्या शास्त्रावर प्रीति करितात, त्यांचें फार कल्याण आहे; आणि त्यांस कांहीं अडखळा नाहीं. योह. १४:२७. गल. ५:२२. फिलि ४:७. (१६६.)

## ३५२ देवभक्तांचें ज्ञान व पवित्रपणा वाढतात.

गीत ९२:१२. पुण्यवान खजुरी झाडासारिखा फुलेल; लबानोनावरल्या एरेजसारिखा वाढेल. १३, १४. मात्थी १३:३३. मार्क. ४: २६–२८. २ करिं. ४:१६. २ थेस्स. १:३. (३१०.)

## ३५३ देवभक्त वेगळे केलेले आहेत अहंपणाला जागा नाहीं.

रोम. ३:२७. तर नावाजणूक कोठें? ती घालविली आहे. कोणत्या नेमानें? कर्मांच्या नेमानें काय? नाहीं; तर विश्वासाच्या नेमानें. १ करिं. ४:७. एफ. २:१–३, ८. (५२६.)

## ३५४ देवभक्त झाले असे थोडे परंतु पुष्कळ होतील.

मात्थी ७:१४. आणि जीवनाकडे जाण्याचा दरवाजा अरुंद आणि

मार्ग संकोचित आहे, आणि ज्यांस तो सांपडतो ते थोडके आहेत. २०: १६. उत्प. ७:१. (६:११, १२.) १८:३२. गण. १४:२३, २४. लूक १२:३२. १३:२३, २४. १८:८. २तीम. १:१५. प्रग. ७:९. (५९३.)

## ३५५ देवभक्त जगाचा उजेड व रक्षणकर्त्ते आहेत.

मात्थी ५:१३, १४. तुह्मी पृथ्वीचें मीठ आहां; परंतु मिठाचा खारटपणा गेला, तर त्याला खारटपणा कशाने येईल? तें बाहेर टाकून माणसांनी तुडवावें यावांचून पुढें कोणत्याहि कामास उपयोगी नाहीं. तुह्मी जगाचा उजेड आहां. डोंगरावर वसलेलें नगर लपत नाहीं. इर्म. ५:१. यहेज्के. २२:२९, ३०. (४८२.)

## ३५६ देवभक्तांचा विलक्षणपणा.

अनु. १४:२. कारण कीं तूं आपला देव परमेश्वर यासाठीं पवित्र लोक आहेस, आणि परमेश्वराने तुला यासाठीं निवडून घेतलें कीं भूमीच्या पाठीवर जे सर्व लोक त्यांपेक्षां त्वां त्याचे खासगीचे लोक असें व्हावें. रोम. ७:१५–२५. २करिं. ६:८–१०. तित. २:१४.

## ३५७ देवभक्तांवर ईश्वर संतुष्ट आहे आणि पुढें त्यांस निरोष पूर्णता, थोरपण व गौरव प्राप्त होतील.

अनु. ३२:९. कारण कीं परमेश्वराचे लोक ते त्याचा विभाग; याकोब लोक त्याचें सूत्रनेमित वतन आहे. गण. २३:२१. ईयो. ७:१७, १८. गीत ५०:२. श. गीत ४:७. यशा. ४३:४. ४६:१३. ६२:३,५. जफ. ३:१७. मल. ३:१६, १७. मात्थी १३:४३. लूक. ७:४२, ४३, ४७. १५:७, २२. योह. १४:२१–२३. १५:९, १५. २०:१७. रोम. ८:२९. १करिं. ६:३. २करिं.८:२३. एफ. ५:२५–२७. कल. १: २१, २२. इब्री १२:२३. प्रग. १:६. १४:३. २१:९. (२१५, २५, ४५७, १६८–९.)

# देवावरची प्रीति.

## ३५८ देवावर प्रीति करणें हा आमचा मुळचा धर्म होय.

मात्थी २२:३७, ३८. मग येशू त्याला ह्मणाला, तुझा देव प्रभु या-

वर तूं आपल्या सर्व अंतःकरणानें व आपल्या सर्व जिवानें व आपल्या सर्व मनानें प्रीति कर, हीच पहिली व मोठी आज्ञा आहे. (११०.)

## ३५९ देवावर प्रीति कां करावी ?

गीत ९९:९. परमेश्वर आमचा देव, याला तुम्ही उंच माना; आणि त्याच्या पवित्र डोंगरावर भजा; कां तर परमेश्वर आमचा देव पवित्र आहे. १०७:८. १४५:३. १४८:१३.

## ३६० देवावरची खोटी प्रीति.

गीत १०६:१२, १३. तेव्हां त्यानीं त्याच्या वचनांवर विश्वास ठेविला; त्याच्या स्तवनाचें गायन केलें. परंतु ते त्याचीं कृत्यें लवकरच विसरले; त्यानीं त्याच्या बोधाची वाट पाहिली नाहीं. यहेज्के. ३३:३१. (६१५, २०१, ४३४, ६८२, ७१६, ७२९.)

---

# धन.

## ३६१ धन हा बहुतेकांचा पुतळा आहे.

मात्थी १९:२१, २२. येशूनें त्याला म्हटलें, पूर्ण व्हायाचें असलें तर जा, आपली मालमत्ता विकून दरिद्र्यांस दे, म्हणजे आकाशांत तुला संपत्ति मिळेल; चल, माझ्या मागें ये. परंतु तो तरूण ही गोष्ट ऐकून खिन्न होऊन निघाला, कां कीं त्याची वहुत मालमत्ता होती. तीम. ४:१०.

## ३६२ धन हा भ्रष्टकारक व नाशकारक आहे.

नीति १:३२. कां कीं निर्बुद्धीचें एकीकडे फिरणें हें त्याला वधील आणि मूर्खांचें स्वस्थपण त्यांला नाशील. ३०:८, ९. उत्प. १३:१०–१३. अनु. ८:११–१४. ३२:१३–१५. २ काल. २६:३, ५, १५, १६. गीत ३०:६. ५५:१९. ९२:७. उपदे. ५:१२, १३. इर्म. २२:२१. यहेज्के. १६:४९, ५०. २८:५. मात्थी १९:२३, २४. मार्क. ४:१९. १ तीम. ६:८–११. (२९७.)

## ३६३ धन मोठ्या उत्कंठेनें शोधूं नये.

नीति २३:४. धनवान व्हायाला श्रम करूं नको, तूं आपल्या बुद्धि

वर भरवसा ठेवूं नको. २८:२०, २२. यशा. ५:८. २पेत्र. २:१४–१६. (३१४, २९८–९.)

## ३६४ धन पोकळ व नाशवंत आहे.

नीति २३:५. तूं आपली दृष्टि त्याजकडे लाविसील आणि तें नाहींच काय? कां कीं धन निश्चयें आपणासाठीं पंख करितें, जसा गरुड आकाशाकडे तसें तें उडून जातें. उपदे. १:२, १४. २:४–११, १७–१९. ५:१०, ११. (५३२.)

## ३६५ धनाचा योग्य उपयोग कोणता.

१तीम. ६:१७–१९. जे या काळीं धनवान त्यांस आग्रहानें सांग कीं, त्यानीं अभिमान धरूं नये, आणि चंचळ द्रव्यावर नव्हे, तर जो जिवंत देव आह्मास उपभोगासाठीं धनरूपें अवघीं विपुळ देतो, त्यावर आशा ठेवावी; चांगलें करावें, उत्तम कर्माविषयीं धनवान व्हावें, उदार, परोपकारी असें व्हावें; पुढल्या काळासाठीं जेणेंकरून चांगला आधार होईल, असें सांठवण आपणासाठीं करावें, यासाठीं कीं त्यानीं सर्वकाळचें जीवन पावावें. (२०२.)

# धीर.

## ३६६ धीर धरावा.

याको. ५:७, ८. तर अहो भावानो, प्रभूच्या येण्यापर्यंत धीर धरा: पाहा, शेतकरी भूमीच्या मोलवान फळाची वाट पाहत असतां पहिला व शेवटला पाऊस पडे तोंपर्यंत त्याविषयीं धीर धरितो. तुह्मीहि धीर धरा, आपल्या अंतःकरणांस स्थिरावा, कारण कीं प्रभूचें येणें जवळ आलें आहे. १०, ११. १:४. गीत ३७:१, ७. लूक २१:१९. रोम. २:७. १२:१२. २करिं. ६:४. १थेस्स. ५:१४. इब्री ६:१२. १०:३६. १२:१, २. १पेत्र. २:२०. २पेत्र. १:५, ६. (६६८, ५८३, ५१९.) धीराचीं उदाहरणें. २४४, ५३८, ३४५. पाहा.

# धैर्य.

## ३६७ धैर्य धरावें याविषयीं उदाहरणें व वचनें.

अनु. ३१:६. तुह्मी धीर धरून धीट व्हा, त्यांपुढें भिऊं नका आ-

णि घाबरूं नका: कारण कीं तुझा देव परमेश्वर तो तुझ्यासंगतीं चालत आहे: तो तुला टाकणार नाहीं, आणि तुला सोडणार नाहीं. यहोशु. १:९. १काल २८:२०. २काल. १९:११. एज्रा. १०:२–५. नहे. ६:११. गीत २७:१४. ३१:२४.

---

# नम्रता.

## ३६८ नम्रतेचा प्रकार व गुण.

लूक. १५:१८, १९. मी उठून आपल्या बापाकडे जाईन व त्याला ह्मणेन, हे बापा, म्या आकाशाच्या विरूद्ध आणि तुझ्या समोर पाप केलें आहे: आतांपासून तुझा पुत्र ह्मणवायास मी योग्य नाहीं, आपल्या एका मोलकऱ्याप्रमाणें मला ठेव. २३:४०, ४१. न्याय. १०:१५. २शमु. २४:१७. ईयो. २:१०. (१२१, १०, ४७४, ४२८, ७१४.)

## ३६९ नम्रता धरावी, आश्वासन.

यशा. ५७:१५. तर उंच व थोरावलेला जो सर्व काळची वस्ती करितो, ज्याचें नाम पवित्र आहे तो असें ह्मणतो कीं, मी उंच व पवित्रस्थानांत वसतों आणि चेंचरलेल्या व नम्र आत्म्याच्या जनासींहि वसतों, नम्राच्या आत्म्याला जीव आणायाला आणि चेंचरलेल्यांच्या हृदयाला जीव आणायास. मात्थी ५:३. "जे आत्म्याने दीन ते धन्य, कारण कीं आकाशाचें राज्य त्यांचें आहे." लेवी. २६:४१, ४२. ईयो. २२: २९. गीत ९:१२. १०:१७. १३८:६. नीति ३:३४. १५:३३. २२: ४. २९:२३. मीख. ६:८. लूक १८:१४. याक. ४:६, १०. १पेत्र. ५:५, ६. (४३१–२.)

# नरकलोक.

## ३७० नरकलोक हें अग्निदंडाचें स्थापन आहे.

लूक १६:२४. मग तो हाक मारून बोलला, हे बापा आब्राहामा, मजवर दया कर, आणि लाजारसाने आपल्या बोटाचें अग्र पाण्यांत बुचकळून माझी जिभ थंड करावी ह्मणून त्याला पाठीव, कां तर या जाळांत मी क्लेशित आहें. प्रग. २१:८. परंतु भेकड व अविश्वासी व ओंगळ व

घातक व व्यभिचारी व चेटकी व मूर्त्तिपूजक व सर्व लबाड, यांचा भाग, जें सरोवर अग्नीने व गंधकाने जळतें, त्यांत होईल; हें दुसरें मरण आहे. गीत २१:९. यशा. ३०:३३. ३३:१४. २ थेस्स. १:८. (३८६.)

# नास्तिकपणा.

## ३७१ नास्तिकाच्या कल्पना व आचरण.

यहेज्के. ८:१२. तेव्हां त्याने मला ह्मटलें, मनुष्याच्या पुत्रा, इस्राएलाच्या वंशाचे वडील प्रत्येक आपल्या प्रतिमांच्या कोठड्यांत अंधारांत जें करितात तें तूं पाहतोस काय? कां तर ते ह्मणतात कीं, परमेश्वर आह्माला पाहत नाहीं, परमेश्वराने पृथ्वी टाकिली आहे. २ पेत्र. ३:३,४. प्रथम हें जाणावें कीं, शेवटल्या दिवसांमध्यें थट्टेखोर येतील, आपल्याच इच्छांप्रमाणें चालतील; आणि ह्मणतील कीं, त्याच्या येण्याविषयीं वचन कोठें आहे? कां तर पूर्वज निजले तेव्हांपासून अवघीं जसीं उत्पत्तीच्या प्रारंभीं, तसीं राहतात. निर्ग. ५:२. ईयो. २१:१४,१५. गीत. १०:४. १४:१. ५९:७. यशा. २२:१३. रोम. ३:१८. एफ. २:१२. (५५३, ३९३, ७१९, ७२२, ७३२, ७३५)

# निंदा व उपहास.

## ३७२ निंदा व उपहास करूं नये.

नीति ३:३४. ९:१२. निश्चयें तो निंदकांला निंदितो, परंतु दीनांवर प्रसाद करितो. जर ज्ञानी असलास तर आपणासाठीं ज्ञानी असशील, परंतु जर निंदा केली तर तूंच मात्र तिचें फळ भोगिसील. १२:५. १४:२१. १५:२०. १९:२९. २२:१०. २९:८. मात्थी १८:१०.

# निराशा.

## ३७३ निराशेचीं उदाहरणें व निषेध.

गीत ४२:५. हे माझ्या जिवा, तूं कां खिन्न झाला आहेस? आणि मजमध्यें कां तळमळतोस? देवाची वाट पाहा, कां तर त्याच्या दर्शनाने जें तारण, त्यामुळें त्याची स्तुति मी पुढें करीन. उत्प. ३७:३४,३५.

यहोश. ७:६,७,१०. नीति १२:२५. इर्म. १८:११,१२. मात्थी २७:५ (४१६,७२७.)

# निषेध.

## ३७४ योग्य निषेध करावा—आश्वासन.

लूक १७:३. आपणांस संभाळा; तुझ्या भावानें तुझा अन्याय केला तर त्याचा निषेध कर, आणि जर तो पश्चात्ताप करील तर त्याची क्षमा कर. १थेस्स. ५:१४. आणि अहो भावानो, आह्मी तुह्मास बोध करितों कीं, वावग्यांस बोध करा, उदास्यांचें समाधान करा; अशक्तांस आधार व्हा, सर्वांसीं सहनशील असा. लेवी. १९:१७. नीति ६:२३. १९:२५. २४:२४,२५. २८:४,२३. यहेज्के. १६:१,२. मात्थी १८:१५. एफ. ५:११. कल. ३:१६. (२३०.)

## ३७५ निषेध करण्याचीं उदाहरणें.

मात्थी १६:२३. परंतु तो मुरडून पेत्रसाला ह्मणाला, अरे सैताना, माझ्या मागें हो; तूं मला अडखळा आहेस: कारण कीं तूं देवाच्या गोष्टींकडे लक्ष लावीत नाहींस, माणसांच्या गोष्टींकडे लावितोस. गल. २:११. परंतु पेत्रस अंत्योखीयास आला होता तेव्हां म्या त्याला प्रत्यक्ष अडविलें, कां तर तो दोषी होता. नहे. १३:११,१७,१८. दान. ५:२२–२४. होशे. ५:२. लूक २३:४०. (२४८,१८७.)

## ३७६ नम्र हे निषेध पावून उपकार मानितात.

गीत १४१:५. नीतिमानानें तर मला हाणावें; उपकार होईल; त्यानें माझा निषेध करावा; मस्तकाचें उटणें होईल; माझें मस्तक अव्हेरणार नाहीं; अणखी त्यांच्या अनर्थांत माझी प्रार्थना होईल. नीति २५:१२. २८:२३.

## ३७७ गर्विष्ट हे निषेधाचा उपहास करितात.

आमो. ५:१०. जो वेशींत निषेध करितो, त्याला ते द्वेषितात; आणि जो यथार्थ बोलतो, त्याला अघोर मानितात. योह. ३:२०. कां कीं जो कोणी वाईट कामें करितो तो उजेडाचा द्वेष करितो, आणि आपल्या कामांचा निषेध होऊं नये ह्मणून उजेडाकडे येत नाहीं. ७:७. नीति १:७,२५. १३:१. १५:१२. लूक ३:१९,२०.

### ३७८ निषेध स्वीकारावा हें शाहाणपण—धिःकारावा हें मूर्खपण आहे.

नीति १०:१७. १२:१. जो संबोध पाळितो तो जीवनाच्या मार्गांत आहे, परंतु जो निषेधाला अव्हेरितो तो भ्रांत आहे. ज्याला संबोध आवडतो त्याला विद्या आवडती, परंतु जो निषेधाला द्वेषितो तो पशुशील. ६:२३. १३:१८. १५:५, १०, ३१, ३२. २९:१. उपदे. ४:१३.

### ३७९ निषेधणाऱ्यांनी आपल्या खोडी नीट कराव्या.

रोम. २:२१–२३. तर जो तूं दुसऱ्यांस शिकवितोस, तो तूं आपल्यास शिकवीत नाहींस काय? जो तूं उपदेश करितोस कीं, चोरी करूं नये, तो तूं चोरी करितोस काय? जो तूं सांगतोस कीं, व्यभिचार करूं नये, तो तूं व्यभिचार करितोस काय? जो तूं मूर्त्तींचा कंटाळा करितोस, तो तूं धर्मादायास लुटितोस काय? जो तूं नेमशास्त्राचा अभिमान धरितोस, तो तूं नेमशास्त्र मोडून देवाचा अपमान करितोस काय? मात्थी ७:३–५.

## नीतिमत्व.

### ३८० आत्मीक व जगीक गोष्टीमध्यें नीतिमत्व, खरेपण व प्रमाणिकपण धरावें.

नीति २१:३. न्यायत्व व नीति करणें हें यज्ञापेक्षां परमेश्वराला आवडतें. २४:२३. मीखा ६:८. हे मनुष्या, जें उत्तम तें त्यानें तुला प्रगट केलें आहे: आणि न्यायानें आचरणें, दया प्रीति करणें, आणि आपल्या देवाकडे नम्रतेनें वर्त्तणें, यांवांचून परमेश्वर तुजपासून काय मागतो? लेवी. १९:१५, ३६. अनु. ६:१८. १६:२०. १ शमु. १२:१, ३, ४. गीत ५१:६. यशा. ५६:१. जख. ७:९, १०. लूक २०:२५. रोम. १३: ७, ८. एफ. ६:१४. १ थेस्स. २:१०. १ तीम. ६:११. तित. २:११, १२. (२३८, ४५४, ३४४, ७.)

### ३८१ नीतिमत्व व प्रमाणिकपणा यांचें प्रतिफळ, ह्मणजे भक्तशीलपणाचे लाभ.

गीत ५८:११. ८४:११. तेव्हां माणूस ह्मणेल, 'निश्चयें नीतिमा-

नाला फळ आहे; जो न्याय ठरवितो, असा देव पृथ्वींत आहे खरा. कारण कीं परमेश्वर देव सूर्य व ढाल आहे; परमेश्वर कृपा व गौरव देईल, जे पूर्णपणानें चालतात, त्यांस तो जें कांहीं उत्तम तें द्यावयास नाकारणार नाहीं. १:१-३. ४:३. ५:१२. १५:१-३, ५. ३७:३, ९, १०, १७-२०, २५, २६, २७-४०. ९२:१२-१४. ११२:१-३. उत्प. १९:१५, २२. २ काल. १६:९. नीति ३:३, ४, ३२, ३३. १०:९, २५, २९. ११:१७-२१, ३१. १३:६, २१, २२. १४:३४. १६:८. २०:७. २१:२१. २८:१६, १८. यशा. ३३:१५, १६. ५८:६-८. दान. ३: १८, ३०. ६:२१, २२, २८. मात्थी ६:३३. १तीम. ४:८, ९. ६:६. १पेत्र. ३:१०-१३. (२६९, १३०, ४०९, ५५७, १९६, २७६-७, २९१, ८.)

---

# परलोकींचा दंड.

## ३८२ देवाविरुद्ध पाप करावें हें अतिशय दुष्ट आहे.

१शमु. २:२५. "जर कोणी माणूस माणसाविरुद्ध पाप करितो तर न्यायाधीश त्याचें न्याय ठरवील, परंतु जर कोणी माणूस परमेश्वराविरुद्ध पाप करितो तर त्यासाठीं कोण विनंती करील?" परंतु त्यानीं आपल्या बापाचा बोध ऐकला नाहीं, कां कीं त्यांचा नाश व्हावा असें परमेश्वरानें ठरविलें होतें. गीत ५१:४. तुजविरुद्ध केवळ तुजविरुद्ध म्या पाप केलें आहे, आणि तुझ्या दिसण्यांत हें वाईट केलें आहे, असें कीं तूं आपल्या सांगण्यांत नीतिमान आहेस, आपल्या न्याय करण्यांत निर्दोषी आहेस. उत्प. ३९:९. रोम. ७:१३. (७५, ८१.)

## ३८३ योग्यतेप्रमाणें दंड करणें हा ईश्वराकडला एक हक्क आहे.

गीत ९४:१. हे सूड घेणाऱ्या देवा, हे परमेश्वरा, सूड घेणाऱ्या देवा, तूं प्रकाशित हो. अनु. ३२:३५, ३९-४१. रोम. १२:१९. इब्री. १०:३०.

## ३८४ जे विश्वास धरीत नाहींत त्यांचें तारण ईश्वरी प्रीति व कृपा यांकडून होईल कीं काय?

यशा. २७:११. त्याच्या डाहळ्या सुकतील, तेव्हां लोक तोडतील,

स्त्रिया येऊन त्यांला जाळितील; कां तर हे लोक बुद्धिवान नाहींत, ह्मणून यांचा उत्पन्नकरणारा यांवर दया करणार नाहीं, आणि यांचा निर्माणकर्त्ता यांवर कृपा करणार नाहीं. निर्ग. ३४:६, ७. यहेज्के. ७:९. नहू. १:३. (७५, ३९७, ३९८ (७)

### ३८५ जे पश्चात्ताप करीत नाहींत त्यांस ईश्वर आपल्या भक्तांपासून वेगळे करून आकाशलोकाबाहेर ठेवील.

१करिं. ६:९, १०. अन्यायी यांस देवाच्या राज्यांत वतन मिळणार नाहीं, हें तुह्मास ठाऊक नाहीं काय? फसूं नका; शिंदळ व मूर्त्तिपूजक व व्यभिचारी व स्त्रीसारिखा संभोग देणारे व पुरूषसंभोग घेणारे, व चोर व लोभी व मद्यपी व निंदक व हरण करणारे, यांस देवाच्या राज्यांत वतन मिळणार नाहीं. गीत ११९:१५५. मात्थी ५:२०. ७:२१–२३. १०:३३. १३:३०, ४९. २५:१०–१२, ३१–३३. गल. ५:१९–२१. एफ. ५:५, ६. प्रग. २१:२७. (१०१, १३१, ६८८, ६०१, ८०६.)

### ३८६ ईश्वर दुष्टांस नरकांत टाकील.

गीत ९:१७. जे दुष्ट ते अधोगतींत जातील, ह्मणजे जीं सर्व राष्ट्रें देवाला विसरतात तीं. १:५, ६. ११:६. प्रग. २०:१५. आणि जो कोणी जीवनाच्या पुस्तकांत लिहिलेला सांपडला नाहीं तो अग्नीच्या सरोवरांत टाकिला. १९:२०. ईयो. २१:२०. ३१:३. ३६:१३. मात्थी ३:७, १०–१२. ७:१९, २७. ८:११, १२. १३:४०–४२, ४७–५०. ११:२३, २४. २२:१३. लूक १६:२२–२४. योह. ५:२८, २९. १५:६. १७:१२. (२थेस्स. २:३.) १करिं. १६:२२. फिलि. ३:१८, १९. २थेस्स. २:३, ९–१२. इब्री १०:२६, २७. (२८–३१.) २पेत्र. २:४, ९, १०, १७. ३:७. (८१–२, १३१, ३७०, ६६८.)

### ३८७ परलोकीं दंड होणार हें अक्षय पापावरून सिद्ध होतें.

मात्थी १२:३१, ३२. याकरितां मी तुह्मास सांगतों कीं, सर्व पाप व दुर्भाषणें यांची माणसांस क्षमा होईल, परंतु पवित्र आत्म्याविरूद्ध जें दुर्भाषण याची माणसांस क्षमा होणार नाहीं. आणि मनुष्याच्या पुत्राविरूद्ध कोणी कांहीं गोष्ट बोलेल तर त्याची त्याला क्षमा होईल, परंतु जो कोणी पवित्र आत्म्याविरूद्ध बोलेल त्याला या काळीं क्षमा होणार

नाहीं, आणि येणाऱ्या काळींहि नाहीं. मार्क ३:२८, २९. लूक १२ १०. इब्री १०:२६. १योह. ५:१६.

## ३८८ परलोकीं दंड होईल असें दुसऱ्या मरणावरून सिद्ध होतें.

प्रग. २०:६, १४. पहिल्या पुन्हा उठण्यांत ज्याला भाग आहे, तो धन्य व पवित्र आहे: अशांवर दुसऱ्या मरणाची सत्ता नाहीं, तर ते देवाचे व ख्रिस्ताचे याजक होतील आणि त्याच्या बरोबर हजार वर्षें राज्य करितील. तेव्हां मरण व मृतलोक हीं अग्नीच्या सरोवरांत टाकिलीं: हेंच दुसरें मरण आहे. १५. २:११. २१:८. यहेज्के. १८:३१, ३२. (१३१.)

## ३८९ कोणी अपश्चात्तापी राहून मरण पावतात यावरून परलोकीं दंड होईल असें सिद्ध होतें.

योह. ८:२१. मग येशू त्यांस फिरून ह्मणाला, मी निघून जातों, आणि तुह्मी माझा शोध कराल परंतु आपल्या पापांत मराल: जेथें मी जातों तेथें तुमच्यानें येवत नाहीं. उत्प. १९:२४, २५. लेवी. १०:१, २. गण. १६:२२, ३३. गीत ५८:९. नीति १४:३२. मात्थी २७:५. प्रेषि. ५:५. २पेत्र. २:१२, १३.

## ३९० इहलोकीं कोणी दुष्ट सुख भोगितात व कोणी देवभक्त दुःख भोगितात यावरून परलोकीं दंड होईल असें सिद्ध होतें.

गीत ७३:३. कां तर मी फुशारी करणाऱ्याचा हेवा केला; दुष्टांचें कल्याण मला दिसलें. ४–७, १२. ९२:७. ईयो. १२:६. २१:७–९, ११–१६. इर्म. १२:१, २. मात्थी ६:५. लूक ६:२४–२६. १६:२५. २थेस्स. १:४–८. (४४२, ४०४.)

## ३९१ परलोकींचा दंड होईल असें ऐहिक शिक्षेवरून समजतें.

२पेत्र. २:५, ६. आणि पुरातन जगालाहि राखिलें नाहीं, तर अभ-

कांच्या जगावर प्रळय आणून आठवा माणूस नोहा न्यायीपणाचा उप-
देश करणारा, याला राखिलें; अणखी होणाऱ्या अभक्तांस उदाहरण दे-
ण्यासाठीं सदोम व गमोरा हीं नगरें भस्म करून, अगदीं ओसाडी क-
रितांना त्यांस दंड केला; ४, ७, ९. उत्प. ६:१२, १३. १८:२०, २१.
१९:२४, २५. (२६९, ५९९, ३८१, ८.)

## ३९२ परलोकींचा दंड सर्वकाळीक होईल.

मात्थी २५:४१, ४६. मग डावीकडल्यांसहि तो ह्मणेल, अहो शाप-
ग्रस्तहो, जो सर्वकाळचा अग्नि सैतानासाठीं व त्याच्या दुतांसाठीं तयार
केला आहे त्यांत मजपासून जा. ते तर सर्वकाळच्या शासनांत जा-
तील, आणि नीतिमान सर्वकाळच्या जीवनांत जातील. ४२. मार्क ९:
४३, ४४. १४:२१. (२६:२४.) लूक ३:१७. योह. ३:३६. फिलि.
३:१८, १९. २थेस्स. १:७—९. यहू. ६, ७, १३. प्रग. १४:९—११.
२०:१०. (१३१, ६९१, ४०५—७, ३९७, ३९८, (१) )

## ३९३ परलोकीं दंड होणार नाहीं असें कितीएक ह्मणतात.

उत्प. ३:४. मग साप स्त्रिला बोलला कीं, तुह्मी मरालच मराल,
असें नव्हे. अनु. २९:१९. यहेज्के. १३:२२. २पेत्र. ३:५—७.
(३७१, ७३५.)

## ३९४ दुष्ट हे सर्वदा दंडाकडून शुद्ध होत नाहींत.

नीति २७:२२. जरी मूर्खाला गव्हांबरोबर उखळांत मुसळानें कु-
टिलें, तरी त्याची मूर्खता त्यापासून जाणार नाहीं. प्रग. १६:९—११,
२१. (६७७.)

## ३९५ ईश्वर आपल्या गौरवासाठीं दुष्टांस योग्य दंड करितो.

गीत ८३:१७, १८. सदासर्वकाळ त्यानीं लज्जा पावून घाबरे व्हावें;
त्यांनीं लाजावें आणि नाश पावावा. जाणावें कीं तूं केवळ तुझेंच नाम
परमेश्वर, संपूर्ण पृथ्वीवर परात्पर आहेस. निर्ग. ९:१५, १६. १४:४.
यहेज्के. २५:१७. रोम. ९:१७, २२—२४. (५२, १८९.)

## ३९६ दुष्टांस दंड प्राप्त व्हावा हें देवभक्तांस योग्य दिसतें.

प्रग. १९:१,२. आणि त्यानंतर आकाशांत मोठ्या समुदायाची मोठी वाणी ऱ्या असी ऐकिली कीं, हालेलुया, प्रभु आमचा देव, यास तारण व गौरव व मान व पराक्रम असो. का कीं त्याचे न्याय खरे व नीतीचे, कारण कीं ज्या मोठ्या कळवांतिणीनें आपल्या व्यभिचाराकडून पृथ्वी नासिली, तिजवर त्यानें न्याय ठरविला आहे, आणि तिच्या हाताकडील जें त्याच्या दासांचे रक्त त्याचा सूड घेतला आहे. ३–७.६:९,१०.१५: ३,४. १८:२०. निर्ग. १५:१,६,७. गीत २८:४,५. ९४:१,२. लूक २३:४०,४१. (२७०,८२.)

## ३९७ परलोकीं ईश्वराचा धावा करावा हें व्यर्थ होईल.

लूक १३:२५. घरधन्यानें उठून दार बंद केल्यावर तुह्मी बाहेर उभे राहून व दारावर ठोकून बोलूं लागला कीं, रे प्रभू प्रभू, आह्मासाठीं उघड: मग तो तुह्मास उत्तर देईल कीं, तुह्मी कोठले आहां, मी तुह्मास ओळखत नाहीं. १६:२४–२६. इयो. २७:८,९. नीति १:२४–३२. (६९१,४०५–७,३८४,३९२.)

## ३९८ परलोकदुःखाचे प्रकार.

### १. पूर्ण निराशा.

इयो. ८:१३. जे देवाला विसरतात त्या सर्वांचे मार्ग तसेच आहेत, आणि अधार्मिकाची आशा नष्ट होईल. ११:२०. नीति १०:२८.११: ७. विल. ३:६४,६५. यहेज्के. २२:१४. (६९१,३९२.)

### २. चुरचुराट.

नीति ५:११ आणि तो आपल्या अंतकाळीं आपलें मांस व आपलें शरीर नष्ट झाल्यावर शोक करीत. ११–१४. इर्म. ८:२०. लूक. १६: २५. (६५५,६५८.)

### ३. अशांत असणें.

यशा. ५७:२०,२१. परंतु दुष्ट खवळलेल्या समुद्रासारिखे आहेत, का

तर त्याच्याने स्वस्थ राहवत नाहीं, आणि त्याचीं पाण्यें मळ व रेव घालवितात. दुष्टांस कांहीं शांति नाहीं, असें माझा देव ह्मणतो. गीत ९५:११. (इब्री. ३:१८.) प्रग. १४:११.

## ४. देवभक्तांत उल्हासता पाहून त्यांपासून दूर जाऊन पिडा सोसणें.

लूक. १३:२८. आब्राम व इझाक व याकोब व सर्व भविष्यवादी यांस देवाच्या राज्यांत असतांना आणि आपणांस बाहेर टाकलेले, असें पाहाल तेव्हां रडणें व दांतखाणें होईल. १६:२३. योह. ७:३४. प्रग. १४:१०. (६८८.)

## ५. अंधार व उदासीनता.

मात्थी ८:१२. परंतु राज्यांतील पुत्र बाहेरच्या अंधारांत पडतील, तेथें रडणें व दांत खाणें होईल. इर्म. १३:१६. जफ. १:१५. २ पेत्र. २:१७. यहु. १२,१३.

## ६. धास्ती व घोर.

गीत ७३:१९. क्षणांत त्यांची ओसाडी कसी झाली? उत्पातांनी ते झाडून टाकिले, नाहींसे झाले. इयो. ६:४. नीति १०:२४. २करिं ५:११. प्रग. ६:१६.

## ७. सार्वलौकिक अवज्ञा व उपहास सर्वकाळ भोगणें.

गीत २:४,५. जो आकाशांत बसलेला, तो हांसेल; प्रभु त्याचा उपहास करील. तेव्हां तो आपल्या रागाने त्यांस बोलेल, आणि आपल्या संतापानें त्यांस घाबरे करील. ५२:१,५,६. ५९:७,८. इयो. २२:१५,१६,१९.. नीति १:२६,२७. ३:३४. दानी. १२:२. (४३७.)

## ८. अग्नीकडून दैहिक पीडा.

लूक १६:२४. मग तो हाक मारून बोलला, हे बापा आब्राहामा, मजवर दया कर, आणि लाजारसानें आपल्या बोटाचें अग्र पाण्यांत बुचकळून माझी जिभ थंड करावी ह्मणून त्याला पाठीव, कां तर या जाळांत मी क्लेशित आहें. यशा. ३३:१४. (३७०.)

### ३९९ दुष्टांचा इहलोकींचा व परलोकींचा मानभंग.

तित. ३:३. कां तर आह्मीहि अगोदर अज्ञानी, अमानिते, भ्रांत, बहुत प्रकारच्या इच्छा व विलास यांच्या स्वाधीन राहणारे, दुष्टाई व हेवा यांमध्यें चालणारे, द्वेषपात्र, एकमेकांचा द्वेष करणारे असे होतों. प्रग. २२:१५.(४३७.)

## परीक्षा.

### ४०० परीक्षा मनुष्यमात्रांस लागतात.

उत्प. २२:१,२. आणि या गोष्टींनंतर असें झालें कीं देवानें आब्रामाची परीक्षा घेतली, तेव्हां त्याला ह्मटलें, हे आब्राहामा, मग हा बोलला, मी एथें आहें. आणि तो बोलला, आतां तुझा पुत्र तुझा एकुलता, ज्यावर तूं प्रीति करितोस ह्मणजे इझाक, त्याला तूं घेऊन आपण मोरिया देशास जा, आणि तेथील डोंगरांमधील एक जो मी तुला सांगेन त्यावर त्याला होमरूप समर्पण कर. गल. ४:१४. इब्री. ४:१५. याक. १:२,३.

### ४०१ परीक्षा पापमोहाच्या अर्थी देवापासून नाहीं.

याक. १:१३,१४. कोणी परीक्षेंत पडला असतां, मी देवाकडून परीक्षेंत पडलों, असें त्यानें ह्मणूं नये, कां तर वाईट गोष्टींनी देवाची परीक्षा होत नाहीं, आणि तो कोणालाहि परीक्षेंत पाडीत नाहीं. तर प्रत्येक आपल्या इच्छेनें ओढलेला व भुलविलेला होऊन परीक्षेंत पडतो (१४२.)

### ४०२ परीक्षा व मोहक यांविरुद्ध प्रार्थना करणें व सावध राहणें भाग आहे.

मात्थी २६:४१. तुह्मी परीक्षेंत येऊं नये ह्मणून जागे राहा व प्रार्थना करा: आत्मा तयार आहे खरा, परंतु देह अशक्त. ६:१३. नीति १:१०–१६. (३२९,६८३.)

### ४०३ विश्वासणाऱ्यांस सर्व परीक्षांत साह्य होईल; वचनें.

१ करिं. १०:१३. जी मनुष्यांची होत असती तिजपेक्षां निराळी

तुमची परीक्षा झाली नाहीं; आणि देव विश्वासू, तो तुमची परीक्षा तुमच्या शक्तीपेक्षां अधिक होऊं देणार नाहीं, तर परीक्षेच्या प्रसंगीं निभावण्याचाहि उपाय करील, असा कीं तुह्मी ती सहन करायास समर्थ व्हावें. गीत ७१:२०. १३८:७. इब्री. २:१८. २ पेत्र. २:९. प्रग. ३:१०. (६७१–४.)

# परीक्षाकाल.

## ४०४ इहलोकीं पूर्ण प्रतिफळ प्राप्त नाहीं.

उपदे. ८:११. दुष्कर्माचा निर्णय होऊनहि लवकर सिद्धीस जात नाहीं, याकरितां मनुष्यांचें हृदय त्यांच्या ठायीं वाईट करायाला तत्पर असतें. ९:१,२. गीत १०३:१०. (३९०.)

## ४०५ परीक्षाकाळ इहलोकींचा आहे. तो अतिशय मोलवान.

उपदे. ९:१०. जें कांहीं करायाला तुझ्या हाताला प्राप्त होतें, तें तूं आपल्या पराक्रमानें कर; कां कीं ज्याकडे तूं जात आहेस, त्या मृतलोकांत कांहीं कर्म अथवा संकल्प अथवा विद्या अथवा ज्ञान नाहीं. नीति १:२४–२८. यशा. ५५:६. इर्म. ८:२०. जख. ९:१२. मात्थी २५:१०–१२. २ करिं. ६:२. (६९१,३९७,६१८.)

## ४०६ परीक्षाकाळ आहे यावरून जीवात्म्याची हानी पावण्याचें भय दिसून येतें.

१ पेत्र. ४:१७,१८. कां तर न्याय करण्याचा प्रारंभ देवाच्या घरीं व्हावा, असी वेळ आहे, आणि जर प्रारंभ आह्मापासून तर जे देवाच्या शुभवर्त्तमानाला मानीत नाहींत त्यांचा परिणाम काय होईल. आणि जर न्यायी कष्टानें तरतो तर अभक्त व पापी याला ठिकाण कोठें होईल. मात्थी ५:२२. १६:२५,२६. (लूक ९:२४.) मार्क. ९:४३–४८. (मात्थी १८:८. लूक १२:४,५. १३:२३,२४. (मात्थी १०:२८.) इब्री. ४:१. (३८८.)

## ४०७ परीक्षाकाळांतल्या कर्मांवरून परलोकावस्था ठरती.

गल. ६:७,८. फसूं नका, देवाची थट्टा होत नाहीं, कां तर माणूस

जें पेरितो तेंच पीक पावेल. ह्मणजे जो आपल्या देहासाठीं पेरितो तो देहावरून नाश असें पीक पावेल, परंतु जो आत्म्यासाठीं पेरितो तो आत्म्यावरून सर्वकाळचें जीवन असें पीक पावेल. १ काल. २८:९. नीति १:२९–३२. ८:३६. ९:१२. ११:१९. मात्थी ५:२५,२६. ७:१३,१४. मार्क. १६:१६. रोम. २:५–१०. प्रग. २२:१९. (३९२. मात्थी २५. लूक १९:२०–२७.)

## ४०८ परीक्षाकाळांतल्या वर्त्तणुकीप्रमाणें फळ व दंड प्राप्त होतील.

प्रग. २२:१२. तर पाहा, मी लवकर येतों, आणि माझें वेतन माझ्या जवळ आहे, यासाठीं कीं जसें प्रत्येकाचें काम होईल तसें त्याला भरून द्यावें. इयो. ३४:११. गीत ६२:१२. नीति २४:१२. यशा. ३:१०:११. इर्म. १७:१०. ३२:१९. मात्थी ५:१९. १६:२७. लूक १९:१६–१९. गल. ६:७,८. (७६,७७.)

# पवित्रता.

## ४०९ पवित्रता जातीनें अमोल्य आहे.

नीति ३:१३–१८. ज्या मनुष्याला ज्ञान सांपडलें, आणि जो मनुष्य विवेक पावला आहे, तो धन्य. का कीं त्याची प्राप्ति रुप्याच्या प्राप्तीपेक्षां आणि त्याचा लाभ उत्कृष्ट सोन्यापेक्षां उत्तम आहे. तें माणिकापेक्षां मोलवान आहे, आणि जे सर्व पदार्थ तुला इष्ट असतात ते त्यासीं बरोबरी करायाजोगे नाहींत. त्याच्या उजव्या हातांत दीर्घायुष्य आणि त्याच्या डाव्या हातांत धन व गौरव आहे. त्याचे मार्ग आनंदाचे मार्ग, आणि त्याच्या सर्व वाटा कुशल आहेत. जे तें धरितात, त्यांला तें जीवनाचें झाड आहे, जे तें बाळगतात, ते प्रत्येक धन्य आहेत. ४:७–९. ८:११. इयो. २८:१२–१५,१८,१९,२८. (३८१.)

# पवित्र आत्मा.

## ४१० पवित्रात्म्याचें व्यक्तिपण.

१ योह. ५:७. कारण कीं आकाशांत तिघे साक्ष देणारे, बाप शब्द

व पवित्र आत्मा, असे आहेत; आणि हे तिघे एक आहेत. मात्थी २८: १९. लूक ३:२२. योह. १४:१६. २ करिं. १३:१४. एफ. २:१८. १ पेत्र. १:२.

## ४११ पवित्र आत्म्याचे ईश्वरी गुण.

१ करिं. २:१०,११. तर देवानें आपल्या आत्म्याकडून आह्मास प्रगट करून दाखविल्या आहेत; कां तर आत्मा हा सर्व गोष्टींचा, देवाच्या खोल गोष्टींचाहि, शोध करितो. कां कीं मनुष्याचा जो आत्मा त्यामध्यें आहे, त्याशिवाय मनुष्याच्या गोष्टी मनुष्यांतील दुसरा कोण जाणतो? तसें देवाच्या गोष्टी देवाच्या आत्म्याशिवाय कोणीहि जाणत नाहीं. १२:३ मीख. २:७. योह. १४:२६. प्रेषि. ५:३,४. रोम. १५:१९. इब्री. ९:१४ (२५८,५४.)

## ४१२ पवित्रात्म्याचे हृद्याचे काम.

### १ पाप्यांची झोंपमोड व खातरी करणें.

योह. १६:७,८. परंतु मी खरी गोष्ट तुह्मास सांगतों; म्या जावें हें तुह्मास उपयोगी आहे, कारण कीं मी न गेलों तर संबोधक तुह्माकडे येणार नाहीं, मी गेलों तर त्याला तुह्माकडे पाठवीन. आणि तो येऊन पापाविषयीं व न्यायीपणाविषयीं व न्यायी ठरविण्याविषयीं जगाची खातरी करील. उत्प. ६:३. इयो. ३६:९,१०.

### २. अमनुष्य गुण व चमत्कार करण्याची शक्ति देणें.

प्रेषि. २:४. तेव्हां ते अवघे पवित्र आत्म्यानें पूर्ण झाले, आणि आत्म्यानें जसी त्यांस उच्चार करण्याविषयीं शक्ति दिल्ही तसे ते दुसदुसऱ्या भाषानीं बोलूं लागले. १०:४५,४६. ११:१५. १ शमु. १०:१०. लूक १:६७.

### ३. देव व त्याचे भक्त यांच्या मारफतीने पाप्यांविरुद्ध साक्ष पटविण्यास खरेपण प्रगट करणें.

योह. १४:२६. परंतु ज्याला बाप माझ्या नांवानें पाठवील, तो संबोधक ह्मणजे पवित्र आत्मा, तुह्मास सर्व शिकवितील, आणि ज्या गोष्टी म्या तुह्मास सांगितल्या त्या सर्वांची तुह्मास आठवण करील. अनु. ३१: १९. नहे. ९:२०. मात्थी २४:१४. लूक २:२६. १ रै. ११,१२. प्रेषि. ११:२८. १ योह. ५:८,९. (४१६.)

४. देवभक्त ईश्वराचीं खरीं लेंकरें असीं साक्ष पटवि-
ण्यास त्याच्याठायीं पवित्र भावना उत्पन्न करणें.

रोम. ८:१४–१६. कां कीं जितक्यांस देवाचा आत्मा चालवितो, ते सर्व देवाचे पुत्र आहेत. तुह्मी तर पुन्हां भ्यावें असा दासपणाचा आत्मा पावलां नाहीं; पण जेणेंकरून आपण आब्बा, बापा, असी हाक मारितों, तो दत्तपुत्रपणाचा आत्मा, पावलां आहां. तो आत्मा स्वतां आमच्या आत्म्यासीं साक्ष देतो कीं, आह्मी देवाचीं लेंकरें आहों. योह. १४:१६,१७. १६:१३. गल. ४:६. इब्री. १०:१५,१६. १ योह. २:५. ३:२४. ५:१०. (४४५–७,४४९.)

५ गौरवाच्या वतनदारांस शिक्का मारणें.

एफ. ४:३० आणि देवाच्या ज्या पवित्र आत्म्याकडून तुह्मास खंडून घेण्याच्या दिवसांसाठीं शिक्का मारिला आहे, त्याला खेद देऊं नको. (३१२.)

४१३ पवित्रात्म्याविरुद्ध पाप करण्याचा दोष व भय.

इब्री. १०:२८,२९. ज्या कोणीएकानें मोश्याचें नेमशास्त्र अव्हेरिलें तो दया न पावतां दोन किंवा तीन साक्षीदारांवरून मरण पावत असे. तर देवाच्या पुत्राला तुडविलें, आणि कराराच्या ज्या रक्तेंकरून तो पवित्र झाला तें सामान्य मोजिलें, आणि कृपेच्या आत्म्याचा अपमान केला, तो किती अधिक कठीण दंडास योग्य ठरेल ह्मणून तुह्मास वाटतें? यशा. ६३:१०. मात्थी १२:३१,३२. प्रेषि. ७:५१. एफ. ४:३०. १ थेस्स. ५:१९. (६३८.)

४१४ पवित्रात्मा हट्टखोर पाप्यांस सोडून नाशास जाऊं देतो.

रोम. १:२८. अणखी देवाला आपल्या ध्यानांत ठेवावें हें त्यांस आवडलें नाहीं, ह्मणून देवानें त्यांस सोडून अयोग्य कामें करायास नाकारलेल्या मनाच्या स्वाधीन होऊं दिल्हें. २४–२६. उत्प. ६:३. गीत ८१: ११–१५. यशा. ५५:६. होशे. ५:६. ९:१२.

४१५ विश्वासणाऱ्यांस पवित्रात्मा येण्याचें वचन.

योह. १४:१६,१७. मग मी बापाला विनंती करीन, ह्मणजे तुह्माव-

रोबर सर्वकाळ राहील असा दुसरा संबोधक तो तुह्मास देईल. तो खरेपणाचा आत्मा आहे, त्याला जगाच्याने घेववत नाहीं, का कीं तें त्याला पाहत नाहीं व त्याला जाणत नाहीं, परंतु तुह्मी त्याला जाणतां, का कीं तो तुह्माबरोबर राहतो व तुह्मामध्यें असेल. लूक. ११:१३. २ करिं. १:२१,२२.

# पवित्रशास्त्र.

## ४१६ पवित्रशास्त्र हें ईश्वरप्रणीत आहे.

२ तीम. ३:१६,१७. संपूर्ण शास्त्र देवाच्या प्रेरणेनें झालें, आणि उपदेश निषेध, सुधारणूक, न्यायीपणाचें शिकविणें, यांसाठीं उपयोगी. देवाचा माणूस निपूण व सर्व चांगल्या कामांस तयार व्हावा ह्मणून. २ शमु. २३:१,२. २राजे. १७:१३. २ काल. ३४:२१. ३६:२१. नहे. ९:३०. इर्म. १:९. ३६:१,२ जख. ७:१२. लूक. १:७०. प्रेषि. १:१६. ३:१८. २८:२५. रोम. ३:२. (१ पेत्र. ४:११.) १ करिं. २:१२,१३. गल. १:११,१२. १ थेस्स २:१३. इब्री. १:१,२, २ पेत्र. १:१८–२१.

## ४१७ पवित्रशास्त्र ही ईश्वराची अपालट सत्यता आहे.

यशा. ४०:८. गवत कोमतें, फूल गळतें; परंतु आमच्या देवाची गोष्ट सर्वकाळ टिकेल. २५:१. गीत १९:९. ९३:५. ११९:१४२.

## ४१८ पवित्रशास्त्र पूर्ण होईल.

मात्थी ५:१७,१८. नेमशास्त्र किंवा भविष्यशास्त्र रद्द करावयास मी आलों असें समजूं नका; मी रद्द करावयास नाहीं, तर पूर्ण करावयास आलों आहे. कारण कीं मी तुह्मास खचीत सांगतों, आकाश व पृथ्वी टळून जाई तोंवर सर्व पूर्ण झाल्यावांचून नेमशास्त्रांतील एक काना किंवा फाटाहि टळून जाणारच नाहीं. २४:३५. लूक. १६:१७. २४:४४. योह. १०:३५. प्रेषि. १:१६. ३:१८. (१२८.)

## ४१९ पवित्रशास्त्र चमत्कारांकडून खरें पटलें.

मार्क. १६:२०. नंतर ते निघून सर्व ठिकाणीं गाजवूं लागले, आणि प्रभु त्यांबरोबर कार्य करीत असतां जे चमत्कार त्यांच्याजवळ राहिले त्यांकडून वचनाला प्रमाण पटवीत गेला. आमेन. निर्ग. ४:४,५. १४:

३१. १९:९. १ राजे. १८:३८,३९. योह. ३:१२. प्रेषि. ८:६. १४:३. इब्री. २:४. (२५९.)

## ४२० पवित्रशास्त्र भविष्य वचनांकडून खरें पटलें आहे.

जख. ११:१२,१३. आणि म्या त्यास ह्मटलें, जर तुह्माला बरें वाटलें, तर माझें मोल मला द्या; नाहीं तर देऊं नका. मग त्यांनी माझें मोल तीस रुपये तोलिलें. तेव्हा परमेश्वराने मला ह्मटलें, तें कुंभाराकडे टाकून दे; ज्या मोलाने मी त्याकडून गणलेला होतों, तें मोठें योग्य आहे खरें. मग म्या ते तीस रुपये घेऊन परमेश्वराच्या घरांत कुंभाराकडे टाकून दिल्हे. उत्प. ४९:१०. गीत १६:१०. यशा. ७:१४. ३५:३–६. ५३:१३,१७–२२. १४:२२,२३. ४७:४५:१–३. इर्म. ५०:२३–४०. ५१:३०–४४. यहेज्के. २६:७–११. २९:१८–२०. दानी. २:३१–३५. दानी. ७:२४–२५. ७:८:९:१०:११:१२: सगळा अध्याय. नेहू. २:३. जफ. २:१३–१५. मात्थी २४:१,२,१५,१६,२१. लूक. १९:४३,४४. २ थेस्स. २:३,४.

## ४२१ पवित्रशास्त्र आंतल्या प्रमाणांवरून खरें पटलें.

### १. मानवी बुद्धि व समज यांच्या पलिकडच्या प्रगटलेल्या गोष्टीकडून.

१ करिं. १५:३५. परंतु कोणी ह्मणेल कीं, मेलेले कसे उठतात, आणि कोण या प्रकारच्या शरिराने येतात? ४४. उत्प. १:१. गीत १९:१२. ४९:११. नीति १६:४. यशा ४०:१७. इर्म. १७:९. २तीम. १:१०. २ पेत्र. ३:१०. १ योह. ४:८. ५:७. प्रग. २०:११. २२:१६.

### २. त्यांतील पवित्र आज्ञावरून.

गीत ११९:७–९. तुझ्या नीतिचे न्याय शिकल्यावर मी सरळ हृदयाने तुझी स्तुति करीन. मी तुझे नेम पाळीन, तूं मला अगदी सोडूं नको. नव्या तरुणाने आपला मार्ग कशाने निर्मळ राखावा? तर तुझ्या वाक्याप्रमाणें संभाळण्याने. नीति ३०:५. (४२३,१२९.)

## ४२२ पवित्रशास्त्र हें विश्वास व आचरण यांचें एवढेंच परिमाण आहे.

यशा. ८:२०. नेमशास्त्र व विधान या वचनाप्रमाणें जर ते बोलत

नाहींत, तर हेंच कारण, कीं त्यांच्या मनांत कांहीं प्रकाश नाहीं. मात्थी १५:३–६. मार्क. ७:७–९. योह. १२:४८. रोम. २:१६. २करिं.१०: १२. कल. २:८.

## ४२३ पवित्रशास्त्र हा सद्गुण वाढण्याचा खरा उपाय आहे.

रोम. १:१६. कां तर ख्रीस्ताच्या शुभवर्त्तमानाविषयीं मी लाजत नाहीं; कारण कीं अगोदर यहूदी, नंतर हेल्लेणी, अस्या प्रत्येक विश्वासणाऱ्याच्या तारणासाठीं तें देवाचें सामर्थ्य असें आहे. १०:१७. गीत १९: ७. ११९:९३. योह. १५:३. १७:१७,१९. एफ. ६:१७. २तीम. ३: १५. याक. १:१८,२१. १पेत्र. १:२३. (६५९–६३)

## ४२४ पवित्रशास्त्राचा अभ्यास व मनन केलें पाहिजे.

योह. ५:३९. शास्त्र शोधून पाहा, कां कीं त्याकडून सर्वकाळचें जीवन तुह्मास मिळेल असें तुह्मी समजतां, आणि मजविषयीं साक्ष देणारें तेंच आहे. अनु. ११:१८–२१. यहोशु. १:८. गीत १:१,२. नीति ४:१३,२०–२२. मात्थी २२:२९. प्रेषि. १७:११. रोम. १५:४. १थेस्स. ५:२७. इब्री. २:१. १पेत्र. २:२. प्रग. १:३. (गीत १९. आणि ११९.) (१५२,१८४,१४.)

## ४२५ पवित्रशास्त्र हें लिहिलेलें प्रगटविणें व समजण्यासारिखें आहे.

अनु. ९:१०. आणि धोंड्यांच्या दोन पाट्या, देवाच्या बोटानें लिहिलेल्या परमेश्वरानें मला दिल्या, आणि मंडळीच्या दिवसीं डोंगरांवर ज्या गोष्टी परमेश्वरानें तुमच्याजवळ अग्नींतून सांगितल्या, त्या अवघ्यांप्रमाणें त्यांवर होतें. गीत १०२:१८. ११९:१०५,१३०. २पेत्र. १:१८,१९.

## ४२६ पवित्रशास्त्राचा फेरफार व विपरीत अर्थ करणें हें पाप मोठें व नाशकारक आहे.

प्रग. २२:१८,१९. तर जो या पुस्तकांतील भविष्यवादाचीं वचनें ऐकतो त्या प्रत्येकाला मी साक्ष देतों कीं, जर कोणी तीं वाढवील, तर त्याजवर देव या पुस्तकांत लिहिलेल्या पटक्या पाठवील. आणि जर को-

णी या भविष्य पुस्तकांतील वचनांतून कांहीं काढील, तर देव त्याचा भाग जीवनाच्या पुस्तकांतून व पवित्र नगरांतून व या पुस्तकांत जीं लिहिलेलीं त्यांतून काढील. अनु. ४:२. नीति ३०:६. २ पेत्र. ३:१५,१६. (१२८.)

## ४२७ पवित्रशास्त्र सगळें उपयोगाचें व अगत्याचें आहे.

अनु. २९:२९. ज्या गोष्टी गुप्त ठेवलेल्या, त्या आमचा देव परमेश्वर याच्या आहेत, परंतु ज्या उघड्या केलेल्या, त्या आमच्या व आमच्या संतानांच्या सर्वकाळ आहेत; झणजे आह्मी या शास्त्रांतल्या सर्व गोष्टी पाळाव्या. २ तीम. ३:१६,१७. (४२३,१५२,६६४.)

# पश्चात्ताप.

## ४२८ खरा पश्चात्ताप कसा आहे.

२ करिं. ७:९,१०. तरी आतां मी आनंद करितों, तुह्मास खेद झाला यावरून नव्हे, तर पश्चात्ताप होण्याजोगा तुह्मास खेद झाला यावरून; कां कीं तुह्मास देवसंबंधी खेद झाला, यासाठीं कीं आह्माकडून कोणत्याहि गोष्टीविषयीं तुमची हानि घडूं नये. कारण कीं देवसंबंधी खेद हा पस्तावा होण्याजोगा नाहीं असा पश्चात्ताप तारण होण्यासाठीं घडवितो, परंतु जगसंबंधी खेद मरण घडवितो. इयो. ४२:५,६. गीत ३८: ३–१०,१८. ५१:३,४,१७. ११९:५९,६०. यहेज्के. ३६:३१. (२०: २४.) मात्थी २६:७५. लूक १५:१८,१९. १८:१३. (५०२,४३८, ३६८–९.)

## ४२९ खरा पश्चात्ताप करण्याचा थोरपणा.

यशा. ५७:१५. तर उंच व थोरावलेला जो सर्वकाळची वस्ती करितो, ज्याचें नाम पवित्र आहे, तो असें झणतो कीं, मी उंच व पवित्रस्थानांत वसतों, आणि चेंचरलेल्या व नम्र आत्म्याच्या जनासींहि वसतों, नम्रांच्या आत्म्याला जीव आणायाला आणि चेंचरलेल्यांच्या हृदयाला जीव आणायास. लूक. १५:७,२१,२२. (३५७.)

## ४३० पश्चात्तापाचीं फळें.

२ करिं. ७:११. कारण कीं पाहा, त्याच गोष्टीनें ह्मणजे तुह्मास देवसंबंधीं खेद झाला त्यानें तुह्मास केवढी काळजी व दोष घालविणें व संताप व भय व उत्कंठा व आवेश व न्याय करणें उत्पन्न झालें. या कामांत तुह्मी आपणास सर्व प्रकारें निर्दोष असें दाखविलें. (४५३,६८०.)

## ४३१ पश्चात्तापाचें अगत्य.

लूक. १३:३ मी तुह्मास सांगतों, नव्हतें, परंतु जर तुह्मी पश्चात्ताप करीत नाहीं तर त्याप्रमाणें तुह्मी सर्व नाश पावाल. यहेज्के. १४:६. १८:३०. मात्थी ३:१. ४:१७. प्रेषि. २:३८. ३:१९. ८:२२. १७:३०. २०:२१. २६:२०. प्रग. २:५ (मार्क. ६:१२.) (३६९,४५२.)

## ४३२ पश्चात्ताप करण्यास आश्वासन-वचनें.

यशा. ५५:७. दुष्ट आपल्या मार्गास, व अन्यायी मनुष्य आपल्या संकल्पास सोडो, आणि परमेश्वराकडे फिरो, ह्मणजे तो त्याजवर दया करील, आणि आमच्या देवाकडे फिरो, का कीं तो फार क्षमा करील. ६६:२. २ काल. ७:१४. गीत ३४:१८. ५१:१७. १४७:३. होशे. ६:१-३. योएल. २:१२,१३. जख. १:३. मात्थी ५:३,४. लूक. १५:२१-२३. (३६९.)

## ४३३ ईश्वर पश्चात्ताप करितो ह्मणून कसें आहे.

यहेज्के. ३३:१४,१५. आणि तूं निश्चयें मरसील, असें जेव्हां मी दुष्टाला ह्मणतों, तेव्हां जर तो आपल्या पापापासून फिरेल, आणि नीति व न्याय करील. जर दुष्ट गहाण परत देईल, आणि जे हरिलेलें तें परत भरून देईल, अन्याय केल्यावांचून जिवाच्या नियमाप्रमाणें वर्त्तेल, तर तो वांचेलच वांचेल तो मरणार नाहीं. उत्प. ६:६. इर्म. १८:७-१०. २६:२,३,१३. योना. ३:१०.

## ४३४ खोटा पश्चात्ताप.

मात्थी २७:३. तेव्हां तो दंडास योग्य ठरला असें पाहून, त्याला पराधीन करणारा यहूदा यानें पस्तावून आणि मुख्य याजक व वडील याजवळ तीस रुपये परत देऊन ह्मटलें. ४,५. २ करिं. ७:१०. (६१६-२०१. ३६०,६८३,७१६.)

## पाठलाग.

### ४३५ नीतिमानांचा पाठलाग व निंदा होत असतात.

नहे. ४:४. हे आमच्या देवा ऐक, कां कीं आह्मी धिक्कारलेले झालों आहों, त्यांची निंदा त्यांच्या डोक्यावर फिरीव, आणि ते पाडावपणाच्या देशांत हरणार्थ होत असें कर. ईयो. १६:१०. गीत १४:४. २२: ६—८. ३१:११—१३ ४२:१०. ४४:२२. ६४:२—४. ६९:४,७—१०: १९, २०. ७९:४. ८९:५०,५१. १०२:८. दान. ७:२५. योह. १०, २०. इब्री ११:३६—३८. प्रग. ७:१४. (२५०,२६८,१९३,२९६.)

### ४३६ परमार्थामुळें ज्यांचा पाठलाग होतो ते शेवटीं विजय पावतील.

मात्थी ५:१०—१२. न्यायीपणामुळें ज्यांच्या पाठीस लागतात ते धन्य; कारण कीं आकाशाचें राज्य त्यांचें आहे. जेव्हां तुमची निंदा करितील आणि पाठीस लागतील आणि माझ्या करितां तुह्माविरूद्ध सर्व वाईट गोष्टी लबाडी करून बोलतील तेव्हां तुह्मी धन्य आहां. आनंद व उल्हास करा, कारण कीं आकाशामध्यें तुह्माकरितां मोठें फळ आहे, कां तर तुमच्या पूर्वींचे जे भविष्यवादी, त्यांच्या पाठीस तसेच लागत असत. गीत ६४:१०. ६८:१३. रोम ८:१७, १८. २तीम. २: १२. १पेत्र. ४:१२—१४. प्रग. १५:३. (६७२,२२.)

### ४३७ पाठलाग करणाऱ्यांस ईश्वर नीच करील.

२थेस्स. १:७,८. कां तर अधर्माचें गूज आतां चाललें आहे, केवळ सध्यां अडविणारा तो दूर होई तोंपर्यंत अडवील: आणि त्यानंतर अधर्मी प्रगट होईल, त्याला प्रभु आपल्या मुखांतील श्वासानें नष्ट करील, आणि आपल्या येण्याच्या तेजानें नाहींसें करील. ४—६. गीत ३७: १२—१५. ४७:३. यशा. ४१:११, (१२.) ५१:७, ८. ५४:१७. ६०: १४. ६६:५. इर्म. २०:११. मीख. ७:९, १०. मल. ४:२, ३. रोम. १६:२०. प्रग. ३:९. १८:२०. १९:३. (२६९, ३१९,२७६,३९८(७,)

## पाप कबूल करण्याचा धर्म.

### ४३८ पाप कबूल करावें—आश्वासन.

नीति २८:१३. जो आपलीं पातकें झांकितो तो कल्याण पावणार

नाहीं, परंतु जो पाप अंगीकारून सोडितो तो दया पावेल. लेवी. २६: ४०–४२. दान. ९:२०, २१. होशे. ५:१४, १५. याक. ५:१६. १ योह. १:८, ९. (४७४, ४२८.)

## पुनर्जन्म आणि शुद्ध होणें.

### ४३९ ईश्वर आह्मास शुद्ध करायास व पापापासून राखायास समर्थ आहे.

२ करिं. ९:८. आणि देव सर्व प्रकारची कृपा तुह्मावर वाढविण्यास शक्तिमान आहे; असा कीं तुह्मास सर्व गोष्टींत संपूर्ण पुरवठा सर्वदा असतां, तुह्मी प्रत्येक चांगल्या कामांत अधिकाधिक तत्पर असावें. गीत ११०:३. यहेज्के. ३६:२६. मीख. २:७. एफ. १:१८–२०. ३:२०, २१. यहू. २४, २५. (६३, ७९.)

### ४४० पुनर्जन्माचें अगत्य.

योह. ३:३. येशूनें त्याला उत्तर दिल्हें कीं, मी तुला खचीत खचीत सांगतों, पुन्हा जन्मल्यावांचून कोणाच्यानेंहि देवाचें राज्य पाहवत नाहीं. ५, ७. गीत ५०:१६. यशा. १:११–१५. आमो. ५:२१–२३. मात्थी १५:७, ८. १८:३. २३:२५, २६. इब्री. ११:६. (५११, ४८३, ७१५–१६.)

### ४४१ पुनर्जन्माच्यापूर्वीं पश्चात्ताप केला पाहिजे व खोटी आशा सोडली पाहिजे.

प्रेषि. २:३७. हें ऐकून ते अंतःकरणांत वरमले, आणि पेत्रसाला व इतर प्रेषितांस ह्मणाले, अहो भावानो, आह्मी काय करावें? रोम. ७: ९–११. (३६८.)

### ४४२ पुनर्जन्म हा मोठा पालट आहे.

यहेज्के. ३६:२६. आणि मी तुह्माला नवें हृदय देईन आणि नवा आत्मा तुह्मामध्यें घालीन; आणि मी तुमचें दगडाचें हृदय तुमच्या देहांतून दूर करून तुह्माला मासाचें हृदय देईन. रोम. २:२८, २९. २ करिं. ५:१७. गल. ५:२४. ६:१५. (३३०.)

## ४४३ पुनर्जन्म हा अंतःकरणाचा पालट आहे.

योह. ३:६. जें देहापासून जन्मलें तें देह आहे, आणि जें आत्म्यापासून जन्मलें तें आत्मा आहे. गल. ५:२२. एफ. ४:२२, २३. १योह. ४:७. (१, ४५१.).

## ४४४ पुनर्जन्म पाप्यांस भयकारक.

प्रेषि. २:४१–४३. तेव्हां ज्यांनी आनंदाने त्याची गोष्ट घेतली त्यांचा बाप्तिस्मा झाला, आणि त्या दिवसीं सुमारें तीन हजार माणसें त्यांकडे झालीं. आणि प्रेषितांचा उपदेश व संगत व भाकर मोडणें व प्रार्थना, यांत ते तत्पर राहत होते. तेव्हां प्रत्येक मनुष्याला भय प्राप्त झालें, आणि प्रेषितांकडून बहुत अद्भुतें व चमत्कार घडत होते. गीत ४०:३.

## ४४५ पुनर्जन्म व शुद्ध करणें यांत ईश्वरी करणी आहे.

तित. ३:५, ६. तेव्हां जीं न्यायीपणाचीं कामें आह्मी केलीं होतीं, त्यांकडून नव्हे, तर त्याने आपल्या दयेने पुनर्जन्माचें जें धुणें, आणि पवित्र आत्म्याकडून जें नवें करणें, त्यांकडून आह्मास तारिलें. तो [आत्मा] त्याने आमचा तारणारा येशू ख्रिस्त याकडून आह्मावर भरपूर ओतिला आहे. अनु ३०:६. गीत ५१:१०. इर्म. २४:७. ३१:३३. यहेज्के. ११:१९, २०. ३६:२५–२७. योह. १:१२, १३. रोम. ९:१५, १६. १५:१६. १करिं. ३:५–७. ४:७. एफ. २:४, ५, ८, १०. ४:२४. कल. १:१२, १३. २थेस्स. २:१३. इब्री १३:२०, २१. मार्क १:१८. (४१२(४,)६६५.)

## ४४६ पवित्र भावना ही ईश्वरी देणगी आहे.

एफ. २:८. कां तर तुह्मी कृपेने विश्वासाकडून तारलेले आहां; आणि हें तुह्मापासून नव्हे, देवापासून दान आहे. प्रेषि. ५:३१. रोम. ५:५. १२:३. २तीम. २:२५.

## ४४७ पवित्र भावना जशा पाप्यांस तशा देवभक्तांसहि देवापासून आहेत.

योह. १५:५. मी वेल आहें, तुह्मी फांटे आहां, जो मजमध्यें राहतो,

आणि मी त्यामध्यें तो बहुत फळ देतो; कारण कीं मजहून वेगळे असल्यास तुमच्याने कांहीं करवत नाहीं. १ करिं. १५:१०. १ पेत्र. १:५. (१३५.)

## ४४८ सफळ बोलावणें.

प्रेषि. २:३९. कां तर तें वचन तुह्मास व तुमच्या लेंकरांस, आणि सर्व जे दूर, जितक्यांस आमचा देव प्रभु बोलावील त्यांस आहे. रोम. १:६,७. ८:३०. ९:२३,२४. १ करिं. १:९,२३,२४. १ थेस्स. २:१२. (१ पेत्र. २:९.)

## ४४९ पुनर्जन्म व शुद्ध होणें यांकडून ज्ञानप्रकाश होतो.

२ करिं. ४:६. कारण कीं ज्या देवानें उजेडाला अंधारांतून प्रकाशित व्हायास सांगितलें, तो येशू ख्रीस्ताच्या योगानें देवाच्या गौरवाच्या ज्ञानाचा प्रकाश पाडण्यासाठीं आमच्या अंतःकरणांत प्रकाशला आहे. गीत २५:१४. नीति १:७. १६:२३. २८:५ उपदे. ८:५. दानी. १२:१०. योह. ७:१७. १ करिं. २:१४:१५. एफ. ५:८. कल. १:१२,१३. १ थेस्स. ५:४,५. १ पेत्र. २:९. १ योह. २:८-११,२०,२१. (७३४.)

## ४५० पुनर्जन्म बहुधां ईश्वरी उपदेशानें होतो.

यशा. ५४:१३. आणि तुझीं सर्व लेंकरें परमेश्वरानें शिकविलेलीं होतील; आणि तुझ्या लेंकरांचें अत्यंत कुशल होईल. इयो. ३६:२२. गीत २५:८,९,१२, योह. ६:४५.

## ४५१ पवित्र आत्मा प्रेरीत असतांहि मनुष्य मुक्त्यार आहेत कीं काय?

१ पेत्र. १:२२. तुह्मी भावांवर निष्कपट प्रीति करण्यासाठीं आपले जीव खरेपण पाळण्यानें आत्म्याकडून पवित्र केले असतां, एकमेकांवर शुद्ध मनानें निष्ठेनें प्रीति करा. गीत ११९:५९,११२. यहेज्के. १८:२७,२८. प्रेषि. १७:२८. १ करिं. ४:१५. कल. ३:९,१०. (१४४,१,४,६६३,४४३.

## ४५२ पाप्यांस स्वतः फिरून शुद्ध होण्याची आज्ञा.

यहेज्के. १८:३०. याकरितां प्रभु परमेश्वर ह्मणतो, अहो इस्राएला

त्या वंशानो, मी तुह्माला प्रत्येकाला त्याच्या आचाराप्रमाणें शासीन: तुह्मी फिरा, आणि आपणांस आपल्या सर्व अपराधांपासून फिरवा; ह्मणजे अन्याय तुह्मास बाधक असणार नाहीं. ३१,३२. ३३:११. अनु. १०:१६. इयो. २२:२१. नीति २३:२६. यशा. १:१६,१७. ४२:१८. ४५:२२. ५५:७. इर्म. ४:३,४,१४. मात्थी २५:२४–२७. (लूक १९:२०.) प्रेषि. ३:१९. १६:३१. २६:२०. रोम. १२:२. १३:१४. २कारिं. ५:२०. एफ. ४:२२–२४. ५:१४. याक. ४:७,८. (६०७,११०,४३१.

## ४५३ पुनर्जन्माचें प्रमाण ईश्वरी आज्ञा पाळणें असें आहे.

१योह. २:३. आणि जर आह्मी त्याच्या आज्ञा पाळितों, तर तेणेंकरून आह्मी जाणतों कीं, आह्मी त्याला जाणिलें आहे. ४:६. ३:१४,१८, १९,२४. ५:१–४. गीत ११९:६. मात्थी ७:१६–२१. योह. ८:४७. १३:३५. १४:२१,२३,२४. रोम. ८:९,१४. याक. २:१७. (६१०.)

# पूर्णता.

## ४५४ सर्व चांगल्या कामांत पूर्ण असावें ह्मणून आज्ञा व बोध.

मात्थी ५:४८. यास्तव जसा तुमचा आकाशांतील बाप पूर्ण आहे, तसे तुह्मी पूर्ण व्हा. ३७–४७. रोम. १२:१,२,९–२१. २ करिं. ७:१. एफ. ४:२५–२९,३१,३२. ५:१–४,११,१५,१६. ६:१०–१८. १पेत्र. २:२१,२२. (१२९–१३०,३८०.)

## ४५५ नित्य पूर्ण असण्याचा करार देवासीं करावा कीं काय ?

गीत ७६:११. तुह्मी आपला परमेश्वर देव याच्या चहुंकडले सर्व त्याच्याजवळ नवस करा आणि फेडा; ज्याला भ्यावें त्याजवळ भेटी आणाव्या. ११९:१०६. निर्ग. २४:७,८. अनु. २९:१०–१३. २काल. १५:१२,१४,१५. ३४:३१,३२. नहे. १०:२९. इर्म. ५०:५. यहेज्के. २०:३७ (२राजे ११:१७. यशा. ५६:४.) (३३.)

## ४५६ देवभक्तांस यथार्थ व पूर्ण असें ह्मटलें आहे.

उत्प. ६:९. ही नोहाची वंशावळी; नोहा आपल्या काळांतील लोकांमध्यें यथार्थिक व धार्मिक माणूस होता. इयो. १:८. २:३. गीत ३७:३७. नीति २:२१. ११:५. १ करिं. २:६. फिलि. ३:१५.

## ४५७ ईश्वराला पसंत होती असी पूर्णता देवभक्तांस मिळती कीं काय?

उत्प. ५:२४. आणि हनोख देवाच्यासंगतीं चालला, मग तो नाहीं असा झाला. का कीं देवानें त्याला नेलें. यहोश. १४:१४. २ राजे. २०:३. गीत ११:७. ४५:१३. ११९:१. १४७:११. नीति ८:१७. ११:२० योह. १३:३४. १६:२७. रोम. १३:८,१०. १ थेस्स. २:१०. १ योह. ३:३. ४:१२.१७. प्रग. १९:८. (२१५,४५८,१६९,३४४. २५७.)

## ४५८ देवभक्तांची पूर्ण प्रीति पापासीं संयुक्त व्हावी हें साध्य आहे कीं काय?

गल. ५:१६. आणि मी सांगतों कीं आत्म्यानें चाला, ह्मणजे तुह्मी देहसंबंधी इच्छा पूर्ण करणारच नाहीं. १७. गीत ११९:२,३ यहेज्के. ३६:२६. मात्थी ६:२४. रोम. १३:१०. १ योह. २:१५. ३:६, ९. ४:१८. (४५६.)

## ४५९ वर्ष सहस्राची पूर्णता.

इर्म. ३१:३३. परंतु परमेश्वर ह्मणतो, त्या दिवसानंतर जो करार मी इस्राएलाच्या वंशासीं करीन, तो हाच आहे कीं मी आपलें नेमशास्त्र त्यांच्या अंतर्यामांत ठेवीन, आणि त्यांच्या हृदयांत तें लिहीन; आणि मी त्यांचा देव असत जाईन, आणि ते माझे लोक असत जातील. ३२: ३९,४०. ५०:२०. अनु. ३०:६. (५९४.)

## ४६० देवभक्तांची इहलोकीं पूर्णता अस्थिर आहे.

उपदे. ७:२०. तर उत्तम करितो आणि पाप नाहीं करीत, असा कोणी न्यायी मनुष्य पृथ्वीवर नाहीं. २ काल. ६:३६. इयो. ९:२०. ४०: ४. ४२:५,६. गीत १९:१२,१३. ३८:४,५ (६–८). ११९:९६. नीति

२०:२. यशा. ६:५. मात्थी ६:१२. २६:७२–७४. रोम. ७:१४. (१६–२५. गल. ५:१७. फिलि. ३:१२. याक. ३:२. १ योह. १:८. (५१२, ३४८.)

## ४६१ देवभक्तांस संकटें व शिक्षा कधीं कधीं प्राप्त होतात.

इब्री. १२:५. अणखी जो बोध जसा पुत्रांसीं तसा तुह्मांसीं संवाद करितो, तो विसरलां: तो असा कीं, माझ्या पुत्रा, प्रभूची शिक्षा तुच्छ मानूं नको, आणि त्याकडून तुझा निषेध झाला असतां कासावीस होऊं नको. ६–८. प्रग. ३:१९. (६७०–२.)

## ४६२ देवभक्त अपालट पूर्णतेस पोहंचले असते देव त्यांस शिक्षा देतो कीं काय?

इब्री. १२:१०. का कीं थोडक्या दिवसांपर्यंत त्यांनीं आपणांस जें बरें वाटलें, त्याप्रमाणें शिक्षा केली, परंतु यानीं आमच्या हितासाठीं आह्मी त्याच्या पवित्रतेचे भागिदार व्हावें ह्मणून. इयो. ३६:८,९. यशा. २७. ७,९. फिल. ३:१२,१३.

## ४६३ आत्मवंचक आपण पूर्ण ह्मणविणारे आहेत.

नीति ३०:१२. आपल्या दृष्टीनें शुद्ध आहे पण आपल्या मळापासून धुतली नाहीं, असी एक जाति आहे. मात्थी १९:२०–२२. (७२३, ७३०,७३१.)

# पोपपण.

## ४६४ पोपपण, ह्मणजे रोमन क्याथोलिकधर्म त्याविषयीं भविष्यें.

१ तीम. ४:१. आत्मा तर स्पष्ट ह्मणतो कीं, शेवटल्या काळामध्यें विश्वासाविषयीं कित्येक भ्रष्ट होतील, ते फसविणाऱ्या आत्म्यांस व भुतांच्या उपदेशांस लक्ष देतील. २,३. ७:८,२४–२६. २ थेस्स. २:३–१०. प्रग. १३:११–१८. १७:१–७,१८.

४६५ पेत्रस हा प्रेषितांचा मुख्य अथवा सर्वांवरचा अध्यक्ष असा केला होता कीं काय ?

मात्थी १६:२३. परंतु तो मुरडून पेत्रसाला ह्मणाला, अरे सैताना, माझ्या मागें हो; तूं मला अडखळा आहेस: कारण कीं तूं देवाच्या गोष्टींकडे लक्ष लावीत नाहींस, माणसांच्या गोष्टींकडे लावितोस. २०:२५-२८. प्रेषि. ८:१४,१५. १५:६,७,१२-२०. १ पेत्र. ५:१.

४६६ पोपपणाचा भयंकर परिणाम.

२ थेस्स. २:८. आणि त्यानंतर अधर्मी प्रगट होईल, त्याला प्रभु आपल्या मुखांतील श्वासानें नष्ट करील, आणि आपल्या येण्याच्या तेजानें नाहींसें करील. दानी. ७:११:२६. प्रग. १७:१६. १८:४,८. १९:१-३,२०.

## प्रार्थना.

४६७ प्रार्थना अवश्य करावी.

यशा. ५५:६. परमेश्वर सांपडेल त्या कालीं त्याला शोधा; तो जवळ असतां त्यास हाक मारा. ६२:६,७. इयो. ४२:८. यहेज्के. ३६:३७. मात्थी ५:४४. ६:९-१३. २६:४१. लूक १८:१. एफ. ६:१८. फिलि. ४:६. कल ४:२. १थेस्स. ३:१०. ५:१७,१८. १तीम. २:१-३,८. इब्री ४:१५,१६. याक. ५:१३,१६. १ पेत्र. ४:७. (२४६.)

४६८ एकांतीं प्रार्थना करावी-उदाहरणें.

मात्थी ६:६. तूं तर प्रार्थना करसील तेव्हां आपल्या खोलींत जा, आणि आपलें दार लावून तुझा बाप जो गुप्तांत आहे त्याची प्रार्थना कर, मग गुप्तांत पाहणारा तुझा बाप तुला लौकिकांत फळ देईल. १४:२३. गीत ११९:६२ मार्क १:३५. लूक ५:१६. (३५०.)

४६९ मनोक्त प्रार्थनेचीं-उदाहरणें.

१शमु. १:१२. तेव्हां असें झालें कीं ती आग्रह करून परमेश्वराची प्रार्थना करीत असतां एलीनें तिच्या तोंडाकडे दृष्टि लाविली. १३-१६. नहे. २:४.५.

### ४७० तोंडची ऐकण्याजोगी प्रार्थना करावी—उदाहरणें.

प्रेषि. १:२४. मग ते प्रार्थना करीत बोलले, हे सर्वांचें अंतःकरण जाणणाऱ्या प्रभू, ७:५९,६०. २०:३६,३७. २७:३५. १राजे ८:२२, २३,२८–३०. गीत ५५:१६,१७. ८६:३ दानी. ९:१९–२१. होशे. १४:२. योएल. १:१४. मात्थी २६:३९,४२. मार्क. ८:६.

### ४७१ प्रार्थना प्रीतीने व मान्यतेने केली पाहिजे.

गीत ३७:४. आणि तूं परमेश्वरावर आवड ठेव, ह्मणजे तो तुझ्या हृदयांतलीं मागणीं तुला देईल. नीति २८:९. योह. ९:३१. १योह. ३:२२. (१११.)

### ४७२ प्रार्थना देवावरच्या विश्वासाने केली पाहिजे.

इब्री १०:२२. ह्मणून आह्मी खऱ्या अंतःकरणाने, विश्वासाच्या पूर्ण निर्धाराने शरण जावें; आमचीं अंतःकरणें दुष्ट भावनेपासून [धुण्यासाठीं] शिंपडलेलीं, आणि शरीर निर्मळ पाण्याने धुतलेलें. ११:६. याक. १: ५–७. (११५.)

### ४७३ खऱ्या प्रार्थनेंत देवाज्ञानुवृत्ति होती.

मात्थी ६:९. यास्तव तुह्मी या प्रकारें प्रार्थना करा; हे आमच्या आकाशांतील बापा, तुझें नाम पवित्र मानोत. १०. २६:३९. गीत ३७: ७. ४०:१. लूक २२:४१,४२. प्रेषि. २१:१४. (१५१,१२०)

### ४७४ प्रार्थनेंत नम्रता, पाप कबूल करणें व पश्चात्तापहि येतात.

लूक १८:१३. परंतु जकातदार दूर उभा राहून आकाशाकडे डोळे देखील वर लावायास धजत नसतां आपल्या उरावर मारून बोलला, हे देवा, मज पाप्यावर दया कर. १४. २ काल. ७:१४. ३३:१२,१३. गीत ९:१२. (४३८,३६८–९,३४८.)

### ४७५ प्रार्थनेंत ईश्वराच्या गौरवासाठीं आवेश असावा.

गीत २५:११. हे परमेश्वरा, तूं आपल्या नामामुळें माझा अन्याय क्ष-

मा कर, कारण कीं तो मोठा आहे. ७९:९. १४३:११. १ राजे १८: ३६,३७. यशा. ३७:२०. दानी. ९:१७–१९. (१२२,३४७.)

## ४७६ प्रार्थना क्षमाशिल स्वभावाने केली पाहिजे.

मार्क. ११:२५. आणि तुह्मी उभे राहून प्रार्थना कराल तेव्हां कोणी तुमचा अपराधी असला तर त्याची क्षमा करा, तुमच्या आकाशातील बापानेहि तुमच्या अपराधांची क्षमा करावी ह्मणून. २६. मात्थी ६:९, १२. लूक. २३:३४. (७४२.)

## ४७७ प्रार्थना आग्रहाने व धीराने केली पाहिजे.

यशा. ६२:१. जीयोनेविषयीं मी मौन धरणार नाहीं, आणि यरू-शलेमेविषयीं मी उगा राहणार नाहीं, तिचा न्याय तेजाप्रमाणें व तिचें तारण जळत्या दिव्याप्रमाणें निघेपर्यंत. ६,७. उत्प. ३२:२४–२६. लूक ६:१२. ११:५–८. १८:१,५–८. रोम. १२:१२. एफ. ६:१८. कल. ४:२. १ थेस्स. ३:१०. ५:१७. (३०९.)

## ४७८ प्रार्थना ख्रीस्ताच्या नावाने केली पाहिजे.

योह. १६:२४. अझून तुह्मी माझ्या नावाने कांहीं मागितलें नाहीं, मागा ह्मणजे तुह्मास मिळेल, यासाठीं कीं तुमचा आनंद पूर्ण व्हावा. कल. ३:१७.

## ४७९ प्रार्थना मनोभावाने केली पाहिजे.

गीत १४५:१८. जे सर्व परमेश्वराला हाक मारितात, जे सत्यतेने त्याला हाक मारितात, त्या सर्वांस तो जवळ आहे. यशा. २९:१३, १४. इर्म. २९:१३. (अनु. ४:२९.) मात्थी १५:७,८. (५.)

## ४८० प्रार्थना दयाशील बुद्धीने केली पाहिजे.

यशा. ५८:७,९. हाच आहे कीं नाहीं, ह्मणजे तों आपलें अन्न भु-केल्यास वाटावें, आणि घालविलेल्या दरिद्र्यांस घरीं आणावें? जेव्हां तूं कोणाला उघडें पाहतोस, तेव्हां त्याला वस्त्र द्यावें; आणि तूं आपल्या सा-रिख्या माणसापासून न लपावें, असें करिसील? गीत. २१:१३.

## ४८१ प्रार्थना करत्या वेळेस निरनिराळीं आसनें. (बसूं नये.)

१ राजे. ८:२२. तेव्हां शलमोनाने परमेश्वराच्या वेदीपुढें इस्राए-

लाच्या सर्व समुदायादेखतां उभें राहून आपले हात आकाशाकडे पसरिले. निर्ग. ९:२९. २काल. ६:१३. मात्थी २६:३९. मार्क ११:२५. लूक २२:४१,४२. प्रेषि. २०:३६.

## ४८२ प्रार्थनेची कार्यसाधन शक्ति.

प्रेषि. १२:५. याप्रमाणें पेत्रस बंदिशाळेंत राखिला, परंतु त्याकरितां देवाजवळ मंडळीची प्रार्थना एकाग्रतेने होत असे. ७. उत्प. १८:३२. ३२:२८. होशे. १२:४. निर्ग. ३२:११, १४. (अनु. ९:१४, १८–२०.) गण. ११:२. १४:१९,२०. अनु. २६:७,८. १शमु. १:२७. १२:१८. १राजे. १७:२२. १८:३७,३८. २राजे. ६:१८. १९:२०. २०:५, ६, ११. १काल. ४:१०. गीत १८:६. ३४:४–६, १०,१५, १७. ५०:१५. ६५:२. ६६:१९,२०. ८४:११. ८६:५. ९१:१५. १०६:२३. ११८:५. १४५:१८, १९. यशा. ४५:१९. ६५:२४. इर्म. १५:१. ३३:३. यहेज्के. १४:१४. (२०.) दान. ९:२१–२३. १०:१२. योएल. २:३२. मात्थी ७:७–११. लूक १८:७,८. याकं. ४:३,८. ५:१६–१८. १पेत्र. ३:१२. प्रग. ८:३,४. (६६२,३५५.)

## ४८३ दुष्टांचें भजन व प्रार्थना ईश्वराला पसंत नाहींत.

गीत ५०:१६. परंतु दुष्टाला देव ह्मणतो, माझे नेम सांगणें आणि माझा करार आपल्या तोंडांत घेणें, हें तुझें काय? १७. ६६:१८. नीति १:२८,२९. १५:८,२९. २८:९. यशा. १:११–१५. ५९:१,२. मात्थी ७:१८. योह. ९:३१. इब्री. ११:६. (५११,४४०.)

## ४८४ प्रार्थना दुष्टांला आवडत नाहीं.

इयो. २७:८, का कीं देवाने अधार्मिकाचा जीव विच्छिन्न करून नेला तेव्हां त्याची आशा काय होईल? १०. (३७१.)

## ४८५ जीं प्रार्थना करीत नाहींत त्यांवर ईश्वराचा राग आहे.

इर्म. १०:२५. जीं राष्ट्रें तुला जाणत नाहींत आणि जे वंश तुझ्या नामाने हाक मारीत नाहींत त्यांजवर तूं आपला राग पडूं दे; का तर त्यानीं याकोबाला खाल्लें, त्यांला खाऊन टाकिलें आहे, त्यानीं त्याला नाहींसें केलें, आणि त्यांची वस्ती ओसाड केली आहे. (७५.)

# बाप्तिस्मा.

## ४८६ मोशेकृत बाप्तिस्मे.

लेवी. ८:५. नंतर मोश्याने समुदायाला ह्मटलें, "जी गोष्ट करावी ह्मणून परमेश्वराने आज्ञा दिल्ही, ती हीच." ६. निर्ग. २९:४. गण. ८:५–७. मार्क. ७:२–४. लूक ११:३८. इब्री. ९:१०.

## ४८७ लाक्षणिक बाप्तिस्मा व सुंता.

लूक १२:५०. आणि मला बाप्तिस्मा घ्यायाचा आहे, आणि तो अटोपेपर्यंत मी कसा पेंचलों आहें? गीत ५१:२, ७. यशा. ४:४. मात्थी ३:११. २०:२२. योह. ३:५. प्रेषि. १:५. रोम. २:२८; २९. ६:३–५. १ करिं. १०:१, २. १२:१३. गल. ३:२७. कल. २:११–१३. तित. ३:५, ६.

## ४८८ योहान्नकृत बाप्तिस्मा ही पश्चात्ताप, शुद्धता, व ख्रीस्ताच्या येण्याला सिद्ध होणें यांची खूण होती.

मला. ३:१. पाहा, मी आपला दूत पाठवीन, आणि तो मजपुढें मार्ग सिद्ध करील; आणि ज्या प्रभूला तुह्मी शोधितां, कराराच्या ज्या दुताविषयीं तुह्मी संतोषतां, तो आपल्या मंदिरांत अकस्मात येईल; पाहा, तो येईलच, असें सैन्यांचा परमेश्वर ह्मणतो. मार्क १:४. लूक १:१७. ३:३, ४. (यशा. ४०:३.) योह. १:३०, ३१.

## ४८९ योहान्न पवित्रात्म्याच्या नावाने बाप्तिस्मा करीत असे कीं काय?

प्रेषि. १८:२४, २५. १९:१–५.

## ४९० आहारोनाच्या उपाध्यपणांत शिरावा किंवा योहान्नकृत बाप्तिस्मा अंगीकारून इस्राएलांस प्रगट व्हावा, या दोहोंतून ख्रीस्ताने कोणत्या हेतूने बाप्तिस्मा घेतला.

मात्थी ३:१३–१५. इब्री. ७:११–१४.

### ४९१ ख्रिस्ती बाप्तिस्म्याची स्थापना व त्याविषयीं विश्वासणाऱ्यांस आज्ञा.

मात्थी २८:१९. यास्तव तुह्मी जाऊन सर्व देशांतील लोकांस शिष्य करा: त्यांस बापाच्या व पुत्राच्या व पवित्र आत्म्याच्या नामाने बाप्तिस्मा द्या. १८–२०. मार्क १६:१६. प्रेषि. २:३८. १०:४८. २२:१६.

### ४९२ बाप्तिस्मा देण्यास कोण योग्य?

प्रेषि. ८:१२. परंतु फिलिप्पस देवाचें राज्य व येशू ख्रीस्ताचें नाम याविषयीचें शुभवर्त्तमान सांगत असतां, लोकानी विश्वास धरिला तेव्हां पुरुष व बायका यांचा बाप्तिस्मा झाला. मात्थी २८:१९. योह. ३:२२.

### ४९३ बाप्तिस्मा घेण्यास कोण योग्य?

प्रेषि. १८:८. तथापि सभेचा अधिकारी क्रिस्पस याने आपल्या सर्व घराण्यासुद्धां प्रभूवर विश्वास ठेविला, आणि बहुत करिंथकरानी वचन ऐकून विश्वास ठेविला व बाप्तिस्मा घेतला. २:३८–४१. ८:३६, ३७. १०:४६–४८. १६:१४, १५, २९–३४. १ करिं. १:१६. (३२–३६.)

### ४९४ बाप्तिस्म्याची रीति.

योह. ३:२३. आणि शालिमाजवळचें एनोन एथें बहुत पाणी होतें यास्तव तेथें योहान्नहि बाप्तिस्मा करीत होता, तेव्हां लोकानी येऊन बाप्तिस्मा घेतला. मात्थी ३:५, ६, १६. प्रेषि. ८:३८, ३९. कल. २:१२. रोम. ६:४. यशा. ४४:३ ५२:१५. यहेज्के. ३६:२५. (गण. ८:७.) इब्री. १०:२२. १२:२४. १ पेत्र. १:२. (४८६–७, ६७९.)

## बिथरणें.

### ४९५ बिथरण्याचीं उदाहरणें–बोध.

१ राजे. ११:४. ह्मणजे शलमोनाच्या ह्मातारपणाच्या काळीं असें झालें कीं त्याच्या स्त्रियानी त्याचें मन दुसऱ्या देवांकडे फिरविलें; ह्मणून त्याचें मन त्याचा बाप दावीद याच्या मनासारिखें पूर्णपणाने त्याचा देव परमेश्वर याकडे नव्हतें. निर्ग. ३२:१–६. २ शमु. १२:७, ९. २ काल. १६:७–१०. इर्म. ८:५. होशे. ११:७. मात्थी १६:६. (६४९, ७२२)

## ४९६ बिथरणाऱ्यांस कुरकूर करण्याचा आणि निराश व अविश्वासी होण्याचा फल आहे.

यशा. ४९:१४. परंतु जियोन ह्मणती परमेश्वराने मला सोडिलें आहे, आणि प्रभु मला विसरला आहे. उत्प. ४२:३६. २ राजे. १९:४. इयो. ३:१. गीत ७३:२, ३, १३, १४. इर्म. २०:१४. विल. ३:२, ७, ८. योना. ४:१–४. (६७७, ३७३, १४५, ७२७.)

## ४९७ बिथरणारे आपल्या अवस्थेविषयीं बेसावध असतात.

प्रग. ३:१७. कां कीं तूं ह्मणतोस कीं, मी धनवान आहें व म्या धन मिळविलें आहे, व मला कशाचीहि गरज नाहीं, आणि तुला ठाऊक नाहीं कीं, तूं भाग्यहीन व दीनवान व दरिद्री व अंधळा व नागवा आहेस. होशे. ७:८, ९. रोम. २:१७–१९. (७३१.)

## ४९८ बिथरणारे अंधारांत चालतात.

ईयो. २३:८. पाहा, मी पुढें चाललों तरी तो सांपडत नाहीं, आणि मागें चाललों तरी तो मला दिसत नाहीं. ९. यशा. ५९:२. मान्थी ६:२२, २३. (७३४.)

## ४९९ बिथरणाऱ्यांस दंडसूचना.

इब्री. १०:३८. आणि न्यायी विश्वासाने जगेल, परंतु जर मागें हटेल, तर त्याविषयीं माझा जीव संतोष पावणार नाहीं. निर्ग. ३२:९, १०. एज्रा. ८:२२. नीति १४:१४. इर्म. २:१९. होशे. ६:४, ५. एफ. १:४. (६४९)

## ५०० बिथरणाऱ्यांस पश्चात्ताप करायाची आज्ञा.

इर्म. ३:१४. परमेश्वर ह्मणतो, मागें फिरणाऱ्या लेंकरानो, फिरा: कां कीं मी तुह्मासीं विवाहित आहें: आणि मी तुह्माला नगरांतून एक, व वर्गांतून दोघे असें घेईन, आणि तुह्माला जीयोनेस आणीन: २२. होशे. १०:१२. १४:१, २. प्रग. २:४, ५. ३:१–३

## ५०१ बिथरणाऱ्यांस सुधारायास कठीण आहे—त्यांस फिरलें पाहिजे.

लूक २२:३२. परंतु तुझा विश्वास कुंठू नये ह्मणून तुझ्यासाठीं म्या

प्रार्थना केली आहे, आणि तूं फिरसील तेव्हां आपल्या भावांस स्थिर कर. ३१. गल. ४:१९, २०. (२९२, ५१२.)

५०२ बिथरणारे जेव्हां फिरतात तेव्हां आपलीं पापें पदरांत घेऊन मनापासून पश्चात्ताप करितात.

ईयो. ४०:३–५. गीत १०२:३–७. (४३८, ३६८, ४२८.)

---

## भ्रष्टपणा.

५०३ मूळपुरुषाचा धर्मभ्रंश आणि लागलींच फळें.

उत्प. ३:१७. आणि आदामाला तो बोलला, त्वां आपल्या स्त्रिची गोष्ट मानून ज्या झाडाविषयीं म्यां तुला असी आज्ञा दिल्ही कीं, तूं त्यावरचें खाऊं नको, त्यावरचें त्वां खाल्लें आहे, यास्तव तुझ्यामुळें भूमि शापित आहे; तीजपासून तूं आपल्या आयुष्यांतील सर्व दिवसांत दुःखानें खासील. ४–६, १४, १६–१९. उपदे. ७:२९.

५०४ आदामाच्या धर्मभ्रंशावरून त्याच्या संतानाला काय फळ झालें.

रोम. ५:१२. यास्तव जसें एका माणसाकडून पाप जगांत आलें, आणि पापामुळें मरण, मग तसेंच सर्वांनीं पाप केल्यावरून सर्व माणसांवर मरण आलें. १८, १९. १ करिं. १५:२२.

५०५ कोणी जातीनें पाप केल्याशिवाय दोषी ठरत नाहीं.

यहेज्के. १८:२. बापानीं आंबट द्राक्षें खाल्लीं, आणि लेंकराचे दांत आंबाले, ही ह्मण तुह्मी इस्राएलाच्या भूमीविषयीं बोलत असतांना तुमचें तात्पर्य काय असेल? २०. अनु. २४:१६. (२ राजे. १४:६.) (इर्म. ३१:२९, ३०.)

५०६ भ्रष्टपणा कसा आहे.

कल. ३:५. तर पृथ्वीवरील तुमचीं अंगें, ह्मणजे व्याभिचार, अशु-

द्रूपण, चेतना, दुष्टउत्कंठा, व लोभ, हा मूर्त्तिपूजा आहे, यांस तुह्मी जिवें मारा. होशे १०:१. १योह. ५:१७ (७१६.)

## ५०७ आज्ञा व ज्ञान यांशिवाय पाप होत नाहीं.

रोम. ३:१९. तर आह्मास ठाऊक आहे कीं, नेमशास्त्र जें जें सांगतें तें नेमशास्त्राखालच्यांस सांगतें; यासाठीं कीं प्रत्येक तोंड बंद व्हावें व अवघें जग देवासमोर दंडपात्र व्हावें. ४:१५. ५:१३. योह. ९:४१. १५:२२. याक. ४:१७. (६३८.)

## ५०८ भ्रष्टपणा अज्ञानावरूनच नव्हे.

रोम. १:२१. कां तर देवाला जाणत असतांहि, त्यांनीं त्याला देव असें गौरविलें नाहीं, व उपकारस्तुति केली नाहीं, परंतु ते आपल्या कल्पनांनीं भ्रांत झाले असतां, त्यांचें मूढ अंतःकरण अंधारमय झालें. (७१७.)

## ५०९ सर्व माणसें भ्रष्ट आहेत.

उत्प. ६:१२. तेव्हां देवानें पृथ्वीस न्याहाळिलें, आणि पाहा ती नासली कां तर पृथ्वीवर सर्व प्राण्यांनीं आपली चाल नासविली होती. गीत १:१-३. रोम. ३:९-१२, २३. ५:१२. गल. ३:२१, २२. (१६०.)

## ५१० जन्मस्वभावाचा भ्रष्टपणा.

गीत ५१:५. पाहा, मी अन्यायांत जन्मलों आणि माझ्या आईनें माझा गर्भ पापांत धरिला. ५८:३. ईयो. ११:१२. १४:४. १५:१४. नीति २२:१५ यशा. ४८:८. योह. ३:६. रोम. ३:१०, २०, २३. ५:१२, १४. २करिं. ५:१४. एफ. २:३

## ५११ माणसें जन्मस्वभावानें अगदीं भ्रष्ट आहेत.

उत्प. ६:५. आणि परमेश्वरानें पाहिलें कीं माणसाचें पाप पृथ्वीमध्यें मोठें, आणि त्याच्या हृदयाच्या विचारांतील प्रत्येक भावना सर्व दिवसांमध्यें केवळ वाईट आहेत. गीत ५:९. नीति २१:४. उपदे. ८:११. ९:३. २करिं. ४:१४. एफ. २:१-३, १२. कल. २:१३. (४८३, ४४०, ७१५-१७.

## ५१२ भ्रष्टपणाचें प्राबल्य व हट्टीपण.

रोम. ८:७, कां तर दैहिक गोष्टी चिंतणें हें देवासीं वैर आहे,

कारण कीं तें देवाच्या शास्त्राला मान्य नव्हे आणि त्याच्यानें मान्य होवत नाहीं. ८. उत्प. ३७:४. निर्ग. ३२:९. (अनु. ९:६,१३.) यहो. ७:१२. नीति ५:२२. २७:२२. उपदे. ९:३. यशा. ४८:४. इर्म. २: २२. ३:५. ६:१०. १३:२३. १७:१,९. मात्थी ७:१८. १२:३४. १७: १७. २३: ३३. योह. ६:४४,६५. (७१६, ७१७, २२६.)

## ५१३ अंधारांतलीं कामें यांचें वर्णन व निषेध.

एफ. ५:११, आणि अंधारांतील निरर्थ कामांमध्यें भागीदार होऊं नका, तर त्यापेक्षां निषेधच करा. १२. इयो. २४:१४–१७. नीति ७:६–९. यशा. २९:१५. यहेज्क. ८:१२.

## ५१४ दुःख व शासन बंद केलें ह्मणजे भ्रष्टपण प्रगट होतें.

उपदे. ८:११. दुष्कर्माचा निर्णय होऊनहि लवकर सिद्धीस जात नाहीं, याकरितां मनुष्यांचें हृदय त्यांच्या ठायीं वाईट करायाला तत्पर असतें. निर्ग. ८:१५ ३२:२२,२३. यहू. २:७,८,१०,११.

## ५१५ मनुष्य स्वभाव सर्व युगांत फारकरून सारिखाच आहे.

नीति २७:१९. जसें पाण्यांत मुखाला मुखाचें प्रतिबिंब होतें, तसेंच मनुष्याला मनुष्याच्या हृदयाचें. मात्थी २३:३१. (५०९.)

## ५१६ मनुष्य स्वभाव विश्वासास योग्य नाहीं—भय सुचना.

यशा. २:२२. मनुष्य ज्याच्या नाकपुड्यांत श्वास आहे त्याची आशा सोडा, कां तर तें काय मोजावयाचें आहे ? गीत १४६:३, ४. नीति २५:१९. २८:२६. इर्म. १७:५,६. मीखा. ७:५.

---

# मतिभ्रम.

## ५१७ मतिभ्रम हा चलतीचा, भ्रष्टकारक, व नाशकारक आहे.

गीत १९:१२. आपल्या चुक्या कोण समजतो ? गुप्त दोषांविषयीं तूं

मला निर्दोषी कर. नीति १९:२७. उपदे. ७:२९. मात्थी १६:१२. १ करिं. १५:३३. गल. १:६,७. ५:२. २ थेस्स. २:११,१२. २ तीम. २:१६–१८. याक. ५:२०. २ पेत्र. २:१. ३:१७. (६०७,७०५.)

५१८ पाखांडे व मतिभ्रम हीं माणसांची परीक्षार्थी आहेत.

१ करिं. ११:१९. कां कीं तुह्मामध्यें पटलेले ते प्रगट व्हावे ह्मणून तुह्मामध्यें फुटी झाल्या पाहिजेत. (८८.)

५१९ मतिभ्रमिष्टांची संगत धरूं नये.

गल. १:८. परंतु जें शुभवर्त्तमान आह्मी तुह्माजवळ सांगितलें, त्याहून निराळें शुभवर्त्तमान जर आह्मी किंवा आकाशांतील दूत तुह्माजवळ सांगतो, तर तो शापित होवो. ९. १ तीम. ६:५. तित. ३:१०. (२३३, २३६,७०५.)

## मद्यपान.

५२० मद्यपान हें ठकाऊ अमंगळ व नाशकारक आहे.

नीति २०:१. द्राक्षारस निंदक, मद्य क्षोभचेतविणारें आहे; जो कोणी त्यानें डगमगतो तो सूज्ञ नाहीं. २३:२१,२९,३०,३४,३५. उत्प. ९:२०,२१. यशा. २८:७,८. ५६:१२. इर्म. २५:२७. दान. ५:१,४. होशे. ४:११. १ करिं. ११:२१.

५२१ मद्यपान मना केलें आहे–दंड सुचना.

यशा. ५:११,१२. जे पहांटेस उठून मद्य पीत जातात, आणि द्राक्षारस त्यांला संतप्त करीपर्यंत सांजपावेतों पीत राहतात, त्यांला हायहाय. आणि सारंगी व वीणा, डफ, व पोंवा, व द्राक्षारस हीं त्यांच्या जेवणावळींत असतात; परंतु ते परमेश्वराची कृति मन घालून पाहत नाहींत, आणि त्याच्या हातांचीं कर्में ते ध्यानांत आणीत नाहींत. २२. २८:१. अनु. २१:२०,२१. नीति. २३:२०,३१,३२. मात्थी २४:४८–५१. रोम. १३:१३. १ करिं. ६:१०. गल. ५:१९–२१. एफ. ५:१८. (६, ४८.)

### ५२२ मद्य विकणाऱ्यांचा निषेध.

हब. २:१५. जो तूं आपल्या शेजाऱ्याला पाजितोस, आणि त्याला मस्त करायासाठीं आपली दारू त्याच्या मुखांत घालितोस, त्यां त्यांचें नागवेपण पाहावें, ह्मणून त्या तुला हायहाय. उत्प. ४:९—११. निर्ग. २१: २८—३०. अनु. ३२:३३—३५. २ राजे. २१:९—१२. योह. ३:१९. (२८९.)

### ५२३ मद्य अगदीं वर्जावें.

रोम. १४:२१. मांस न खाणें व द्राक्षारस न पिणें, किंवा जेणेंकरून तुझा भाऊ ठेंचतो किंवा अडखळतो किंवा अशक्त होतो तें न करणें, हें उत्तम आहे. दान. १:८,१२,१५. लूक. १:१५. १ करिं. ५:११. (६.)

### ५२४ उपाध्य व अधिकारी यांस विशेषेंकरून मद्यपान मना केलें आहे.

लेवी. १०:८—११. गण. ६:१—४. नीति ३१:४,५. (१८३.)

## मनुष्यावरची प्रीति.

### ५२५ माणसांवर प्रीति करणें हें अवश्य आहे.

रोम. १३:८. तुह्मी कोणाचे ऋणी होऊं नका, केवळ एकमेकांवर प्रीति करणें; कां तर दुसऱ्यावर प्रीति करणाऱ्यानें नेमशास्त्र पूर्ण केलें आहे. ९,१०. १ करिं. १३:१३. १६:१४. गल. ५:१३,२२,२३. कल. ३:१४. १ तीम. ३:१२. १ पेत्र. ४:८. (२०२,२८०,२८९,३०२.)

## मर्यादशीलता.

### ५२६ मर्यादशीलता आणि लीनता पाहिजे.

रोम. १२:३, कां कीं जें कृपादान मला प्राप्त झालें त्यावरून मी तुह्मांतील प्रत्येकाला सांगतों कीं, जें योग्य त्यापेक्षां आपल्याला अधिक मानूं नका, तर देवानें प्रत्येकाला विश्वासाचा भाग दिल्हा आहे त्याप्रमाणें सुबुद्धीनें आपणाला माना. १०. नीति २५:६,७. मात्थी ११:

२९. २०:२६,२७. १ करिं. १३:४. गल. ५:२६. एफ. ४:१,२. फिलि. २:३. (२४४,५८३.)

### ५२७ सुकृत्यांविषयीं मर्यादशील असावें.

मात्थी ६:१. लोकांनी पाहावें अशा हेतूने तुह्मी आपला धर्म त्यांच्या समोर करूं नये याविषयीं जपा, नाहीं तर तुमच्या आकाशांतील बापा-पासून तुह्मास फळ मिळणार नाहीं. २–४. (७३०.)

## मरण.

### ५२८ मरण हें पापाचें फळ आहे.

रोम. ५:१२. यास्तव जसें एका माणसाकडून पाप जगांत आलें, आणि पापामुळें मरण, मग तसेंच सर्वांनी पाप केल्यावरून सर्व माणसां-वर मरण आलें. १७.

### ५२९ मनुष्य मात्रांस मरावें लागतें.

उत्प. ३:१९. तूं भूमींत परतून जासील तोंपर्यंत तूं आपल्या तोंडाच्या घामाने अन्न खासील, कां कीं तींतून तूं घेतलेला आहेस, यास्तव तूं माती आहेस आणि मातींत परत जासील. इयो. १६:२२. ३०:२३. गीत ८९:४८. उपदे. ८:८. जख. १:५. इब्री. ९:२७.

### ५३० मरण समय नेमला आहे.

इयो. ७:१. मनुष्याला पृथ्वीवर कष्टस्थिति नाहीं काय? जसे मोलक-ऱ्याचे दिवस तसे त्याचे दिवस नाहींत काय? १४:५,६,१४.

### ५३१ जिवाचा कर्त्ता हर्त्ता ईश्वर आहे.

अनु. ३२:३९. आतां तुह्मी पाहा, कीं मी हाच मी, आणि माझ्या संगतीं देव नाहीं; मी मरण देतों, जिणेंहि देतों; घायाळ करितों, बरेंहि मीच करितों, आणि माझ्या हातांतून सोडविणारा कोणी नाहीं. १ शमु. २:६. गीत ६८:२०. दान. ५:२३. (६७१.)

### ५३२ आयुष्य क्षणभंगुर आहे.

यशा. ४०:६, वाणी ह्मणाली, तूं हाक मार; तेव्हां त्याने ह्मटलें, काय हाक मारूं? सर्व मनुष्यजाति गवतच आहे, आणि तिची सर्व शोभा

माळ्यांतल्या फुलासारिखा आहे. ७. ६४:६. उत्प. ४७:९. १ काल. २९:१५. इयो. ८:९. ९:२५,२६. १४:१,२. गीत ३९:५. ९०:१० १०३:१५;१६. १४४:४. याक. ४:१४. १ पेत्र. १:२४. (६१७,६१८.

## ५३३ मरण वारंवार अवचित येतें.

१ शमु. २०:३. मग दावीद शपथ वाहून ह्मणाला, "तुझा बाप खचीत जाणतो कीं तूं माझ्याठायीं संतोषित आहेस, ह्मणून तो ह्मणतो, हें कार्य योनाथानाला कळूं नये, नाहीं तर त्याला दुःख होईल: परंतु परमेश्वराची शपथ आणि तुझ्या जिवाची शपथ मी करितों कीं माझा जीव मरणापासून केवळ पावलाच्या अंतरावर आहे." गीत १०२:२३,२४ उपदे. ९:१२. (६८६.)

## ५३४ मरण या जगांतला सहवास तोडितें.

इयो. ७:८ ज्याने मला पाहिलें त्याचा डोळा मजकडे पुन्हा दृष्टि लावणार नाहीं, तुझे डोळे मजवर असले ह्मणजे मी नाहींसा होतों. ९–१०. १४:७–१२,१९–२१. लूक १६:२७–२९.

## ५३५ दीर्घायुष्य इच्छास्पद आहे.

उत्प. १५:१५. आणि तूं आपल्या वाडवडिलांजवळ सुखरूप जासील, तूं चांगल्या ह्मातारपणीं पुरला जासील. गीत ९१:१६. १०२:२४. नीति ३:१६. यशा. ३८:१८,१९.

## ५३६ मरणाकडून जीवात्मा नाहींसा होत नाहीं.

२ करिं. ५:८. तर आह्मी धैर्य धरितों, आणि शरिराबाहेर प्रवास करून प्रभूपाशीं वस्ती करणें, हें आह्मास विशेष आवडतें. उपदे. ३: २१. १२:७. मात्थी २२:३२. लूक. १६:२२,२३. २३:४३, प्रेषि. ७: ५९. फिलि. १:२३. इब्री. १२:२३. प्रग. ६:९. (५४९.)

## ५३७ मरण नीतिमानास इच्छास्पद आहे, त्यांचें भय नाहींसें होतें.

फिलि. १:२१. कां तर मला जगणें हें ख्रीस्त, व मरणें हें लाभ. इयो. ३:१७,१८. ७:१६. गीत २३:४. ३१:५. ३७:३७. ११६:१५. नीति १४:३२. यशा. ५७:१,२. १ करिं. ३:२२. १५:५४–५७. २ करिं. ५:१,८. प्रग. १४:१३.

### ५३८ मरणाची वाट सहनतेने पाहणें.

इयो. १४:१४. जर मनुष्य मेला तर पुन्हा जीवेल काय? माझा पर्यय येई तोंपर्यंत मी आपल्या कष्टदशेचे सर्व दिवस आशा धरीत राहीन. विल. ३:२६. फिलि. १:२३–२५. (३६६.)

### ५३९ मरण दुष्टांस भयंकर.

लूक १२:२०. परंतु देवाने त्याला झटलें, अरे मूर्खा, याच रात्रीं तुझा प्राण तुजजवळ मागतील; तेव्हां त्वां तयार केलें तें कोणाचें होईल? इयो. २७:१९–२२. इब्री. १०:३१. (३८९.)

### ५४० मरणाची तयारी करणें भाग आहे–उदाहरणें.

१ पेत्र. ४:७. परंतु सर्व वस्तूंचा शेवट जवळ आला आहे; यास्तव शुद्धीवर असा, व प्रार्थनांसाठीं सावध असा. गीत ९०:१२. उपदे. ९:१०. मात्थी २४:४४. लूक १२:३५–३७. १ करिं. ७:७,८. २ करिं. ४:१८. फिलि. ३:२०. तित. २:११–१३. २ पेत्र. ३:११. (६१८,३८८.)

## माणसाचे हक्क.

### ५४१ स्वतंत्रता व न्याय यांचे हक्क.

विला. ३:३५,३६. अथवा परात्परासमक्ष पुरूषाचा न्याय दूर करावा, अथवा मनुष्याचा वाद बिघडावा, हें प्रभूला बरें वाटत नाहीं. इयो. ३६:६. यशा. १०:१,२. आम. ५:१२. गल. ५:१३. (२८६)

### ५४२ स्वतंत्रतेने विचार करून मत धरणें व सांगणें यांचे हक्क.

१ थेस्स. ५:२१. सर्वांची पारख करा, चांगलें तें धरा. लूक १२:५७. योह. ५:३९. १ करिं. १०:२९. १ योह. ४:१.

### ५४३ विद्याभ्यास करण्याचा हक्क.

नीति ४:१३. उपदेश धरून ठेव सोडूं नको, तो संभाळ, कां तर तो तुझें जीवनच आहे. २३:२३. लूक ११:५२. (१२,७४३.)

### ५४४ आपल्या मेहनतीचें फळ भोगण्याचे हक्क.

उपदे. ३:२२. तर मनुष्याने आपल्या कामांत हर्षावें यापेक्षां कांहीं

उत्तम नाहीं; का कीं हें त्याचा विभाग आहे, असें मला दिसलें; का कीं तो गेल्यावर जें कांहीं होईल तें पाहायाला त्याला कोण आणील. ५:१८.

### ५४५ आपली बायको व मुलें यांविषयीं हक्क.

उपदे. ९:९ तुझ्या व्यर्थतेच्या आयुष्याचे जे दिवस त्याने तुला सूर्याखालतीं दिल्हे आहेत, तुझे व्यर्थतेच्या सर्वच दिवसांत तुझी जी स्त्री तुला आवडती तिजसीं तूं आयुःसुख भोगीत जा; का कीं आयुष्यांत, आणि तूं जो आपला उद्योग सूर्याखालतीं करितोस, त्यांतहि तुझा विभाग हाच आहे. मात्थी १९:६. एफ. ६:४.

## माणूस.

### ५४६ मनुष्यमात्राचें एकच मूळ व थोरपण.

प्रेषि. १७:२६. आणि त्याने मनुष्यांचीं सर्व राष्ट्रें पृथ्वीच्या सर्व पाठीवर राहण्यासाठीं एकाच रक्तापासून केलीं, वँ त्यांचे पूर्वी नेमलेले समय व त्यांच्या वस्तीच्या सीमा त्याने नेमून ठेविल्या आहेत. २८. उत्प. १:२७,२८. गीत ८:३–६. मल. २:१०:

### ५४७ माणसांचें साहजिक ज्ञान.

इयो. ३२:८. तथापि मनुष्याच्या ठायीं तोच आत्मा आहे, आणि सर्वसामर्थ्याचा श्वास त्याला बुद्धि देतो. लूक १२:५७. (४९.)

### ५४८ माणसांची तर्कशक्ति, आणि ज्ञान, पवित्रता वगैरे सद्गुणांत वाढण्याची योग्यता.

इब्री. ५:१४. परंतु जड अन्न हें, जे पूर्ण ज्यांचीं इंद्रियें बऱ्यावाइटाचा निवाडा करण्यास सवयीने वहिवाटलेलीं आहेत, त्यांसाठीं आहे. ६:१. नीति १८:१. यहेझके. १२:२. (इर्म. ५:२१.) २ करिं. ८:१२. (३५२.)

### ५४९ माणसाचें अमरपण.

रोम. २:७. जे चांगल्या करण्यांत स्थिर राहून गौरव व सन्मान व अविनाश यांचा शोध करितात, त्यांस तो सर्वकाळचें जीवन देईल. ६, योह. १०:२७,२८. २ तीम. १:१०. (५३६,५५८.)

# मिशनें.

(मिशन ह्मणजे विधर्मी लोकांस जाऊन खरा धर्म शिकविणें.)

## ५५० मिशनें ईश्वराने नेमिलीं आहेत त्याचें अगत्य.

मात्थी २८:१९,२०. यास्तव तुह्मी जाऊन सर्व देशांतील लोकांस शिष्य करा; त्यांस बापाच्या व पुत्राच्या पवित्र आत्म्याच्या नामाने बाप्तिस्मा द्या. म्या ज्या आज्ञा तुह्मास दिल्या त्या सर्व पाळायास त्यांस शिकवा; आणि पाहा, काळाच्या समाप्तीपर्यंत मी तुह्माबरोबर सर्वकाळ आहें. आमेन. गीत ९:१७. ७४:२०. मार्क. १६:१५. रोम. २:१२. १०:१४,१५. (५५४,१७४.)

## ५५१ मिशनांस आश्वासन.

गीत ६८:३१. मिसरांतून सर्दार येतील, कुश देशांतील लोक उतावळी करून आपले हात देवाजवळ उभारतील. ११०:३. योएल. २:२८,२९. प्रेषि. २८:२८. (२७२,५९३.)

# मुकदमा.

## ५५२ अविश्वासणाऱ्यांसमोर मुकदमा करणें मना केलें आहे.

१ करिं. ६:१. तुह्मांतील कोणाचा दुसऱ्याशीं वाद असला, तर तो पवित्रांजवळ न जाता अधार्मिकांजवळ जाऊन न्याय ठरवून घ्यायाला धजतो काय? ६,७. मात्थी ५:४०. (नीति १९:११.)

# मूर्ख.

## ५५३ मूर्ख कोण आहेत ? (आरसा.)

### १. नास्तिक.

गीत १४:१. मूर्खाने आपल्या मनांत ह्मटलें कीं, "देव नाहीं." लोक

नासले; त्यानीं अमंगळ काम केलं आहे; चांगलें करणारा कोणी नाहीं. ९४:३–८. (३७१.)

## २. बहुभाष.

नीति १३:१६. प्रत्येक विवेकी विद्येने वर्त्ततो, परंतु मूर्ख आपला मुर्खपणा प्रगट करितो. १४:३३. १८:७. २९:११:२०. (३०२)

## ३. ईश्वरनिंदक.

गीत ७४:१८. हे परमेश्वरा, तूं असी आठवण कर कीं शत्रूने धिक्कार केला; आणि मूर्ख लोकानीं तुझें नाम तुच्छ मोजिलें आहे. २२. (६२०.)

## ४. बढाईखोर.

रोम. १:२२. ते आपण आपल्याला शाहाणे ह्मणवीत असतां मूर्खच झाले. (७३०.)

## ५. आज्ञाभंजक लेंकरें.

नीति १५:५. मूर्ख आपल्या बापाचा उपदेश अव्हेरितो, परंतु जो निषेध मानितो तो विवेकी आहे. २०. २२:१५. (५८८.)

## ६. ठक–आत्मठक–ढोंगी.

नीति १२:१५. मूर्खाला स्वमार्ग नीट दिसतो, परंतु जो उपदेश ऐकून घेतो तो सुज्ञ. १४:८. २६:१२. २८:२६. लूक ११:३९,४०. तित. ३:३. (७२९.)

## ७. हट्टी अन्याय करणारे.

नीति १३:१९. पुरविलेली इच्छा जीवाला गोड वाटती, परंतु दुष्कर्म सोडणें हें मूर्खास वीट असें वाटतें. २७:२२. अनु. ३२:५,६. (३०५.)

## ८. दारूबाज.

नीति २०:१. द्राक्षारस निंदक, मद्य क्षोभ चेतविणारें आहे; जो कोणी त्याने डगमगतो तो सुज्ञ नाहीं.

## ९. गप्पिदास.

उपदे. ५:३. कां तर काम पुष्कळ असल्याने स्वप्न पडतें; आणि पु-

फळ बोलल्याने मूर्खांची वाणी कळते. १०:१२–१४. नीति १०:८ १५:२. १८:७. (३०२.)

## १० मूढ.

नीति १:७. परमेश्वराचें भय ज्ञानाचा प्रारंभ आहे, परंतु मूर्ख हें ज्ञान व उपदेश अवमानितात. २२. १५:१४. १८:२. गीत २२:५. ६. (१२.)

## ११. ठकबाज.

इर्म. १७:११. जसी तित्तिरी अंडांवर बसते, आणि तीं फोडीत नाहीं, तसा जो न्यायावांचून द्रव्य मिळवितो तो आपल्या अर्धायुष्यांत तें सोडील, आणि आपल्या अंतकालीं मूर्ख निघेल.

## १२. रांडबाज.

नीति ७:६–९,२२,२३. (२०८.)

## १३. लडबडे.

नीति २०:३. विवाद सोडणें मनुष्याला शोभितें; परंतु प्रत्येक मूर्ख त्यांत गुंततो.

## १४. कृपण.

नीति १:३२, कां कीं निर्बुद्धीचें एकीकडे फिरणें हें त्यांला वधील आणि मूर्खांचें स्वस्थपण त्यांला नाशील. लूक १२:१९–२१. (३६२–३.)

## १५. थट्टेखोर.

नीति १४:९.

## १६. भटकणारे.

नीति १७:२४.

## १७. चाहडखोर.

नीति १०:१८.

## १८. जडबुद्धि.

नीति १७:१६. इर्म. ४:२२. (७२०.)

### १९. उडाऊ.

नीति २१:२०

### २०. विलासी.

नीति १०:२३ उपदे. ७:४. (२१२.)

### २१. भांडखोर.

इयो. ५:२. नीति १२;१६. १४:१६. १८:६. २०:३. २७:३. उपदे. ७:९. (५७७.)

## मूर्त्तिपूजा.

### ५५४ मूर्त्तिपूजक कसे आहेत.

रोम. १:२३. आणि त्यांनी अविनाशी देवाच्या गौरवाबद्दल नाशवंत मनुष्य, पांखरें, चतुष्पदें व वळवळणारे जंतु यांच्या मूर्त्ति करून मानिल्या. २१–२४,२९–३१. २ राजे १६:३. एफ. ४:१७–१९. (५५०.)

### ५५५ मूर्त्तिच्या ठायीं कांहींच देवपण नाहीं.

गीत ११५:४,५. त्यांच्या मूर्त्ति रूप्याच्या व सोन्याच्या; मनुष्यांच्या हातांचें काम अशा आहेत. त्यांस तोंडें आहेत, तरीं त्या बोलत नाहींत. त्यांस डोळे आहेत, तरीं त्या पाहत नाहींत. ६–८. यशा. ४६:६,७.

### ५५६ मूर्त्तिपूजा मना केली आहे.

निर्ग. २३:२४. तूं त्यांच्या देवांच्या पाया पडूं नको, आणि त्यांची सेवा करूं नको, आणि त्यांच्या कामांप्रमाणें करूं नको, परंतु त्यांस अगदीं पाड आणि त्यांच्या मूर्त्ति अगदीं फोडून टाक. २०:३–५. ३४:१७. लेवी. १९:४. २६:१. अनु. ६:१४,१५. २८:२४.

### ५५७ मूर्त्तिपूजकांस दंडसूचना.

निर्ग. २२:२०. परमेश्वराजवळ या एकावांचून दुसऱ्या देवाजवळ जो अर्पण करितो, त्याचा जिवोत्सर्ग केला जावा. अनु. ८:१९. २७:१५. ३०:१७,१८. न्याय. २:११–१४. १०:६,७. १ राजे ९:६,७. २ राजे

१७:९–१२. १६–२०. २२:१७. गीत ७८:५८,५९. इर्म. ४४:२–४. यहेज्के. ३६:१८,१९. (५७०,७२६.)

# मेलेल्यांचें पुन्हा उठणें.

## ५५८ सार्वजनिक पुन्हा उठणें होईल.

योह. ५:२८,२९. याविषयीं आश्चर्य करूं नका, का कीं असी वेळ येत आहे कीं तींत थडग्यांतले सर्व त्याची वाणी ऐकतील; आणि ज्यानीं चांगलीं कामें केलीं ते जीवनाच्या पुन्हा उठण्यास, आणि ज्यानीं वाईट कामें केलीं ते दंडाच्या पुन्हा उठण्यास बाहेर येतील. ६:४०. ११-२३,२४. इयो. १९:२६. होशे. १३:१४. लूक २०:३७,३८. प्रेषि: ४:१,२. २४:१५. २६:२८. रोम. ६:८,९. ८:२३. १ करिं. ६:१४:. १५:२१,२२. (सगळा अध्याय पाहा.) २करिं. ४:१४. १ थेस्स. ४ १६,१७.

## ५५९ मेलेले हे अविनाशी शरीरें पावून उठतील.

१ करिं. १५:४४. प्राणाचें शरीर असें पेरण्यांत येतें, आत्मिक शरीर असें उठविण्यांत येतें, प्राणाचें शरीर आहे व आत्मिक शरीर आहे. ३५–३७,४२–४३,५०,५२–५४. २ करिं. ५:२–४. फिलि. ३:२०,२१.

---

# यहूदी लोक ह्मणजे आब्राहामाचें संतान.

## ५६० यहूदी लोकांच्या संख्येविषयीं भविष्य वचन.

उत्प. १३:१६. आणि मी तुझें संतान पृथ्वीच्या रजाइतकें करीन, असें कीं जर कोणाच्याने पृथ्वीचे रज मोजवतील तर तुझें संतानहि मोजलें जाईल. २६:४. यशा. २७:६. ६०:२२. ३७:२६. होशे. १: १०: (उत्प. १५:५. १६:१०. २२:१७. २८:१४. गण. २३:१०. यशा. ६५:२३.)

## ५६१ यहूदी मुलखाचा विस्तार.

उत्प. १५:१८. त्याच दिवसीं परमेश्वराने आब्रामासीं असा करार

केला कीं, मिसरांतील नदीपासून फराद जी महानदी त्या नदीपर्यंत हा-
च देश म्या तुझ्या संतानाला दिल्हा आहे. १७:८. अनु; ३२:८,९.
यहोश. १:४. (गण. ३४:२–१२. उत्प. १२:७. १३:१४–१७. निर्ग.
६:४. ३२:१३.)

## ५६२ यहूदी लोकांचें दुष्टपण आणि त्यांची फांकाफांक होण्याविषयीं वचनें.

२राजे १७:६. होशाच्या नवव्या वर्षीं आश्शूराच्या राजानें शोम-
रोन घेतलें, आणि इस्राएलाला पाडाव करून आश्शूरास नेलें, आणि
त्यांस हलाहांत व नहर गोजानांतील हाबोरांत व मादाय् यांतल्या नग-
रांत ठेविलें. १८–२०,२३. अनु. २८:६४–६६. यहेज्के. २:३,७. ५.
५,६,९. ९:९. होशे. ९:१६,१७

## ५६३ यहूद्यांचें सुधारणें, एकत्र मिळणें, वचनाच्या देशाकडे परतणें आणि पुढील विशेष अबादी याविषयीं भविष्यें.

यशा. ११:११. आणि त्या दिवसीं असें होईल कीं, प्रभु आपल्या
लोकांचें शेष जें अश्शूरापासून व मिसरापासून व पाथ्रोसापासून व खु-
शापासून व एलामापासून व निशरापासून व हमाथापासून व समुद्रांत-
ल्या द्विपांपासून उरलें आहे, तें परत घ्यायास आपला हात पुन्हा ला-
वील. १३,१६. २७:६,१३. ४९:२२,२३. इर्म. ३:१७,१८. १६:१४–
१६. यहेज्के. २०:४०–४२. ३४:१३,२३–२९. ३६:१–१५,३३–३६:
३७:१–३,११–२८. ३९:२४,२५,२८,२९. होशे. १:१०,११. ३:४,
५. १४:५–७. आम. ९:१४,१५. मीख. २:१२,१३. ४:६,७. जख.
१०:६–८,१०. लूक २१:२४. (अनु. ३०:१–६. इर्म. २३:६–८. ४६:
२७,२८. मीख. ५:

## ५६४ यहूदी लोक परतण्यास अडथळ्याचें निवारण.

यशा. ११:१५. आणि मिसराच्या समुद्राची जीभ परमेश्वर कापून
टाकील, आणि आपल्या शुष्क वाऱ्यासहित आपला हात नदीवर हालवी-
ल, आणि तिला तिच्या सात फांद्यांसहित हाणील, आणि लोकाला जो-
ड्यासहित उतरवील. २७:१२. प्रग. १६:१२.

### ५६५ यहूदी मुलूख व वित्तविषय वाढण्याचीं भविष्यें.

यशा. ११:१४. मग ते पश्चिमेकडे पलिष्टींच्या खांद्यावर उडतील, ते मिळून पूर्वेतल्या लोकांला लुटतील, अदोम व मोवाब यांजला ते आपले हात लावितील, आणि अम्मोनाचे लोक त्यांला वश्य होतील. आम. ९:११,१२. ओब. १८:२०. (यशा. ५४:३.)

### ५६६ यहूदी लोक आपल्या देशाकडे परतत असतां वाटेचीं संकटें व लढाई.

इर्म. ३०:७, अहा तो एवढा मोठा दिवस आहे कीं, त्यासारिखा कोणताहि नाहीं; आणि तो याकोबाचा संकटसमय आहे, तथापि तो त्यांतून निभावेल. ११. यशा. ११:१४. यहेज्के. २०:३३–३८. ३८: ८,९,११,१२,१६,२१,२२. योएल. ३:१,२,१२,१७. मीख. ४:११–१३. जख. १०:११. १२:२,३,६,९. १३:८,९. १४:१,३,१२–१४, १६,२०. (जख. १०:१०–१२. इर्म. ३०:७–११.) २६८,२६९,२७०, ३९१,३८१.)

### ५६७ यहूदी लोक मनाचा पालट पावून ख्रीस्ताला अंगिकारतील.

मीखा. ४:२. आणि बहुत राष्ट्रें येऊन ह्मणतील, याहो, आपण परमेश्वराच्या पर्वतावर, आणि याकोबाच्या देवाच्या मंदिराकडे चढत जाऊं; ह्मणजे तो आपल्या मार्गाविषयीं आह्मांला शिकवील, मग आह्मी त्याच्या वाटांत चालूं; कां कीं सीयोनेंतून नेमशास्त्र, आणि यरूशलेमेंतून परमेश्वराचें वचन निघेल. यशा. २७:७,९. इर्म. ३१:१, १८–२०, ३१–३४. ३३:८. यहेज्के. ३६:२१–३२. होशे. १४:४, ८. जखा. १२:१०,११. रोम. ११:१५,१६,२४–२७. २करिं. ३:१५,१६.

---

## राष्ट्रिक.

### ५६८ राष्ट्राची व्यवस्था नेमली आहे.

उत्प. २१:१३ अणखी चाकरणीच्या पुत्रापासून राष्ट्र उत्पन्न होईल असें मी करीन, कां तर तो तुझें संतान आहे. अनु. ३२:८.

## ५६९ आज्ञांकित राष्ट्रांस आशीर्वाद पावण्याचीं वचनें.

गीत १३:६. मी परमेश्वराला गाईन कारण कीं त्याने मजवर उपकार केला आहे. ८१: निर्ग. १९:५, ६. लेवी. २६:३, ४, ६–१२. अनु. ४:५, ६, ४०. २८:१–१३. (५५, ३८१.)

## ५७० राष्ट्रांस अमान्यतेमुळें दंड सुचना व अरिष्टें.

यहेज्के. ३९:२३. आणि राष्ट्रें जाणतील कीं, इस्राएलाचे वंश आपल्या अन्यायामुळें पाडावपणाच्या प्रवासांत गेले; त्यांनी माझा अपराध केला, याकरितां म्या आपलें मुख त्यांपासून झाकून घेतलें, आणि म्या त्यांस त्यांच्या हातीं दिल्हें; मग ते सर्व तरवारीनें पडले. लेवी. २६: १४–३९. अनु. ४:२५–२७. २८:१५–२५, ३३, ३७–४८, ५८ ५९, ६२, ६३, ६६, ६७. २ काल. २४:२०–२४. नहे. ९:२५–३०. इर्मे. ४४:६–११. (२६९, ५६, ५५७, ५६६, ३९१, ३८१, ८.)

---

# लग्न.

## ५७१ लग्नाची स्थापना व शिफारस.

उत्प. २:१८. आणि परमेश्वर देव बोलला कीं, हा माणूस एकला असणें हें बरें नाहीं, मी ह्याच्यासाठीं ह्याच्या योग्य सहायकरी उत्पन्न करीन. २१, २२. नीति १८:२२. एफ. ५:३१, १तीम. ३:२. ४: १–३. ५:१४, १५. इब्री. १३:४. (गीत ६८:६. १०७:४१, ४२. १ करिं. ७:२.)

## ५७२ लग्नाविषयीं बोध व सूचना.

२ करिं. ६:१४. तुह्मी अविश्वास्यांच्या जोडीचे होऊं नका; कां कीं न्यायीपण व अधर्म यांचा काय संबंध? आणि उजेड व अंधार यांचा काय भागीपणा? उत्प. ६:२. अनु. ७:३, ४. आमो. ३:३. १ करिं. ७:३९.

## ५७३ स्त्री पुरुषांचे परस्परांसीं अवश्य धर्म.

एफ. ५:३३. तथापि तुह्मांतील प्रत्येकानें जसी आपणावर तसी आपापल्या बायकोवर प्रीति करावी; आणि बायकोनें आपल्या नवऱ्याची भीड राखावी. २१–२५, २८. तित. २:४, ५. (७१०.)

### ५७४ अनेक बायका करणें मना केलें आहे.

मला. २:१५. तर त्याने एक नेमिला नाहीं काय? आणि त्याजवळ आत्म्याचें शेष आहे. मग कशासाठीं तो एक? अशासाठीं कीं त्याने देवाचें बीज शोधावें. तर तुम्ही आपल्या आत्म्याला जपा, आणि कोणी आपल्या तरूणपणाच्या बायकोसीं विश्वासघाताने वर्त्तू नये. अनु. १७: १५, १७. १ राजे. ११:१. माथ्थी १९:९. मार्क १०:११, १२. १ तीम .३:२, १२.

### ५७५ सूटपत्र देण्याचा हिरमोड.

लूक. १६:१८. जो कोणी आपली बायको टाकून दुसरीसीं लग्न करितो, आणि नवऱ्याने टाकलेल्या बायकोसीं जो कोणी लग्न करितो तो व्यभिचार करितो. उत्प. २:२३,२४. मल. २:१५,१६. माथ्थी १९: ४-६, ८, ९. (मार्क. १०:२-१२.) रोम. ७:२, ३ १ करिं. ७: १०, ११.

## लढाई, भांडण, बळात्कार आणि राग.

### ५७६ लढाई आणि भांडण हीं बहुत झालीं आहेत.

उत्प. ६:११. परंतु देवाच्या दृष्टीस पृथ्वी नासली, आणि पृथ्वी बळात्काराने भरली. २ राजे. १९:११. यशा. १:१५. १०. १३. यहेज्के. ३३:२५, २६. (३०५, ७२८.)

### ५७७ रागीट व सूड उगविणाऱ्या मनोवृत्ति यांचें पाप व मूर्खपण.

ईयो. ५:२. कां कीं राग मूर्खाला वधितो आणि मत्सर निर्बुद्धिला मारितो. गीत ३७:८. नीति ११:१७. १४:१६, १७, २९. १५:१८. १३:३२. १९:१९. २२:२४. २४:१७, १८. २५:२८. २६:२१. २७:४. २९:२२. उपदे. ७:९. एफ. ४:३१. (५५३(२१,)८.)

### ५७८ भांडण व सूड उगविणें मना केलें आहे—दंड सुचना.

निर्ग. २०:१३. तूं हत्या करू नको. उत्प. ४९:४-७. (लूक. १८:

२०.) लेवी. १९:१८. गीत ५:६. नीति १७:१४. १८:६. २०:२२. २४:२९. २६:१७. ३०:३३ यहेज्के. २५:१२–१४. ३५:५,६. होशे. ४:२, ३. आमो. १:११. हब. २:१२. मात्थी. २६:५२. लूक ३:१४. रोम. १२:१७, १९. १ थेस्स. ५:१४, १५. याक. २:११. ३:१६. ४: १, १२. प्रग. १३:१०. (३०५–७, ३८१, ८.)

### ५७९ शत्रूसीं लढाई व भांडण टाळून कसें वर्त्तावें.

नीति १०:१२. द्वेष झगडे उठवितो, परंतु प्रीति सर्व अपराधांला आच्छादितो. १६:७. १८:२४. २५:१५, २१, २२. २९:८: मात्थी ५:३८–४५. लूक ६:३०,३५–३७. रोम. १२:१४, २०, २१. १ पेत्र. ३:८, १३. (२४४, ६६८, ७४२, ७१२, ५८३, ३६६, ६२३, ३४५.)

## लबाडी बोलणें.

### ५८० लबाडी बोलणें हें पाप फार रूढींत आहे.

यशा. ५९:३. कारण कीं तुमचे हात रक्ताने व तुमचीं बोटें अन्यायाने मळकटलीं आहेत, तुमचे ओंठ खोटें बोलतात, तुमची जीभ मुळमुळून सांगते. ४, १३, १४. इर्म. ९:२–६, ८. होशे. ४:१, २. मीखा. ६:१२. योह. ८:४४. (७२९.)

### ५८१ लबाडीची मनाई केली आहे.

निर्ग. २०:१६. तूं आपल्या शेजाऱ्याविषयीं खोटी साक्ष देऊं नको. लेवी. १९:११, १२. गीत ३४:१३. नीति ४:२४. एफ. ४:२५. कल. ३:९. १ पेत्र. ३:१०. (३०२, ३०३)

### ५८२ लबाडी देवाला त्रासदायक आहे.

नीति १०:१८. जो लबाड ओंठानी द्वेष गुप्त राखितो तो आणि जो चहाडी करितो तोहि मूर्ख आहे. ६:१६–१९. १२:१९, २२. १९: ९. गीत. ५:६. ५९:१२, १३. ६३:११. यशा. २८:१७. प्रेषि. ५: ३५–. प्रग. २१:८. २२:१५. (गीत ६२:३,४. नीति २१:६. जखा. ८:१६, १७.) (७५.)

## लीनता.

### ५८३ लीन असावें.

मात्थी १०:१६. पाहा, लांडग्यांमध्यें जसें मेंढरांस तसें मी तुह्मास

पाठवितों; यास्तव तुह्मी सापासारिखे चतुर व खबुत्रासारिखे साळसूद व्हा. जफ. २:३. गल. ६:१. एफ. ४:१–३. कल. ३:१२,१३. १ तीम. ६:११. २ तीम. २:२५. १ पेत्र. ३:३,४. (६६८,५२६, ३६६,६२३,५७९.)

### ५८४ लीनतेला शिफारस.

गीत २५:९. दिनांस न्यायाने नेतो; आपलाच मार्ग दिनांस शिकवितो. ३७:११. ७६:८,९. १४७:६. १४९.४. उपदे. ७:८. मात्थी ५:५.

### ५८५ लीनतेचीं उदाहरणें.

प्रेषि. ७:५९. तेव्हां ते स्तेफनसाला धोंड्यानीं मारीत असतां तो प्रभूचा धावा करीत बोलला कीं, हे प्रभू येशू, माझ्या आत्म्याचा स्वीकार कर. (२४४, ३४५.)

## लूट.

### ५८६ लूट मना केली आहे.

लेवी. १९:१३. तूं आपल्या शेजाऱ्यावर जुलूम करूं नको, आणि नाडूं नको; कामकऱ्याची मजुरी आपल्याजवळ सकाळपर्यंत राहूं देऊं नको. नीति २१:७. २२:२२,२३. २८:२४. यशा. ६१:८. यहेज्के. २२:२९–३१. (३०७,२८६,७,८,५७८.)

## लेंकरें.

### ५८७ लेंकरानीं आईबापासीं कसें वागावें.

निर्ग. २०:१२. परमेश्वर तुझा देव जो देश तुला देतो त्यांत तुझें आयुष्य दीर्घ व्हावें ह्मणून आपला बाप व आपली आई यांचा सन्मान कर. लेवी. १९:३. नीति १:८,९. ६:२०–२२. १३:१. २३:२२. मात्थी १५:४–६. लूक. २:५१. एफ. ६:१–३. कल. ३:२०. (६१९.)

### ५८८ लेंकरांस आईबापांचा अपमान करण्याबद्दल शिक्षा प्राप्त असावी.

नीति २०:२०. जो आपल्या बापाला अथवा आपल्या आईला शापितो त्याचा दीप निबिड अंधारांत विझून जाईल. ३०:१७. निर्ग. २१:१५, १७. अनु. २१:१८, २१. २७:१६. (१५.)

### ५८९ लेंकरांनी सत्य मार्ग धरावा—यास उदाहरणें व अश्वासन.

नीति ८:१७. जे मजवर प्रीति करितात त्यांजवर मी प्रीति करितों, आणि जे झटून मला शोधितात त्यांला मी सांपडेन. २२:६. १शमु. ३:८. २काल. ३४:१, ३. उपदे. १२:१. यशा. २८:९. २तीम. ३:१५.

## लोभ.

### ५९० लोभ फार रूढींत आहे.

फिलि. २:२१. कारण कीं ख्रीस्त येशूच्या गोष्टी नाहींत, आपल्याच गोष्टी सर्व शोधितात. (७१६.)

### ५९१ लोभाची मनाई—सूचना.

इब्री. १३:५. वर्त्तणूक निर्लोभ असावी; आपल्याजवळ आहे तेवढ्यानें तुह्मी तृप्त असावें; कां तर त्यानें असें ह्मटलें आहे कीं, मी तुला सोडणार नाहीं व तुला कधींहि टाकणार नाहीं. निर्ग. २०:१७. नीति २८:१६. लूक १२:१५–२१. एफ. ५:३. फिलि. २:४. कल. ३:५. (७४१,९.)

### ५९२ लोभिष्टांस दंडसुचना व शासन.

यशा. ५७:१७. मी त्याला त्याच्या लोभाच्या अन्यायामुळें कोपित होऊन हाणिलें, मी आपलें तोंड झांकून कोपित झालों, तथापि तो वांकडेपणें आपल्या हृदयाच्या मार्गांत चालत गेला. गीत १०:३. मीखा २:२,३. हब. २:९. १करिं. ५:११. ६:१०. एफ. ५:५. यहू. ११. (८.)

# वर्षसाहस्र.

## ५९३ पवित्रतेचा व सुखाचा वर्षसाहस्र या पृथ्वीवर येईल कीं काय?

गीत २२:२७. पृथ्वीच्या सर्व सीमांतले आठवण धरून परमेश्वराकडे फिरतील; तुझ्यापुढेंच राष्ट्रांतलीं सर्व कुटुंबें भजतील. ३७:११. ७२:६,७,११. ८६:९. यशा. २:२,४,१७,२०. २५:६–८. ३२:१५,१६. ४५:२२,२३. ४९:६. ६०:६५:१७–२२. ६६:२३. दान. ७:२७. मीखा. ४:१,२. हब. २:१४. मल. १:११. रोम. ११:२५–२७. २पेत्र. ३:१३. प्रग. २०:१–३. (गण. १४:२१. गीत ६७:४–७. ८२:८. यशा. ४९:८,९. ६५:१७–२३. प्रेषि. ३:२०–२५. प्रग. १५:४. (२७२.)

## ५९४ वर्षसाहस्र ही सार्वजनिक पवित्रतेची वेळ होईल कीं काय?

यशा. ६०:२१. तुझे सर्व लोक न्यायी होतील; आणि म्या गौरविलेलें व्हावें ह्मणून, जसें माझ्या लावण्याचें रोप माझें हाताचें कर्म, तसे ते सर्वकालपर्यंत भूमीचें वतन भोगितील. ६५:२५. इर्म. ३१:३३,३४. यहेज्के. ३६:२५–२९. ३७:२३,२४. एफ. ३:१३. जखा. १४:२०. रोम. ११:२५,२७. (अनु. १८:१५.) (४५९.)

## ५९५ वर्षसाहस्र ही शांतीची व ऐक्यतेची वेळ.

गीत ३७:११. परंतु जे दीन, ते पृथ्वीचें वतन पावतील, आणि बहुत कल्याणामुळें संतुष्ट होतील. ७२:३,७. यशा. ५२:८. ६०:१७,१८. ६६:१२. मीखा. ४:३,४. (गीत ७२:४,६.) यशा. २:४. ११:६–९.

## ५९६ वर्षसाहस्रांत खऱ्या ज्ञानाचा प्रसार होईल.

इब्री. ८:११. तेव्हां, प्रभूला जाण, असें प्रत्येक आपल्या शेजाऱ्याला व प्रत्येक आपल्या भावाला सांगून ते उपदेश करणार नाहींत; कां तर लहानापासून मोठ्यापर्यंत त्यांतले सर्व मला ओळखतील. यशा. ११:९. हब. २:१४. यशा. २९:१८,२४. ३३:६. इर्म. ३:१५.

### ५९७ वर्षसाहस्र हा ऊर्जितकाळ होईल.

यशा. ६०:१३. माझ्या पवित्रमंदिराचें स्थान सुशोभित करायाला लबानोनाचें गौरव म्हणजे देवदारू, भद्रदारू, व सरल हीं मिळून तुजकडे येतील; आणि मी आपल्या पदासनाला गौरवीन. ५–७. गीत ७२:१६. योएल. २:२१–२६. ३:१८. (यशा. २५:६. ३५:४१:१८.) (५९९.)

### ५९८ वर्षसाहस्र ही सुखाची वेळ होईल.

यशा २५:८. तो मरणाचा सत्यनाश करील, आणि प्रभु परमेश्वर सर्व मुखांवरील आसवें पुसील, आणि आपल्या लोकांची निंदा सर्व पृथ्वीवरून दूर करील; कां कीं परमेश्वर असें बोलला आहे. ३५:१०. ५२:९. ६५:१८, १९. जफ. ३:१४--१७.

### ५९९ वर्षसाहस्र मागल्या काळापासून निखालस होईल.

यशा. ५५:१३. कांटेऱ्या झाडाच्या स्थानीं देवदारू रुझेल, आणि बहुकंटक झाडाच्या स्थानीं सुरू उगवेल; आणि परमेश्वरासाठीं नाम व सर्वकाळचें अविनाशी चिन्ह होईल. ११:६–८. ४०:४,५. ४१:१८--२०. ६५:२५. (यशा. ३५:६,७. यहेज्के. ४७:८,९. प्रेषि ३:२१.)

## वस्त्रें.

### ६०० साधीं वस्त्रें नेसावीं.

१ पेत्र. ३:३,४. त्या तुमची शोभा ही केसांचें गुंफणें व सोन्याचे डागिणे घालणें, किंवा पोशाक करणें, अशी बाहेरली नसावी; तर जो नम्र व शांत आत्मा देवाच्या दिसण्यांत मोलवान आहे, त्याच्या अविनाशी शोभेने अंतःकरणांतील गुप्त मनुष्यपण असावें. ५. १ तीम. २:९, १०.

## विचार.

### ६०१ विचार करणें भाग आहे–अविचारी होऊं नये.

अनु. ३२:२९. ते ज्ञानी असते तर किती बरें होतें! त्यांनी हें सम-

जावें; आपल्या परिणामावर ध्यान लावावें. ४:३९. ईयो. ३७:१४. गीत २८:५. ५०:२१, २२. १११:४. नीति ४:२६. ६:६. उपदे. ७:१३: १४. यशा. १:३. ५:१२, १३. होशे. ७:२. हग्ग. १:५. (७२०.)

## विदेशी.

### ६०२ विदेश्यास न्याय, कृपा व आतिथ्य करणें भाग आहे.

इब्री. १३:२. आतिथ्य करणें विसरूं नका; कारण कीं तेणेंकरून कित्येकानी दूतांचें आतिथ्य न जाणतां केलें आहे. निर्ग. २२:२१. २३:९. लेवी. १९:१०, ३३, ६४. अनु. १:१६. १०:१८, १९. ईयो. ३१:३२. मात्थी २५:३५. (२९.)

## विनयवृत्ति.

### ६०३ विनयवृत्ति बाळगावी.

योह. १३:१४. यास्तव मी प्रभु व गुरू असतांहि म्यां तुमचे पाय धु-तले तर तुह्मांसहि एकमेकांचे पाय धुतले पाहिजेत. लूक. १४:१३, १४. रोम. १२:१६. (२४३, ७३.)

## विवेक–काटकसर.

### ६०४ विवेक व काटकसर करण्याचा धर्म व लाभ.

योह. ६:१२. आणि ते तृप्त झाल्यावर त्यानें आपल्या शिष्यांस सांगि-तलें, कांहीं फुकट जाऊं नये ह्मणून उरलेले तुकडे गोळा करा. नीति २:११, १२. ३:२१–२३. ८:१२. ११:२२. १२:१६. १९:११.

## विश्वास.

### ६०५ खरा विश्वास कसा आहे.

इब्री. ११:१. विश्वास तर आशेतल्या गोष्टींचा भरवसा, आणि ज्या

गोष्टी पाहिल्या नाहींत त्यांविषयीं खातरी, असा आहे. रोम. १०: ९, १०.

## ६०६ विश्वास हें पुण्य असें मोजलें जातें.

रोम. ४: ११. आणि असुंती असनांना त्याचा विश्वास, याच्या न्यायीपणाचा शिक्का होण्याकरितां सुंता ही खूण त्याला मिळाली; यासाठीं कीं जे असुंती असनांना विश्वास ठेवितात त्या सर्वांचा तो बाप व्हावा, असें कीं त्यांसहि न्यायीपण मोजावें. ३–८.

## ६०७ तारण पावण्यास ख्रीस्तावर व खरेपणावर विश्वास ठेवण्याचें अगत्य.

मार्क. १६: १६. जो विश्वास धरील व बाप्तिस्मा घेईल त्याचें तारण होईल; परंतु जो विश्वास धरणार नाहीं तो अन्यायी ठरेल. १५, योह. १: १२. ३: १६, १८, ३६. ६: २८, २९, ४०, ५३, ५४. ८: २४, ४७. ११: २५, २६. प्रेषि. १०: ४३. १६: ३१. रोम. १०: ४. गल. २: १६. २ थेस्स. २: १०–१२. इब्री. ११: ६. १ योह. ३: २३. ५: १०–१३. २ योह. ९–११. ३ योह. ४. (५१७, ४५२.)

## ६०८ विश्वास धरण्याचीं उदाहरणें.

गल. २: २०. मी ख्रिस्ताबरोबर खांबीं दिल्हेला आहें, तरी मी वांचतों तथापि मी नव्हें, तर ख्रीस्त मजमध्यें वांचतो, आणि आतां देहांत जें माझें जिणें आहे तें देवाच्या पुत्रावरच्या विश्वासानें आहे, त्यानें मजवर प्रीति केली व आपणाला मजकारितां दिल्हें. रोम. ४: २०, २१. २ करिं. ५: ७, ८. इब्री. ११: ७–१०, १३. (३४९.)

## ६०९ विश्वासाचीं फळें.

इब्री. ११: ३२. तर मी अणखी काय बोलूं? कारण कीं गीदोन व बाराक व शामशोन व इफ्ताह व दावीद व शमुवेल व भविष्यवादी, याविषयीं विस्तारानें सांगायास मला वेळ पुरणार नाहीं. ३३. १ पेत्र. १: ८, ९. १ योह. ५: ४, ५.

## ६१० विश्वासाचीं लक्षणें.

याक. २: १८. परंतु कोणी ह्मणेल, तुला विश्वास आहे, आणि मला करणीं आहेत, तूं आपला विश्वास आपल्या करण्यांवांचून मला दाखीव,

आणि मी आपला विश्वास आपल्या करण्यांकडून तुला दाखवीन. १४–१७. (५५,४५३.)

## ६११ विश्वास दृढ व स्थिर असावा.

एफ. ६:१०. शेवटीं माझ्या भावानों, प्रभूकडून व त्याच्या शक्तीच्या बळाकडून सबळ व्हा. ११–१३. (७११)

## ६१२ विश्वासासाठीं झटावें.

फिलि. १:२७. केवळ ख्रीस्ताच्या शुभवर्त्तमानास योग्य असें आचरण करा, यासाठीं कीं जर मी येऊन तुह्मास पाहतों किंवा दूर आहें, तर म्या तुह्माविषयीच्या गोष्टी अशा ऐकाव्या कीं, तुह्मी एका चित्तानें स्थिर राहून, एका जिवानें शुभवर्त्तमानाच्या विश्वासासाठीं एकत्र झटतों. योह. १८:३७. प्रेषि. ६:९,१०. ९.२१. १७:१६,१७. १९:८–१०. यहु. ३. (१८४.)

## ६१३ चमत्कार साधक विश्वास–यांविषयीं विशेष वचनें.

योह. १४:१२. मी तुह्मास खचीत खचीत सांगतों, मी जीं कामें करितों तीं मजवर विश्वास ठेवणाराहि करील, आणि त्यांपेक्षां मोठींहि करील, कारण कीं मी बापाकडे जातों. १३. मात्थी १४:२९–३१. २१:२०–२२. मार्क. ११:२३,२४. १६:१७,१८. याक. ५:१४,१५. (२२१.)

## ६१४ चमत्कार साधक विश्वास हा तारक होता कीं काय?

१ करिं. १३:१,२. मी मनुष्यांच्या व दुतांच्या भाषा बोलत असलों, तरी मला प्रीति नसल्यास मी वाजणारें पितळ किंवा झणझणणारी झांज, असा झालों आहें. आणि मला भविष्यज्ञान असलें, आणि मला सर्व गुजें व सर्व विद्या समजली, आणि डोंगरांस ढळवावें असा मला पूर्ण विश्वास असला, तरी मला प्रीति नसल्यास मी कांहींच नाहीं. मात्थी ७:२२,२३.

## ६१५ खोटा विश्वास व वाह्योपचार हे साधारण व नाशकारक आहेत.

गीत १०६:१२,१३. यशा. २९:१३. ५८:२,३. इर्म. ३:१०. य-

हेज्के. ३३:३१. मात्थी १३:२०,२१. १५:७,८. योह. ६:२६. प्रेषि. ८:१३,२१. रोम. १०:२. १करिं. १३:१—३. गल. १:१३,१४. ५: ६. २तीम. ३:५. याक. २:१९. (२०१,५,३६०,४३४,६८२,७१६, ७२९,७३१.)

# विषयपणा.

## ६१६ विषयपणा निषेधला आहे.

२करिं. ७:१. यास्तव अहो प्रियानो, आह्मास हीं वचनें आहेत, ह्मणून आह्मी आपणांस देहाच्या व आत्म्याच्या सर्व अशुद्धपणापासून शुद्ध करून देवाच्या भयाने पवित्रपण पूर्ण करावें. आम. ६:३—७. रोम. ६: १२. १३:१३,१४. तित. २:११,१२. १ पेत्र. २:११. (५२१,७२५.)

# वेळ.

## ६१७ वेळ थोडी आहे.

गीत ८९:४७. माझें आयुष्य किती आहे, याची आठवण कर; त्वां मनुष्यांच्या सर्व संतानांस कशासाठीं व्यर्थ उत्पन्न केलें? १करिं. ७: २९—३१. (५३२.)

## ६१८ वेळ सुधारली पाहिजे—लोटालोटी मना केली आहे.

नीति २७:१. उद्याच्या दिवसाविषयीं फुशारूं नको, का कीं एक दिवस काय प्रसवेल, हें तुला ठाऊक नाहीं. इयो. २२:२१. गीत. ९५: ७—९. उपदे. ९:१०. २ करिं. ६:२. इब्री. २:१. (५४०,४०५—८,७३७.)

# वृद्ध माणसें.

## ६१९ वृद्ध माणसांसीं कसें वागावें.

१ पेत्र. ५:५. त्याप्रमाणें, अहो तरुणानो, वडिलांस मान्य असा, आणि तुह्मी सर्व एकमेकांस मान्य होऊन नम्रता पांघरलेले असा, का कीं देव गर्विष्ठांचा विरोध करितो, परंतु नम्रांवर कृपादान करितो. लेवी. १९:३२. १तीम. ५:१,२. (३०३.)

## शपथ वाहणें.

### ६२० व्यर्थ शपथ वाहणें हें मना केलें आहे—दंडसूचाना.

निर्ग. २०:७. परमेश्वर तुझा देव याचें नाम व्यर्थ घेऊं नको, कां कीं जो त्याचें नाम व्यर्थ घेतो त्याला परमेश्वर निर्दोषी असें मानणार नाहीं. लेवी. १९:१२. २४:१०–१६. इर्म. २३:१०. होश. ४:२,३ जख. ५:३. मात्थी ५:३४–३७. याक. ५:१२.

### ६२१ उतावळीने शपथ वाहिल्याचीं उदाहरणें.

न्याय ११:३०,३१. मात्थी १४:६–९. प्रेषि. २३:१२.

### ६२२ खचिती करण्याच्या शपथा. उदाहरणें.

अनु. १०:२०. तूं आपला देव परमेश्वर याचें भय धर, त्याची सेवा कर, आणि त्याला लकटून राहा; त्याच्याच नामानें शपथ कर. नहे. ५:१२. गीत १५:१,४. उपदे. ८:२. मात्थी २६:६३,६४. २ करिं. १:२३. इब्री. ६:१६,१७.

## शांति.

### ६२३ शांत व सौम्य स्वभाव धरावा—याचीं आश्वासनें व उदाहरणें.

गीत ३४:१४. वाइटापासून फीर आणि चांगलें कर; शांति शोध आणि तिला अनुसर. नीति १५:१. इर्म. २९:७. मात्थी ५:९. रोम. १२:१०,१८. १४:१९. १ करिं. ७:१५. २ करिं. १३:११. गल. ५:२२.२३. एफ. ४:१–३,३२. फिलि. २:१४,१५. कल. ३:८,१५. १ थेस्स. २:७. ५:१३. २ तीम. २:२४,२५. इब्री. १२:१४. याक. ३:१७ १ पेत्र. ३:१०,११. (२४४,६६८,५८३,३८५,५७९.)

### ६२४ खोटें शांतवन करणारे.

इर्म. ६:१४. आणि कांहीं कुशल नसतां, कुशल कुशल, असें ह्मणून त्यांनीं माझ्या लोकांच्या कन्येची जखम हलकेपणानें बरी केली आहे. यहेज्के. १३:१०,११. (६१५.)

# शाब्बाथ.

## ६२५ शाब्बाथ एदन् बागांत स्थापला होता.

उत्प. २:३. आणि देवानें सातव्या दिवसाला आशीर्वाद दिल्हा आणि त्याला पवित्र केलें, कारण कीं त्यांत आपलें सर्व जें उत्पत्तीचें काम त्यापासून स्वस्थ राहिला. २. निर्ग. २०:११.

## ६२६ शाब्बाथ पाळावा असें जुन्या करारांत दाहा आज्ञांमध्यें व दुसऱ्या कोठकोठें सांगितलें आहे.

अनु. ५:१४. परंतु सातवा दिवस तुझा देव परमेश्वर याच्या विसांव्याचा दिवस आहे; त्यांत तूं कांहीं काम करूं नको, तूं व तुझा पुत्र व तुझी कन्या व तुझा दास व तुझी दासी व तुझा बैल व तुझा गाढव व तुझा कोणी पशु व तुझ्या दरवाज्याच्या आंत जो जवळचा विदेशी यांस करूं देऊं नको; ह्मणजे तुझ्या चाकरानें व तुझ्या चाकरणीनें तुझ्यासारिखा विसांवा घ्यावा. निर्ग. २०:८–१०. नहे. १३:१५–१८. यहेज्के. ४४:२४.

## ६२७ शाब्बाथाचा प्रभु, जो ख्रीस्त त्यानें शाब्बाथ ओळखून त्यांतील दयेचीं योग्य कामें सांगितलीं.

मार्क. ३:४. मग त्यानें त्यांस ह्मटलें, शाब्बाथ दिवसीं चांगलें करणें किंवा वाईट करणें, जिवाला राखणें किंवा मारणें, कोणतें योग्य बरें? तेव्हां ते उगेच राहिले. २:२७,२८. मात्थी १२:१–५,११–१३. २४:२०. (मार्क. २:२३–२८. लूक ६:१–१०.) लूक १३:११–१७. योह. ५:८–१०,१६,१७.

## ६२८ शाब्बाथाचीं योग्य कामें कोणतीं.

लेवी. १९:२०. अणखी जी स्त्री दासी असून पुरुषाला वाग्दत्त झाली, आणि खंडून सोडविलेली नाहीं, आणि जिला मोकळीक दिल्ही नाहीं, तिजसीं जर कोणी संग करील, तर शासन व्हावें, परंतु त्यांस जिवें न मारावें, कारण कीं ती मोकळीक नव्हती. यहेज्के. ४६:३. मार्क. ६:२. लूक ४:१६,३१. १३:१०. प्रेषि. १३:१४–१६,४२,४४. १५:२१. १७:२०. १८:४. १करिं. १६:२. इब्री. १०:२५. (यशा. ६६:२३. गीत ४:१–१०. १३२:७.)

### ६२९ शाब्बाथ पवित्र पाळून संसारांतलीं कामें करूं नयेत.

लेवी. २३:३. साहा दिवस काम करावें, परंतु सातव्या दिवसीं विसांव्याचा शाब्बाथ व पवित्र मेळा असावा; त्यांत तुह्मी कांहीं काम करूं नका; तो तुमच्या सर्व ठिकाणीं परमेश्वरासाठीं शाब्बाथ असावा. २६:२. निर्ग. १६:२३–३०. २०:८–११. २३:१२. ३१:१३–१७. ३४:२१. ३५:३. अनु. ५:१२–१५. इर्म. १७:२१,२२,२७. मात्थी २४:२०. लूक २३:५६.

### ६३० शाब्बाथ पाळण्याचें फळ.

यशा. ५६:२,६,७. ५८:१३,१४. इर्म. १७:२४,२५.

### ६३१ शाब्बाथ मोडण्याचें फळ.

निर्ग. ३५:२. साहा दिवस काम करायाचें आहे, परंतु सातव्या दिवसीं तुह्मास परमेश्वरासाठीं विसांव्याचा पवित्र शाब्बाथ व्हावा; जो कोणी त्यांत काम करितो, तो जिवें मारिला जावा. गण. १५:३२,३५. इर्म. १७:२७. यहेज्के. २०: १५–२१. २२:२६,३१.

### ६३२ ख्रीस्त मेलेल्यांतून उठल्यावर ख्रिस्ती लोक सप्तकाचा पहिला दिवस पाळूं लागले.

योह. २०:१९. नंतर त्याच दिवसीं ह्मणजे सप्तकाच्या पहिल्या दिवसीं संध्याकाळ झाल्यावर, जेथें शिष्य मिळाले होते तेथील दारें यहूद्यांच्या भयामुळें बंद असतां, येशू येऊन व मध्यें उभा राहून त्यांस ह्मणाला, तुह्मास शांति असो. मार्क. १६:९. गीत ११८:२४. मात्थी २८:१, ८,९. प्रेषि. २०:७. १करिं. १६:२. प्रग. १:१०.

## शुभवर्त्तमान ह्मणजे तारणोपाय.

### ६३३ शुभवर्त्तमानाचें मूळ ईश्वराच्या सनातन संकेतांत आहे.

एफ. ३:११. त्याप्रमाणें देवाचें बहुत प्रकारचं ज्ञान, हें आकाशांत-

त्या सत्तांमध्यें व अधिकारांमध्यें मंडळीकडून आतां कळवावें. १:३,४. १ पेत्र. १:१९,२०. (९४–९६.)

## ६३४ शुभवर्त्तमान हा कृपेचा उपाय.

प्रेषि. २०:२४. तथापि मी कशाचीहि काळजी करीत नाहीं, आपला प्राणहि मी प्रिय मानीत नाहीं, यासाठीं कीं म्या आपली धाव आणि देवाच्या कृपेच्या शुभवर्त्तमानाची साक्ष देण्याची जो सेवा मला प्रभु येशूपासून प्राप्त झाली, ती हर्षानें शेवटास न्यावी. रोम. ५:२१. (१७०.)

## ६३५ शुभवर्त्तमानाच्या अटी नेमशास्त्राहून वेगळ्या आहेत.

प्रेषि. २:३८. मग पेत्रस त्यांस ह्मणाला, पश्चात्ताप करा; आणि येशू ख्रीस्ताच्या नांवानें तुह्मांतील प्रत्येक बाप्तिस्मा घेवो, पापाची क्षमा व्हावी ह्मणून; मग पवित्र आत्म्याचें दान तुह्माला प्राप्त होईल. मार्क. १६: १५,१६. २ करिं. ५:१८–२०. गल. ३.१०–१२. कल. १:२०,२१. (६०७,४३१.)

## ६३६ शुभवर्त्तमानाचा उपाय सर्वांसाठीं आहे.

एफ. १:९,१०. त्यानें आपला मनोदय आपल्या आपण पूर्वी योजिला त्याप्रमाणें आपल्या इच्छेचें गुज आह्मास कळविलें. कीं जीं आकाशांमध्यें व जीं पृथ्वीवर तीं अवघीं काळांच्या पूर्णपणाच्या चालविण्यांत ज्या ख्रीस्ताकडून आह्मी वतन पावलों त्याकडून एकत्र करावीं. ११,१२. ३: ८–१२. (९६.)

## ६३७ जसें नेमशास्त्रांत तसें शुभवर्त्तमानांतहि पूर्ण असावें ह्मणून सांगितलें आहे.

मात्थी ५:४८. यास्तव जसा तुमचा आकाशांतील बाप पूर्ण आहे, तसे तुह्मी पूर्ण व्हा. रोम ६:१५. (१२९,४५४.)

## ६३८ शुभवर्त्तमान अव्हेरण्याचें भयंकर फळ.

योह. ३:१९. आणि अन्यायी ठरण्याचें कारण हेंच आहे कीं, जगांत उजेड आला असतां माणसांनीं उजेडापेक्षां अंधाराची आवड अधिक धरिली, कारण कीं त्यांचीं कामें वाईट होतीं. मात्थी ७:२६,२७. ११:२०–२४. १२:४१. (लूक ११:३१,३२.) १२:४७,४८. इब्री. १०:२६–२९. (५०७,४१३.)

# सर्कार.

## ६३९ सर्कारची ईश्वरी स्थापना.

प्रेषि. १३:२०. आणि त्यानंतर त्याने सुमारें साडे चारशें वर्षे शमुवेल भविष्यवादी याच्या वेळेपर्यंत त्यांस न्यायाधीश नेमून दिल्हे. निर्ग. १८:२५,२६. गण. ११:११,१६,१७. (अनु. १:९–१८.) गण. २७: १५–२०. अनु. १६:१८,१९. नीति ८:१२,१५,१६. रोम. १३: ३–६.

## ६४० सर्कार व नेमलेलें शासन यांचा उपयोग.

नीति २०:८. राजा न्यायाच्या सिंहासनावर बसला असतां आपल्या डोळ्यानीं सर्व दुष्कर्म उडवून टाकितो. २६. अनु. १३:१०,११. १९: १८–२०. २ काल. ९:८. २६:३. २०:३०. यशा. १:२६. १ तीम. १: ८–१०. (१५.)

## ६४१ अधिकारी कसे असावे.

निर्ग. १८:२१. तथापि तूं सर्व लोकांतून गंभीर मनुष्य, देवाला भिणारे, सत्यतेचे मनुष्य, लांचेचा द्वेष करणारे, असे पाहून हे त्यांजवळ हजारांचे अग्रसर, शंभरांचे अग्रसर, पन्नासांचे अग्रसर, दाहांचे अग्रसर असे करून ठेव. अनु. १:१३,१५. २ शमु. २३:३.

## ६४२ अधिकाऱ्यांचीं कर्त्तव्य कामें.

नीति १६:१२. दुष्टता करण्याचा वीट राजाला येतो, कां कीं सिंहासन न्यायत्वाने स्थिर राहतें. २०:२८. २९:१४. ३१:४,५. अनु. १६: १७. १६:१९. १७:१५,१८–२०. १९:१८,१९. २५:१,२. गीत ८२: २-४. इर्म. २२:२,३,१५,१६. यहेझ्के. ४५:९,१०. ४६:१८.

## ६४३ अधिकाऱ्यांसीं प्रजेने कसें वागावें.

उपदे. ८:२. राजाची आज्ञा पाळ, देवाच्या शपथेमुळें ती पाळ, असें मी ह्मणतों. निर्ग. २२:२८. (प्रेषि. २३:४,५.) अनु. १७:९–११. मात्थी १७:२४–२७. २२:२०,२१. रोम. १३:१.२,५–७. १ तीम. २: १–३. तित. ३:१. १ पेत्र. २:१३–१७.

## ६४४ सर्कारानें अपराध्यांस शासन लावावें असें ईश्वरानें नेमलें आहे.

रोम. १३:४. कां कीं तो तुझ्या बऱ्यासाठीं देवाचा सेवक आहे. प-

रंतु तूं वाईट करितोस तर भय धर; कां कीं तो तरवार व्यर्थ बाळगीत नाहीं, कां तर तो देवाचा सेवक, वाईट करणाऱ्याला क्रोधयुक्त दंड करणार आहे. उत्प. ९:५,६. निर्ग. २१:१२–१७. गण. ३५:३०–३४. अनु, १९:१८,१९. २५:१–३. नीति २०:२६. २८:१७. प्रेषि. २५. १०,११.

६४५ यहूदी नेमशास्त्रांत सांगितलेले प्राणदंडाचे अपराध.

१. खून.

गण. ३५:१६.

२. दुर्भाषण.

लेवी. २४:१६.

३. माणसांस चोरणें.

निर्ग. २१:१६. १ तीम. १:९.

४. मूर्त्तिपूजा.

निर्ग. २२:२०. (अनु. १७:२.)

५. मूर्त्तिपूजा करण्यास फुसलावणें.

अनु. १३:६,९.

६. व्यभिचार.

लेवी. २०:१०.

७. पुरुष मैथून.

लेवी. २०:१३,१७–२०.

८. गोत्रगमन.

लेवी. २०:१४,२१.

९. पशुमैथून.

लेवी. २०:१५,१६.

१०. चेटक.

निर्ग. २२:१८.

११. आईबापांस मारणें.

निर्ग. २१:१५. (५८८.)

१२. आईबापांस शाप देणें.

निर्ग. २१:१७. (लेवी. २०:९.)

१३. आईबापांच्या आज्ञा मोडणें.

अनु. २१:२०,२१.

१४. शाब्बाथ मोडणें.

निर्ग. ३५:२. गण. १५:३२.

१५. माणसांला प्राणसंकटांत पाडणें.

निर्ग. २१:२९.

६४६ सर्काराविरुद्ध चालणें साधारण आहे—याचें फळ.

२पेत्र. २:९, १०. तर सुभक्तिमानांस परीक्षेंतून सोडवायाला व जे अन्यायी त्यांस न्याय ठरण्याच्या दिवसीं दंड करण्यासाठीं राखायाला प्रभु जाणतो. आणि विशेषेंकरून जे अमंगळ इच्छेने देहाप्रमाणें चालतात व धनीपण तुच्छ मानितात, त्यांस दंड करील; ते उद्धट, स्वच्छंदी, गौरवांची निंदा करितांना भीत नाहींत. गण. १६:३–७, ३२. अनु. १७:१२, १३. यहू. ८.

६४७ दुष्ट अधिकारी त्रासदायक आहेत.

१राजे. १४:१६. असी यराबामाने जीं पापें केलीं आणि जीं इस्राएलाकडून करविलीं त्यांमुळें तो त्यांस टाकून देईल. २काल. ३३:९–११. गीत १२:८. ९४:२०, २१. नीति २८:१५, १६. २९:२,४.

६४८ अधिकाऱ्यांचे अयोग्य हुकूम मोडावे हें उचित आहे.

दानि. ६:१३. मग ते राजासमोर उत्तर करीत ह्मणाले, हे राजा, यहूद्यांच्या पाडावांतला जो दानीयेल आहे, तो तुला आणि ज्या ठरावावर त्वां सई घातली आहे, त्यालाहि मानीत नाहीं; परंतु प्रतिदिवसीं तीन

वेळां तो विनंती करीत जातो. ३:१६–१८. निर्ग. १:१७, २०. १शमु. १४:४४, ४५. प्रेषि. ४:१९. ५:२७–२९.

## सत्यधर्मत्यागी.

### ६४९ सत्य धर्मत्याग्यांचीं उदाहरणें व भयंकर परिणाम–त्यांस दंडसूचना.

१शमु. १५:११. "म्या शाऊलाला राजा केलें यावरून मला दुःख होतें, कां कीं त्यानें माझें मानणें सोडून माझ्या आज्ञा मोडिल्या आहेत." तेव्हां शमुवेलाला खेद झाला, आणि त्यानें संपूर्ण रात्रीं देवापासीं प्रार्थना केली. १काल. २८:९. यहेज्के. ३:२०. १८:२४. ३३:१८. होशे. ६:४. मात्थी २५:८. लूक ९:६२. योह. ६:६६. गल. ५:४. १तीम. १:१९. २तीम. १:१५. २पेत्र. २:२०–२२. (४९५, ४९९.)

### ६५० सत्यधर्मत्याग्यांस पुन्हा सुधारणें अवघड.

इब्री. ६:४–६. १०:२६, २७.

### ६५१ सत्यधर्मत्यागी वास्तविक पुनर्जन्म कधीं पावले कीं काय?

१योह. २:१९. ते आमच्या मधून निघाले, परंतु ते आह्माकडले नव्हते, कां कीं ते आह्माकडले असते तर आमच्या संगतीं राहिले असते, परंतु ते सर्व आह्माकडले नाहींत असें प्रगट व्हावें ह्मणून ते निघाले. मात्थी ७:२२, २३. १५:१३. मार्क ४:१६, १७. योह. ६:७०. १७:१२. (३१०–१२.)

## सदसद्विवेक.

### ६५२ सदसद्विवेक सर्वांच्या ठायीं आहे.

रोम. २:१४, १५. कां तर ज्या विदेशी लोकांस शास्त्र नाहीं, ते स्वभावानें शास्त्रांतील गोष्टी पाळितात, तेव्हां त्यांस जरी शास्त्र नाहीं तरी ते आपणच आपल्याला शास्त्र आहेत. ते आपल्या अंतःकरणांत शास्त्रनेम लिहिलेला आहे असें प्रगट करितात; त्यांस त्यांचा सदसद्वि-

वेक साक्षी आहे, आणि त्यांच्या कल्पना त्यांस परस्परें दोष लावितात किंवा अनुमोदन देतात. नीति २०:२७. यशा ५:३. योह. ८:९. २करिं. ४:२. (५४२.)

## ६५३ सदसद्विवेक कधीं मंद व मलीन होतो.

१ करिं. ८:७. तथापि हें ज्ञान सर्वांस नाहीं; तर कित्येक, मूर्त्ति कांहीं आहे असा भाव धरून अझूनहि मूर्तीचा नैवेद्य असा मानून तो खातात, आणि त्यांचा भाव अशक्त असल्यावरून अशुद्ध होतो. इर्म. ६:१५. जफ. ३:५. इब्री. ९:१४. १तीम. ४:२. तित. १:१५.

## ६५४ सदसद्विवेक भ्रमिष्ट व मलीन झाला असतां कुमार्गांत नेतो.

योह. १६:२. ते तुह्मास सभेंतून घालवितील, अणखी असी वेळ येत आहे कीं, जो कोणी तुमचा जीव घेईल त्याला, आपण देवाची सेवा करितों असें वाटेल. प्रेषि. २६:९–११. (१२.)

## ६५५ सदसद्विवेक सर्वकाळ मंद असणार नाहीं.

उत्प. ४२:२१. तेव्हां ते एकमेकांसीं बोलले, हाहा आह्मी आपल्या भावाविषयीं दोषी आहों, कां कीं आह्मी त्याच्या जिवाचें संकट पाहिलें, जेव्हां तो आह्माजवळ काकुळती करीत होता, तेव्हां आह्मी ऐकिलें नाहीं, त्यासाठीं हें संकट आह्मास लागलें. निर्ग. ९:२७. मात्थी २२:११, १२. रोम. ३:१९. (३९८(२.))

## ६५६ सदसद्विवेकाला प्रकाशित करून त्याच्या सूचना मानाव्या.

प्रेषि. २३:१. मग पौलस सभेकडे नीट पाहून ह्मणाला, अहो भावानो, मी आजपर्यंत पूर्ण सद्भावेंकरून देवासीं वर्त्तलों. २४:१६. रोम. १३:५. १तीम. १:१९. इब्री १३:१८. १पेत्र. २:१९. ३:१६.

## ६५७ दुसऱ्यांच्या सदसद्विवेकाची भिडभाड राखावी.

१ करिं. ८:१०–१३. १०:२७–२९.

## ६५८ सदसद्विवेकावरून मोठें सुख किंवा भारी दुःख होतें.

नीति १४:१४. बिघडलेल्या हृदयाचा मनुष्य आपल्या मार्गांनी, व चांगला माणूस आपल्याने तृप्त होईल. १८:१४. २करिं. १:१२. (३९८.)

# सद्गुणाचे उपाय.

## ६५९ सद्गुणाचे उपाय नेमले आहेत.

नीति ६:२३. कां कीं आज्ञा दीप आहे, आणि नेम प्रकाश आहे, आणि संबोधाचे निषेध हे जीवनाचा मार्ग असे आहेत. उपदे. ११:६. मात्थी २१:१. मार्क ४:१४. लूक १०:२. योह. ४:३५,३६. १करिं. ३:८, ९. (४२३.)

## ६६० सद्गुणाचे उपाय केले पाहिजेत.

प्रेषि. २७:३१. तेव्हां पौलस शतपतीला व शिपायांस ह्मणाला, हे नारवांत न राहिले तर तुमचें तारण व्हायाचें नाहीं. यहेज्के. ३३:८. ३६:३७. रोम. १०:१४, १५, १७. (१०२.)

## ६६१ उपदेश हा सद्गुणाचा मुख्य उपाय आहे.

१करिं. १:१७–२१. एफ. ४:११–१३. २तीम. ४:१–५. (१८४.)

## ६६२ उपाय सफळ होण्याचीं वचनें व भविष्यें.

गीत १२६:५, ६. जे अश्रुपाताने पेरितात, ते हर्षशब्दाने कापितील. जो बीज घेऊन रडतांना पेरीतच जातो, तो आपल्या पेंढ्या घेऊन हर्षशब्दाने येईलच येईल. नीति ११:१८, ३०. यशा. ६६:८. दान. १२:३. मार्क. १:१७. लूक १:१६. योह. १७:२०. याक. ५:२०. (१५७, १०३, ४८२.)

## ६६३ सफळ झालेल्या उपायांचीं उदाहरणें.

प्रेषि. १४:१. मग असें झालें कीं इकन्यमांत ते बरोबर यहूदी लोकांच्या सभास्थानांत जाऊन असें बोलले कीं, यहूदी व हेल्लेणी यांच्या मोठ्या समुदायाने विश्वास धरिला. गल. ४:१९. १करिं. ४:१५. फिलेमोन. १०. (१९४, ४८२.)

## ६६४ नेमलेले उपाय दुसऱ्यांपेक्षां सफळ होतात.

इब्री ४:१२. कां तर देवाचें वचन सजीव व समर्थ, कोणत्याहि दुधाऱ्या तरवारीपेक्षां तिखट, आणि जीव व आत्माहि, सांधे व मज्जाहि यांतून पार जाणारें, आणि अंतःकरणांतील विचार व भावना यांचा नि-

वाडा करणारें आहे. इर्म. २३:२८,२९. लूक १६:३१. २करिं. १०:४,५ (४२३.)

६६५ उपाय ईश्वरी सामर्थ्याने सफळ होतात.

जख. ४:६. तेव्हां तो मला उत्तर करीत ह्मणाला कीं जरूब्बाबेलाकडे परमेश्वराचें वचन हेंच आहे कीं, बलाकडून नाहीं, आणि पराक्रमाकडून नाहीं, परंतु माझ्या आत्म्याकडून, असें सैन्यांचा परमेश्वर ह्मणतो. गीत ५१:१२,१३. २तीम. २:२५. (४४५-७.)

६६६ सद्गुणाच्या उपायाचीं फळें कधीं चांगलीं कधीं नाशकारक होतात.

२करिं. २:१५. कां कीं जे तारण पावतात त्यांस, आणि जे नाश पावतात त्यांस आह्मी देवाजवळ ख्रिस्ताचा सुगंध आहों. १६. यशा. ६:९-१२. २८:१३. इर्म. ५:१४. मार्क ४:३-८. इब्री. ४:२. मीख. २:७. (८७.)

६६७ उपाय करण्याच्या निराशेचीं उदाहरणें.

नीति ९:७,८. १३:१. १४:७. २३:९. मात्थी ७:६. १योह. ५:१६. (१०१, ३८७.)

## सहनशीलता.

६६८ सहनशीलता बाळगावी—आश्वासन.

एफ. ४:१,२. तर प्रभूसाठीं बंदिवान मी तुह्माजवळ विनंती करितों कीं, ज्या बोलावण्याने तुह्मी बोलाविलेले होतां त्याला योग्य तसें चालावें; सर्व लीनतेने व नम्रतेने, क्षमाशीलपणाने एकमेकांचें सहन प्रीतीने करीत असतां. नीति १९:११. १करिं. १३:४,५,७. १पेत्र. २:१८-२१,२३. ३:८,९. (७४२, ५८३-५, ३६६,६२३,५७९.)

६६९ ईश्वराच्या सहनशीलतेवरून पापी लोक अधिक भ्रष्ट होतात.

उपदे. ८:११. दुष्कर्मांचा निर्णय होऊनहि लवकर सिद्धीस जात

नाहीं, याकरितां मनुष्यांचें हृदय त्यांच्या ठायीं वाईट करायाला तत्पर असतें.

# संकटें-दुःखें-शासनें.

## ६७० संकटें मनुष्यमात्रांस लागतात.

ईयो. ५:७. तरी जशा ठिणग्या सहज वर उडतात तसा मनुष्य कष्टासाठीं जन्मतो. ७:१७, १८. १४:१.

## ६७१ संकटें ईश्वरापासून येतात.

इयो. ५:६. जरी हाल धुळींतून निघत नाहीं आणि कष्ट भूमींतून उगवत नाहीं. १८. १ शमु. २:७. गीत ३९:९. ६६:११. ८९:३०-३२. १०२:१०, २३. २ करिं. १२:७. (५३१, १३३.)

## ६७२ संकटें हितकारक होतात.

गीत ११९:६७. दुःखित झाल्यापूर्वीं मी वावगा चाललों; परंतु आतां तुझें वचन पाळितों. ७१, ७५. ७८:३४. ३५. ९४:१२, १३. अनु. ८:२. २ काल. ३३:१२, १३. ईयो. ५:१७. ३३:१०. नीति ३:११, १२. यशा. २६:९. २७:७, ९. ४८:१०. इर्म. २४:५. विल. ३:२७. दान. ११:३५. १२:१०. होशे. ५:१५. जख. १३:९. रोम. ५:३,४. १ करिं. ११:३२. २ करिं. ४:१७, १८. १२:१०. इब्री. २:१०. १२:१०, ११. याक. १:२, ३, १२. १ पेत्र. १:७, १९. (४६१, ४३६, ३१०.)

## ६७३ संकटें परमार्थिकांस क्षणिक होतात.

गीत ३०:५. कां तर तो आपल्या रागांत क्षणमात्र आहे; त्याच्या प्रसन्नतेने जीवन होतें; संध्याकाळीं अश्रुपात होत असेल, परंतु सकाळीं हर्ष होतो. ईयो. ११:१६. विल. ३:३२, ३३. २ करिं. ४:१७. (७०, १६९.)

## ६७४ संकटांत विश्वासणाऱ्यांस साह्य व समाधान देणारा ईश्वर आहे.

गीत २३:४. अणखी मी मरणछायेच्या खिंडींत चालतों, तरी वाईटाला भिणार नाहीं; कां तर तूं माझ्यासंगतीं आहेस; तुझी काठी व तुझा टेंका, हीं माझें समाधान करितील. ३१:७, ८. ४६:१. यशा. २५:४. ४९:१३. इर्म. १६:१९. २ करिं. १:३, ४. (३४२, ४०३.)

### ६७५ संकटांतल्यास कळवळा दाखवावा.

ईयो. ६:१४. दुःखितावर त्याच्या मित्राने दया करावी, परंतु तो सर्व समर्थाची भीति सोडितो. गीत ३५:१३, १४. रोम. १२:१५. फिलि. ४:१४.

### ६७६ संकटांनी मनुष्याची परीक्षा होती.

अनु. ८:२,३. (६७२.)

### ६७७ संकटावरून कितीएक सुधरत नाहींत.

यशा. १:५. तुह्मास अणखी कां मारावें? अणखी अधिक फितालः सर्व मस्तक दुःखांत आहे, आणि सर्व हृदय रोगी आहे. ९:१३. इर्यो. १०:१५–१८. १६:१२. इर्म. ५:३. विल. १:१२,१३. ३:१०–१२. आम. ४:६,७–११. (३९४,७२७.)

## संजीवनें.

### ६७८ प्राचीन धर्मसंबंधी संजीवनें.

उत्प. ४:२६. मग शेथ यालाहि पुत्र झाला आणि त्याने त्याचें नांव अनोश ठेविलें; तेव्हां परमेश्वराच्या नामाने हाक मारणें हें होऊं लागलें. १ राजे. १८:३८,३९. २ राजे. २३:३,२१,२२. २ काल. ३०:११–१३,२१–२३,२६,२७. नहे. ८:२,६,९. इर्म. २:२,३. प्रेषि. २:४१–४३. ४. ५:१४. ८:५–७. ११:१९–२४. १४:१.

### ६७९ पवित्र आत्म्याच्या प्रेरणेला वृष्टी व पाणी ओतणें असा दाखला दिल्हा आहे.

गीत ७२:६. जसा कापिलेल्या कुरणावर पाऊस व जसी भूमीवर सुवृष्टि तसें तो उतरील. नीति १:२३. यशा. ३२:१५. ४४:३. यहेज्के. ३९:२९. योएल २:२८,२९. जख. १२:१०. १ पेत्र. १:१२.

### ६८० खऱ्या संजीवनांचीं चांगलीं फळें.

गीत १४:७. इस्राएलाचें तारण जोयोनांतून कोण देईल? जेव्हां परमेश्वर आपले पाडाव केलेले लोक परत आणील, तेव्हां याकोब हर्षित

होईल, इस्राएल संतुष्ट होईल. २राजे. २३:२४,२५. २काल. ३१:५, ८. प्रेषि. २:४४-४७. ८:८. १९:१८-२०. कल. २:५. (४३०.)

### ६८१ संजीवनासाठीं प्रार्थना करावी-उदाहरणें.

दानी. ९:१७. तर आतां हे आमच्या देवा, तूं आपल्या सेवकाची प्रार्थना व त्याच्या विनंत्या ऐक, आणि तुझें जें पवित्रस्थान ओसाड पडलें आहे, त्याजवर प्रभूकरितां तूं आपलें मुखतेज पडूं दे. गीत ८०:१४-१९. ८५:६,७. १२२:६. श. गीत ४:१६. यशा. ६२:६,७. ६४:१, २. इर्म. १४:२०,२१. हब. ३:२. मात्थी ६:१०.

### ६८२ खोटीं संजीवनें.

मात्थी २३:१५. अहो शास्त्री व परोशी, तुह्मा ढोंग्यांस हाय हाय; कारण कीं तुह्मी एक शिष्य मिळवायासाठीं समुद्र व भूमि फिरतां, आणि मिळाला ह्मणजे तुह्मी त्याला नरकास योग्य आपल्याहून दुप्पट करितां. गल. ४:१७. (६१५,२०१,३६०,४३४,७१६.)

## सावधगिरी.

### ६८३ सावध असणें व विश्वासाची चांगली लढाई लढणें अवश्य आहे-आश्वासनें व उदाहरणें.

मात्थी २६:४१. तुह्मी परीक्षेंत येऊं नये ह्मणून जागे राहा व प्रार्थना करा; आत्मा तयार आहे खरा, परंतु देह अशक्त. मार्क. १३:३३-३७. लूक १२:३७. १ करिं. १०:१२. १६:१३. एफ. ५:१५,१६. ६:१०,११. १ थेस्स. ५:६. १ तीम. ६:१२. २ तीम. २:३. ४:५. १ पेत्र. ४:७. (३२९,७०५,४०२.)

## सार्वजनिक न्याय.

### ६८४ सार्वजनिक न्याय नेमला आहे.

प्रेषि. १७:३१. कां तर त्यानें असा दिवस नेमिला आहे कीं, त्यांत तो आपण नेमलेल्या मनुष्याकडून जगाचा न्याय न्यायीपणानें ठरवील; याविषयीं त्यानें त्याला मेलेल्यांमधून उठवून सर्वांस प्रमाण पटविलें

आहे. २४:२५. गीत ५०:३–६. मात्थी ११:२४. रोम. १४:१०, १२. २ करिं. ५:१०. २ तीम. ४:१. इब्री. ९:२७. २ पेत्र. ३:७. यहू. ६. प्रग. २०:१२,१३.

## ६८५ सार्वजनिक न्यायाचा हेतु.

रोम. २:५. आणि आपलें कठोणपण व अपश्चात्तापी अंतःकरण यांकडून क्रोधाच्या व देवाचा यथार्थ न्याय प्रगट होण्याच्या दिवसापर्यंत आपल्यासाठीं क्रोध सांठवून ठेवितोस काय? यहू. १४,१५.

## ६८६ न्यायदिवस अवचित येईल.

मात्थी २५:१३. यास्तव तुह्मी जागे राहा, कां कीं कोणत्या दिवसीं किंवा कोणत्या घटकेस मनुष्याचा पुत्र येईल हें तुह्मास ठाऊक नाहीं. २४:३७–३९. मार्क. १३:३२,३३,३५,३६. लूक १७:२४,२८–३०. २१:३५,३६. प्रेषि. १:७. (५३३.)

## ६८७ आकाश व पृथ्वी यांचा नाश होईल.

२ पेत्र. ३:७. आणि आतांचें आकाश व पृथ्वी त्याच शब्दाकडून अग्नीसाठीं न्याय ठरण्याचा व अभक्त माणसांच्या नाशाचा जो दिवस, तोंपर्यंत राखलेलीं असतां सिद्ध ठेवलेलीं आहेत. १०–१२. गीत १०२:२५,२६. यशा. ५१:६. प्रग. २०:११.

## ६८८ न्यायदिवसीं दुष्ट नीतिमानांपासून वेगळे होतील.

मात्थी १३:३०. कापणीपर्यंत दोन्ही बरोबर वाढूं द्या, मग कापणीच्या वेळेस मी कापणाऱ्यांस सांगेन कीं, पहिल्यानें निदण जमा करा, आणि जाळण्यासाठीं त्यांच्या पेंढ्या बांधा, मग गहूं माझ्या कोठारांत सांठवा. २२:११–१३. २५:३१–३३. लूक. १६:२६. (३८५)

## ६८९ न्याय करणें हें येशू ख्रिस्ताकडे होईल.

२ तीम. ४:१. तर देवाच्या समक्ष व जो आपल्या प्रगटण्याच्या व राज्याच्या वेळेस जिवंतांचा व मेलेल्यांचा न्याय ठरविणार आहे, त्या प्रभु येशू ख्रिस्ताच्या समक्ष मी निक्षूण असें सांगतों कीं, योह. ५:२२,२३, २७. प्रेषि. १०:४०,४२.

## ६९० न्यायदिवसीं गुप्त गोष्टी उघडकीस येतील.

रोम. २:१६. ज्या दिवसीं देव माझ्या शुभवर्तमानाप्रमाणें येशू ख्री-

त्याकडून मनुष्यांच्या गुह्य गोष्टींचा न्याय ठरवील, [त्या दिवसीं असें होईल.] उपदे. ११:९. १२:१४. मात्थी १२:३६. लूक १२:२,३. १ करिं. ३:१३. ४:५.

### ६९१ सार्वजनिक न्यायाचे ठराव अपालट होतील.

प्रग. २२:११,१२. जो अन्यायी आहे तो पुढें अन्यायी असो, आणि जो मलिन आहे तो पुढें मलिन असो, आणि जो न्यायी तो पुढें न्यायी असो, आणि जो पवित्र तो पुढें पवित्र असो. तर पाहा, मी लवकर येतों, आणि माझें वेतन माझ्या जवळ आहे, यासाठीं कीं जसें प्रत्येकाचें काम होईल तसें त्याला भरून द्यावें. लूक १३:२६,२७. १६:२६. (४०५,३९२,३९७.)

## सुख.

### ६९२ विषयसुख पोकळ आहे.

उपदे. २:१. म्या आपल्या मनांत झटलें, ये हो मी तुला हर्षेकडून पारखितों, झणून तूं सुख भोगीत जा, मग पाहा हेंहि व्यर्थता आहे. १०, ११. (३६४.)

### ६९३ मानसिक सुख अमोल्य आहे.

नीति ३:१३,१४. (७४३-४.)

### ६९४ स्वहित टाकून दुसऱ्यांचें कल्याण पाहण्याचें सुख.

२ करिं. ६:१०. खिन्नांसारिखे, तरी सर्वदा आनंद करणारे; दरिद्र्यांसारिखे, तरी बहुतांस धनवान करणारे; आपल्यास कांहीं नसल्यासारिखे, तरी अवघ्यांचे मालक आहों. (२०४,३२१,३८१,७१४.)

### ६९५ ईश्वरी आज्ञा मानण्याचें सुख.

गीत ११९:१,२. जे चालीने पूर्ण, जे परमेश्वराच्या शास्त्राप्रमाणें चालतात, ते धन्य. जे त्याचे नेम पाळीत असतां, सर्व हृदयाने त्याला शरण जातात, ते धन्य. नीति २९:१८. (१३०,३८१.)

### ६९६ ईश्वरावर प्रीति करण्याचें सुख.

१पेत्र. १:८. त्या येशूला पाहिलें नसताहि तुम्ही त्यावर प्रीति करि-तां; आतां जरी त्याला पाहत नाहीं, तरी विश्वास ठेवून अवाच्य व गौर-वयुक्त आनंदाने उल्हासतां. (१११.)

### ६९७ ईश्वरावर भरवसा ठेवण्याचें सुख.

गीत ४०:४. जो माणूस परमेश्वराला आपलें आशापात्र करितो, आणि उद्धटांकडे व खोटेपणास वळणारे यांकडे लक्ष लावीत नाहीं, तो धन्य आहे. (११५,११६.)

### ६९८ अनुमोदक सदसद्विवेकावरून सुख.

२करिं. १:१२. कां कीं हा आमचा उल्हास आहे, ह्मणजे आमच्या मनाची साक्ष; ती असी कीं, दैहिक ज्ञानाकडून नव्हे, तर देवाच्या कृ-पेकडून आह्मी देवाविषयींच्या भोळेपणाने व साळसूदपणाने जगांत व वि-शेषेकरून तुमच्या जवळ वागलों आहों. (६५८.)

### ६९९ आकाशलोकांतलें सुख.

१पेत्र. ४:१३ तर ख्रीस्ताच्या दुःखांचे वांटेकरी झालां आहां ह्मणू-न आनंद करा, यासाठीं कीं त्याच्या गौरवाच्या प्रगटण्याच्या वेळेस तु-ह्मी फार आनंदाने उल्हासावें. (२४,३५७.)

## सुजनता.

### ७०० सुजनता दाखविण्याचा धर्म—उदाहरणें.

प्रेषि. २७:३. मग दुसऱ्या दिवसीं आह्मी सिदोनास पोहंचलों, आणि युल्यसाने पौलसासीं सुजनतेने वागून, त्याला समाधान पावण्याकरितां मित्रांस भेटायाला मोकळीक दिल्ही. २८:७. मात्थी २६:५०. १पेत्र. ३:८. (१८५.)

## सैतानाचे उपाध्ये.

### ७०१ खोटे उपाध्ये बहुत आहेत.

१राजे. १८:२२. मग एलीयाने लोकांस ह्मटलें, "परमेश्वराकडला

भविष्यवादी मी केवळ मीच राहिलों, परंतु बालाकडले भविष्यवादी साडे-चारशें पुरुष आहेत. इर्म. १०:२१. मात्थी ७:२२,२३. २४:५,११. १ योह. ४:१. २ योह. ७

### ७०२ खोटे व अविश्वासू उपाध्ये ठकबाज आहेत.

मात्थी ७:१५. आणि खोट्या उपदेशकांविषयीं जपा, ते मेंढरांच्या वेषानें तुह्माकडे येतात, परंतु अंतरीं क्रूर लांडगे आहेत. २४:११,२४. इर्म. ६:११. यहेज्के. १३:१०,१८,२२. रोम. १६:१७,१८. २ करिं. ११:१३–१५. एफ. ४:१४. २ तीम. ३:१३. तीत. १:१०,११. २ पेत्र. २:३ (३२६,२८,७२९.)

### ७०३ खोटे उपदेशक क्रूर अपकारक व तुच्छ आहेत–दंडसूचना.

यहेज्के. १३:२२. तर तुह्मी खोटेपणानें न्यायीचें हृदय खिन्न केलें आहे, आणि म्या त्याला खिन्न केलें नाहीं; आणि दुष्टानें आपला जीव वाचवायाला आपल्या कुमार्गापासून फिरूं नये, ह्मणून तुह्मी त्याचे हात बळावले आहेत. २२:२५–२८. ३१. २४:२–४,१०. यशा. ३:१२. ९:१५,१६. इर्म. २३:१,२,१४,१५,३२. मल. २:८,९. मात्थी २३:१४–१७,२३,२४,२७,२८,३३. लूक ६:२६. ११:५२. प्रेषि. २०:२९,३०. २ पेत्र. २:१–३. (५१७–१९.)

### ७०४ खोट्या व अविश्वासू उपदेशकांस कित्येक शोधितात.

योह. ५:४३. मी आपल्या बापाच्या नांवानें आलों, तरी तुह्मी मला अंगीकारीत नाहीं, जर दुसरा कोणी आपल्या नांवानें येईल तर त्याला अंगीकाराल. इर्म. ५:३०,३१. २ तीम. ४:२–४. (५१७,७३१.)

### ७०५ खोट्या उपदेशकांचा सहवास टाकावा.

२ योह. १०,११. जर कोणी तुह्माजवळ येऊन हा उपदेश आणीत नाहीं, तर त्याला घरांत घेऊं नका, आणि त्याला क्षेम बोलूं नका; कांतर जो त्याला क्षेम बोलतो तो त्याच्या वाईट कामांचा भागीदार आहे. नीति १९:२७. मात्थी ७:१५ १५:१४. २४:४ मार्क ४:२४. लूक २१:८. रोम. १६:१७. १ करिं. १५:३३. गल. १:७,८. फिलि. ३:२,३ १ तिम. ६:३–५. (३२९,२३३,५१७–१९.)

### ७०६ खोटे उपदेशक आपला व इतर माणसांचाहि नाश करितात.

मात्थी १५:१४. त्यांस असूं द्या, ते अंधळ्यांचे अंधळे वाटाडे आहेत, आणि अंधळा अंधळ्याला नेऊं लागला तर दोघेहि खाचेंत पडतील. २३:१३, १५.

## सोबती.

### ७०७ चांगल्या सोबत्यांस निवडून घ्यावें, वाइटांस वर्जावें.

गीत १:१. तो माणूस फार धन्य, जो दुष्टांच्या विचाराप्रमाणें चालत नाहीं, आणि पाप्यांच्या मार्गांत उभा राहत नाहीं, आणि निंदकांच्या आसनावर बसत नाहीं. २६:४, ६. १०१:७. ११९:११५. १३९:१९. निर्ग. ३४:१२. नीति १:१०–१६, १८. ४:१४–१७. ७:२४–२७. १२:११. १३:२०. १४:७. २२:२४, २५. २४:१, २, २१. २८:७, १९. २९:३. १ करिं. १५:३३. (२३३, २३६.)

## स्त्रिया.

### ७०८ स्त्रियांचें उद्योगीपण.

नीति ३१:१३. ती लोंकर आणि ताग शोधून घेती, आणि आपल्या हातानी खुशीने कार्य करिती. १४–२५. प्रेषि. ९:३९.

### ७०९ स्त्रियांचा धार्मिकपणा व कळवळा.

मार्क १२:४३, ४४. मग तो आपल्या शिष्यांस बोलावून त्यांस ह्मणाला, मी तुह्मास खचीत सांगतों कीं, ज्यानी भांडारांत टाकिलें त्या सर्वांसपेक्षां या दरिद्री विधवेने अधिक टाकिलें आहे. कारण कीं त्या सर्वांनी आपल्या भरपुरांतून टाकिलें, परंतु हिने आपल्या कमतींतून आपलें जितकें होतें ह्मणजे आपली सर्व उपजीविका टाकिली. नीति ३१:२०, २६–२८. मात्थी २७:५५, ५६. लूक २४:१, १०.

### ७१० स्त्रियांची अधीनता.

कल. ३:१८. बायकांनो, तुह्मी जसें प्रभूसाठीं उचित आहे, तसें आपल्या नवऱ्यांस मान्य असा. उत्प. ३:१६. गण. ३०:३. १ करिं. ११:३-९, १३-१५. १४:३४, ३५. एफ. ५:२२-२४. १ तीम. २: ११, १३. १ पेत्र. ३:१, २, ६, ७. (५७३)

## स्थिरता.

### ७११ स्थिरतेचें अगत्य.

१ करिं. १५:५८. यास्तव अहो माझ्या प्रिय भावांनो, तुह्मी स्थिर व अढळ व प्रभूच्या कामांत सर्वदा अधिकाधिक तत्पर असा, कां कीं प्रभूसंबंधी तुमचा श्रम व्यर्थ नाहीं, हें तुह्मी जाणतां. १६:१३. फिलि. १: २७, २८. ४:१. कल. १:२३. २:५-७. २ तीम. १:१३. इब्री. १०: २३. १ पेत्र. ५:८, ९. २ पेत्र. ३:१७. (६११, २७९.)

## स्नेह.

### ७१२ खरा स्नेह इच्छास्पद आहे.

नीति १७:१७. सखा सर्वदा प्रीति करितो, आणि भाऊ कष्टाला जन्मला आहे. १८:२४. १९:६. २७:९. २ शमु. १:२६. (५७९.)

### ७१३ खोटा स्नेह-अकृतज्ञता.

इयो. १९:१४. माझे भाऊबंद मला सोडून दूर राहिले आहेत, आणि माझे स्नेही मला विसरले आहेत. गीत ३८:११. ५५:१२-१४. मात्थी २६:५६. २ तीम. ४:१६. (७२८.)

## स्वहितत्याग.

### ७१४ स्वहितत्याग करावा-आश्वासन व उदाहरण.

मात्थी १९:२९. आणि ज्याने घरें किंवा भाऊ किंवा बहिणी किंवा बाप किंवा आई किंवा बायको किंवा लेंकरें किंवा शेतें माझ्या नामाकरितां सोडली आहेत, तो शंभरपट पावेल, आणि सर्वकाळच्या जीवनाचें

वतन पावेल. १०:३७–३९. १६:२४–२६. उत्प. २२:१०,१२ (मार्क ८:३४–३७.) मार्क. १०:२८–३०. (लूक १८:२८–३०.) लूक १४:२६, २७, ३३ १८:२८. (३६८.)

---

## हट्टी पापी.

### ७१५ हट्टी पापी पवित्रतेविरहित आहेत.

योह. ५:४२. परंतु मी तुह्मास जाणतों कीं, तुमच्या मध्यें देवाची प्रीति नाहीं. यशा. १:५,६. रोम. ६:२०. ७:१८. ८:८. १करिं. २:१४. एफ. २:१२. (५११,४४०.)

### ७१६ हट्टी पापी हे स्वार्थी व अन्यायी आहेत.

इर्म. ६:१३ कां तर लहानांपासून मोठ्यांपर्यंत ते सर्व लोभिष्ट आहेत; आणि भविष्यवाद्यापासून याजकापर्यंत ते सर्व लबाडी करितात. २२:१७. ईयो. २१:१५. यशा. ५६:११. यहेज्के. २२:१२. ३३:३१. होशे. १०:१. मात्थी ५:४६,४७. लूक ६:३२–३४. फिलि. २:२१. १तीम. ६:५. २तीम. ३:२. (५९१, ६१५, २०१, ३६०, ४३४, ६८२, ३०१, ७, ८.)

### ७१७ हट्टी पापी हे ईश्वराचे शत्रु व सैतानाचीं लेंकरें आहेत–त्यांचें मन दुष्ट कामाकडे आहे.

गीत ३६:१–३ ५५:९–११. ७३:६–९. होशे. ४:२. मात्थी १३:३८. २३:३३ योह. ७:७. ८:४४. १५:२४,२५ प्रेषि. ७:२१. १३:१०. रोम. १:३०. ३:१३–१८. ८:७. (२५०, २६८, ५११, १२, ४३५, ७२९, २९६.)

### ७१८ हट्टी पापी हे ईश्वराच्या आज्ञा मोडणारे आहेत.

निर्ग. ५:२. तेव्हां फारो बोलला कीं, "परमेश्वर कोण आहे कीं म्या त्याची आज्ञा ऐकून इस्राएलास जाऊं द्यावें? मी परमेश्वराला जाणत नाहीं अणखी मी इस्राएलास जाऊं देणार नाहीं." अनु. ३१:२७. नहे. ९:२६. गीत ८१:११. नीति १:२४,२५. यशा. १:२. ३०:८,९. ६५:२,३. इर्म. ५:२३. २५:४. यहेज्के २:७,८.

### ७१९ हट्टी पापी ईश्वराला विसरतात.

न्याया. ३:७. असें इस्राएलाच्या संतानानी परमेश्वराच्या दृष्टींत जें वाईट तें केलें; ह्मणजे आपला देव परमेश्वर याला विसरून बाल व आ- ष्टारोथ यांची सेवा केली. अनु. ३२:१८. १ शमु १२:९. गीत ९: १७. ५०:२२. १०६:२१. इर्म. २:३२. ३:२१, यहेज्के. २२:१२. (३७१.)

### ७२० हट्टी पापी बुद्धिमंद असून ईश्वराकडे लक्ष देत नाहींत.

गीत १०:४. दुर्जन आपल्या तोंडाच्या उद्धटपणाप्रमाणें शोधीत नाहीं; देव नाहीं, असे त्याचे सर्व विचार आहेत. ५०:२१. ९४:८. नीति ६:९. यशा. ५:१२. इर्म. ४:२२. ८:७. होशे. ७:११. (६०१, ७३४, २९५.)

### ७२१ हट्टी पापी ईश्वराला सोडून भकून जातात.

इर्म. २:५. परमेश्वर ह्मणतो कीं, तुमच्या वडिलांस माझ्या अंगीं कोणता अन्याय सांपडला ह्मणून ते मजपासून दूर गेले आहेत, आणि व्यर्थपणाप्रमाणें चालून व्यर्थ झाले आहेत? १३. उत्प. ३:८. ईयो. ११:१२. होशे. ७:१३.

### ७२२ हट्टी पापी ईश्वरी समक्षता, अधिकार व बंधारणें यांचा द्वेष करितात.

यशा. ३०:११. मार्गापासून सरा, वाटेंतून एकीकडे वळा, इस्राए- लाचा पवित्र आमच्या समोरून नाहींसा होई, असें करा. ईयो. २७: २२. लूक १९:१४, २७. (३७१, ४९५, १४५, ७३२.)

### ७२३ हट्टी पापी साधुमान्य व गर्विष्ट आहेत आणि ईश्वराकडील पुण्याला मान्य नाहींत.

गीत १०:४. दुर्जन आपल्या तोंडाच्या उद्धटपणाप्रमाणें शोधीत नाहीं; देव नाहीं, असे त्याचे सर्व विचार आहेत. मात्थी २०:१०– १६. लूक १५:२८–३०. रोम. १०:३. १ करिं. १:१८, २३. (४१, ४६३, २७५, २७६.)

### ७२४ हट्टी पापी यांस ख्रीस्ताकडे यावें यापेक्षां नाश पावावा हें आवडतें.

योह. ५:४०. परंतु तुह्मी जीवन पावण्यासाठीं मजकडे येण्यास मान्य होत नाहीं. नीति ८:३६. प्रेषि. १३:४६. (४१.)

### ७२५ हट्टी पाप्यांस हांवा, विलास व विषयसुख हीं आवडतात.

एफ. २:३. त्यांमध्यें आह्मीहि सर्वांनी अगोदर आपल्या देहसंबंधी इच्छानी वर्त्तणूक केली, देहाच्या व बुद्धीच्या वासनांप्रमाणें करीत होतों, व जन्मस्वभावाने दुसऱ्यांसारिखींच क्रोधाचीं लेंकरें होतों. लेवी. १८:२४,२५. गल. ५:१९–२१. २तीम. ३:४. तित. ३:३. याक. ५:५. १पेत्र. ४:३,४. (५१६.)

### ७२६ हट्टी पाप्यांस मूर्त्तिपूजा करण्याचा कल आहे.

अनु. ३१:१६. तेव्हां परमेश्वर मोशेला बोलला, "पाहा, तुला तुझ्या पूर्वजांसंगतीं निजायाचें आहे, आणि हे लोक ज्या देशांत जातात त्यांमध्यें उठून अन्य देवांच्या पाठीं लागून व्यभिचार करितील; असें मला सोडून जो करार म्या त्यांसीं केला, त्याला मोडतील. २०. निर्ग. ३२:१. इर्म. ४४:१७. (५५७.)

### ७२७ हट्टी पाप्यांस कुरकूर करण्याचा कल आहे.

गण. १७:१०. तेव्हां परमेश्वराने मोशेला सांगितलें, "तूं आहारोनाची काठी पुन्हा संकेतलेखापुढें ठेव, आणि ती फितुरकऱ्यांस खूण होण्यासाठीं राखली जावी; अशाने त्वां मजवरून त्यांच्या कुरकुरीचें निवारण करावें आणि ते न मरावे." निर्ग. १६:२,३,८. मात्थी २०:११,१२. यहु. १६. (६७७,३७३,१४५.)

### ७२८ हट्टी पापी हे अनुपकारी व क्रूर आहेत.

यशा. १:२. अहो आकाशानो, तुह्मी ऐका, अगे पृथ्वी, तूं कान दे, कां तर परमेश्वर ह्मणतो, म्या लेंकरें पोशिलीं, व वाढविलीं आणि त्यांनी मजवर फितूर केला आहे. उत्प. ४०:२३. ४९:५–७. अनु. ३२:६, १५. २काल. २४:२२. गीत. ३५:११–१६. ४१:९. ७४:२०. नीति १:११–१६. उपदे. ९:१५. रोम. ३:१५,१६. (२५०,७१३,१९३, ३०५,४४२,३१७,७१६,७१७,५७६.)

## ७२९ हट्टी पापी हे कपटी खुशामतखोर व फाशांत घालणारे आहेत.

गीत ५:९. कारण कीं त्यांच्या तोंडीं सत्यता नाहीं; त्यांचें अंतर्गत अनिष्ठाड आहे; त्यांचा घसा उघडलेलें थडगें आहे; ते आपल्या जिभेने फ़सलावतात. १०:७. १२:२. २८:३. ३८:१२. ५२:२. ६४:५, ६. १४०:५. १४१:९, १०. २ शमु. १५:५, ६. २ काल. २४:१७. नीति ७:२१. ११:१८. १२:५. २०:१४. यशा. २९:२०,२१. ६६:५. इर्म. ३:१०. ८:५. ९:२–६, ८. १७:९. यहेज्के. ३३:३०, ३१. दानी. ११:२१, ३२. होशे. ११:१२. मीख. ३:१०, ११. मात्थी २६:४८, ४९. रोम. १:२९. १६:१८. २ थेस्स. २:९, १०. इब्री. ३:१३. प्रग. १८:२३. (६१५,२०१, २८, ३६०, ५८०, ७०२, ३०१.)

## ७३० हट्टी पापी हे दांभिक फुशारखोर, आणि लाज हें गौरव असें मानणारे आहेत.

नीति २०:६. बहुतकरून मनुष्यें आपआपले सद्गुण गाजवितात; परंतु विश्वासू मनुष्य कोणाला सांपडेल? ३:३५. २ राजे. १०:१६. गीत ३९:६. हब. २:१६. मात्थी ६:५, १६. २३:५–७. लूक १६, १५. १८:९–१२. २ करिं. १०:१२. फिलि. ३:१९. (५२६, २७५, २७६.)

## ७३१ हट्टी पापी हे आत्मवंचक आहेत–दंडसूचना.

लूक २१:८. तेव्हां तो बोलला, फसूं नये ह्मणून जपा, कारण कीं माझ्या नांवाने बहुत येऊन मीच तो आहें, आणि तो काळ जवळ आला आहे, असें ह्मणतील, ह्मणून तुह्मी त्यांच्या मागें जाऊं नका. अनु. ११: १६. नीति १६:२५. यशा ४४:२०. मात्थी ७:२२,२३. २४:४,५. १ करिं. ३:१८. गल. ६:३,७. एफ. ५:६. २ थेस्स. २:३,११,१२. (४९०,७४९,७०४,४६३.)

## ७३२ हट्टी पापी देवाचा आभार मानीत नाहींत.

गीत १२:४. ते ह्मणतात, "आह्मी आपल्या जिभेविषयीं प्रबळ होऊं; आमचे ओंठ आमचेच; आमचा धनी कोण?" २:२,३. मात्थी २५: २४,२५. (३७१,७२२.)

## ७३३ हट्टी पापी हे आपण केलेलें तें पाप नाहीं किंवा हलकें आहे असें ह्मणतात.

मात्थी २५:४४. तेव्हां हेहि त्याला उत्तर देतील कीं, हे प्रभू, आह्मी तुला भुकेले अथवा तान्हेलें अथवा परकें अथवा उघडें अथवा रोगी अथवा बंदिशाळेंत असें केव्हां पाहून तुझी सेवा केली नाहीं? उत्प. ३:१२,१३. १ शमु. १५:१३–१५. नीति. १४:९. इर्म. ७:९,१०. (१४५,४१.)

## ७३४ हट्टी पाप्यांचें आपखुशीचें अज्ञान, मंदबुद्धि आणि वेड.

गीत ८२:४: दरिद्री व दुबळे यांस मुक्त करा, दुष्टांच्या हातून त्यांस सोडवा. ५०:१७,२१. ५८:४,५. इयो. ५:१४. १२:२५. नीति. १:२२,२९,३०. ४:१९. इर्म. १७:२३. ३२:३३. दानी. १२:१०. जख. ७:११,१२. योह. ३:१९,२०. १७:२५. प्रेषि. २६:१७,१८. रोम. १:२१,२८. १ करिं. २:१४. एफ. ४:१८. १ योह. ४:८. (४९८, ७२०.)

## ७३५ हट्टी पापी अविश्वासी व पाखंडी असतात.

गण. १४:११. आणि परमेश्वराने मोशेला ह्मटलें, "हे लोक कोठपर्यंत मला धिक्कारितील आणि त्यांमध्यें जे चमत्कार म्या दाखविले, ते सर्व असतांहि कोठवर मला मानणार नाहींत. गीत १०:११,१३. ७३:९–११. ९४:५–७. यहेज्के. ८:१२. जफ. १:२. मार्क. ६:६. १६:१६. योह. ३:१८,३६. ५:४४. ८:४३. १६:८,९. रोम. ११:२०. इब्री. ३:१२. (३७१,३९३.)

## ७३६ हट्टी पाप्यांचा आळस.

मात्थी २०:६. नंतर अकराव्या तासीं बाहेर जाऊन त्याने दुसरे रिकामे उभे राहिलेले पाहिले; आणि त्याने त्यांस ह्मटलें, तुह्मी सारा दिवस एथें रिकामे कां उभे राहिलां. २५:१८,२६–३०. यहेज्के. १६:४९. लूक १६:६,७. (४७)

## ७३७ हट्टी पापी धिटाईखोर व लोटालोटे असतात.

गीत ४९:११ त्यांचें मन असें आहे कीं आपलीं घरें सर्वकाळ, आ-

पल्या वस्त्या पिढीपिढी राहतील; ते आपलीं नावें आपल्या भूमीवर ठेवितात. नीति २४:३३. यशा. २८:१५. ५६:१२. आम. ६:३. लूक १२:१९. प्रेषि. २४:२५. (३७१,२१२,६१७,६१८.)

## हात ठेवणें.

### ७३८ आशीर्वाद देतांना हात ठेवीत असत.

प्रग. १:१७. आणि म्या त्याला पाहिलें तेव्हां मी त्याच्या पायांजवळ मेलेल्यासारिखा पडलों, मग त्याने आपला उजवा हात मजवर ठेवून मला ह्मटलें, भिऊं नको, जो पहिला व शेवटला तो मी आहें. उत्प. ४८: १४–१६ मात्थी १९:१३:१५.

### ७३९ चमत्कार करितांना हात ठेवीत असत.

मार्क. ६:५. आणि त्याने थोडक्या रोग्यांवर आपले हात ठेवून त्यांस बरें केलें. याशिवाय दुसरा चमत्कार त्याच्याने तेथें करवला नाहीं. १६: १८. लूक ४:४०. प्रेषि. ८:१७–१९. २८:८.

### ७४० कामावर व हुद्यावर स्थापितांना हात ठेवीत असत.

२ तीम. १:६. या कारणावरून मी तुला सूचना करितों कीं, देवाचें जें कृपादान माझ्या हातावर ठेविल्याने तुला आहे, त्याला तों चेतवून वाढवावें. गण. २७:२२,२३. प्रेषि. १३:२,३. १ तीम. ४:१४.५:२२.

## हेवा.

### ७४१ हेवा करणें हें पाप व मूर्खपण आहे–मना केलें आहे.

इयो. ५:२. का कीं राग मूर्खाला वधितो आणि मत्सर निर्बुद्धिला मारितो. उत्प. ३०: १. गीत ३७:१. १०६:१६. नीति. ३:३१. १४:३०. २३:१७. २४: १,२,१९,२०. २७:४. उपदे. ४:४. मात्थी २७:१७,१८. प्रेषि. ७:९. १३:४५. १७:५. रोम. १३:१३. तित. ३,३. याक. ३:१४–१६. १ पेत्र. २:१,२. (५९१.)

---

## क्षमशीलता.

### ७४२ आपण जसी क्षमा पावण्याची आशा धरितों तसी क्षमा करावी–अक्षमशील यांस दंडसूचना.

लूक ६:३७. आणि तुह्मी दोष लावूं नका, ह्मणजे तुह्माला दोष लावणार नाहींत; कोणाला अन्यायी ठरवूं नका, ह्मणजे तुह्माला अन्यायी ठरविणार नाहींत, क्षमा करा ह्मणजे तुमची क्षमा होईल. १७:३,४. माथ्यी ६:१२,१४,१५. १८:२१,२२,२७–३५. मार्क. ११:२५,२६. एफ. ४:३२. कल. ३:१२,१३ (२४४,४७६,५७७,१६७.)

---

## ज्ञान.

### ७४३ खरें ज्ञान संपादन करावें–आश्वासन.

नीति ४:७–१३.९. ८:१०. २२:१७. २३:१२,२३ (१२,५४३.)

### ७४४ खऱ्या ज्ञानाचा लाभ.

नीति १६:२२. ज्याला सुबोध प्राप्त झाला आहे त्याला तो जीवनाचा झरा असा आहे, परंतु मूर्खपणा मूर्खाला शासन आहे. २:१०–१२. ३:१३–१८,३५. ४:५,६,८,९. उपदे. ७:१२.

### ७४५ खरें ज्ञान हा खऱ्या प्रीतीचा पाया आहे.

फिलि. १:९,१०. आणि मी असी प्रार्थना करितों कीं, तुमची प्रीति ज्ञानानें व सर्व विवेकानें उत्तरोत्तर अतिशय वाढावी. यासाठीं कीं जों भिन्नभिन्न तीं तुह्मी पारखून घ्यावीं, असें कीं तुह्मी ख्रिस्ताच्या दिवसापर्यंत भावार्थी व निर्दोष व्हावें. २ पेत्र. १:२,३. (४२३.)

### ७४६ ईश्वरी सत्यतेचें ज्ञान निश्चित आहे.

इयो. १९:२५. कां तर मी जाणतों कीं माझा उद्धरणारा जीवंत आहे, आणि अंतकाळीं भूमीवर उभा राहील. नीति २२:२०,२१. योह. ६:६९. २ तीम १:१२. १ योह. २:२०,२१. (४९,८५.)

## ७४७ ज्ञान व चातुर्य कशाने मिळेल?

नीति १८:१. एकांतीं बसणारा आपल्या इच्छेने हुडकितो तो सर्व विद्याभ्यास करितो. २:३–७. याक. १:५,६.

## ७४८ ज्ञान प्रसिद्ध करावें.

नीति २७:९. तेल व सुरभि हीं हृदय आनंदित करितात, आणि त्याच्या मित्राचें गोड बोलणेंहि मनापासून उपदेश करण्याने तसें करितें. मात्थी ५:१९. (२३१.)

## ७४९ आत्मज्ञान पाहिजे.

२ करिं. १३:५. तुह्मी विश्वासांत आहां किंवा नाहीं, याविषयीं आपली परीक्षा करा, आपली प्रचीति पाहा; तुह्मी नाकारलेले नसलां, तर येशू ख्रीस्त तुह्मामध्यें आहे असें तुह्मी आपणांस ओळखत नाहीं काय? गीत ४:४. विल. ३:४०. १ करिं. ११:२८. गल. ६:४. (२२६, ७३१.)

## ७५० पूर्ण ज्ञान आकाशलोकीं होईल.

योह.१३:७. येशूने त्याला उत्तर दिल्हें कीं, जें मी करितों तें तूं आतां जाणत नाहींस, तर पुढें जाणसील. १६:२५. १ करिं. १३:९–१२.

**समाप्त.**